श्रीनरसिंह सरस्वती पंचशताब्दी महोत्सव मंडळ, गाणगापूर
यांनीं पुरस्कृत केलेला ग्रंथ

# श्रीनरसिंह सरस्वती

## चरित्र आणि परंपरा

* दत्त संप्रदायाचा इतिहास *

*

लेखक
रामचंद्र चिंतामण ढेरे

मूल्य पांच रुपये



वोरा ॲण्ड कंपनी पब्लिशर्स प्रा. लि., मुंबई २.

# अनुक्रमणिका

* * *

* * *

तीर्थस्वरूप

आजी आणि मामा

यांच्या पवित्र स्मृतीस

* * *

# पुरस्कार

दत्तप्रभु श्रीनरसिंह सरस्वतींचा हा पंचशताब्दी महोत्सव श्रीदत्त संप्रदायाच्या इतिहासांत एक मोठी घटना आणि दत्तभक्तांस अपूर्व सुवर्णसंधि होय, असें मला तरी वाटतें. मात्र दत्तभक्तांनीं या घटनेचें महत्त्व समजून घेऊन ही सुवर्णसंधि वायां न घालवितां आपलें इह-पर कल्याण साधावें, अशी आमची तळमळ आहे. आणि बरेचसे दत्तभक्त या घटनेचें महत्त्व ओळखून आपापल्या परीनें श्रीदत्तप्रभूंच्या अनेकविध सेवेकरितां पुढेंहि होत आहेत, याचा आम्हांला अतिशय संतोष होतो. या प्रसंगीं पुष्कळ लेखक दत्त संप्रदायविषयक ग्रंथ प्रसिद्ध करीत आहेत. कांहीं जणांना "काय ही लेखनाची गर्दी!" असें वाटेल; पण श्रीदत्तप्रभूंच्या माहात्म्याच्या अनन्तत्वाची ज्यांना अगदीं अणुमात्र तरी कल्पना असेल, त्यांना "एवढेंच का हें?" असें वाटेल. आम्हांला तर या प्रसंगीं जितकें विपुल वाङ्मय श्रीदत्तप्रभूंसंबंधीं निघेल, तितका अधिक आनंद आहे आणि त्या सगळ्यांचें आम्ही अगदीं सहर्ष स्वागत करतों.

आतां या सर्व प्रकाशनांत श्री. ढेरे यांचा ग्रंथ अगदीं सर्वांत प्रथम प्रसिद्ध होऊन अग्रेसरत्वाचा आणि वडीलकीचा मान मिळवीत आहे. वडील बंधु इतर सर्व बंधूंना पितृतुल्य आदरणीय. श्रीदत्तवाङ्मय-प्रकाशनांत लेखक श्री. ढेरे आणि प्रकाशक मे. वोरा ॲण्ड कंपनी पब्लिशर्स प्रा. लि., मुंबई, या दोघांनीं हा अपूर्व मान मिळविला, म्हणून मी प्रथम त्यांना श्रीदत्तप्रभूंचे आशीर्वाद सांगतों आणि मग माझ्या शुभेच्छा आणि हार्दिक अभिनंदन!

**प्रभुदास**
अध्यक्ष,
श्रीनरसिंह सरस्वती पंचशताब्दी
महोत्सव मंडळ, गाणगापूर.

# मनोगत

मराठी संस्कृतीच्या इतिहासांत श्रीनरसिंह सरस्वतींचें जीवन आणि कार्य चिरस्मरणीय आहे. ज्या वेळीं महाराष्ट्राचें लोकजीवन विनाशक संकटांत सांपडलें होतें, त्या काळांत त्यांनीं आपल्या तेजोमय विभूतिमत्त्वानें अंधारालाच प्रकाशाची पालवी निर्माण केली आणि आपल्या जीवन-कार्याचा अमिट प्रभाव या भूमीच्या कणाकणावर उमटविला. श्रीदत्तात्रेयाचे अवतार म्हणून सारा महाराष्ट्र त्यांना ओळखतो. गेलीं पांचशें वर्षे मराठी लोकमानसांत त्यांचा जयजयकार निनादत आहे. अशा महापुरुषाची वाक्पूजा करतांना माझें हृदय आनंदानें ओसंडून जात आहे.

श्रीनरसिंह सरस्वतींच्या अवतार-कार्यामुळें महाराष्ट्रांत दत्तोपासनेचा प्रवाह खळाळून वाहूं लागला. अनेक साधकांना आणि चिंतकांना त्यांच्या चरित्रांतून प्रेरणा प्राप्त झाली; अनेकांचीं जीवनें अनुभूतीच्या अमृतांत न्हाऊन निघालीं; आणि अनेकांच्या हृदयांतील दुरिताचें तिमिर दूर झालें.

या वर्षीं श्रीनरसिंह सरस्वतींच्या निजानंदगमनाला पांचशें वर्षें पूर्ण होत आहेत. त्यांच्या पुण्यस्मृतीचा पंचशताब्दी महोत्सव गाणगापूर येथें फार मोठ्या प्रमाणावर साजरा होणार आहे. या सुवर्ण-क्षणाच्या निमित्तानें श्रीगुरूंच्या जीवनाचा आणि जीवन-कार्याचा अल्पसा परिचय करून देण्याचा प्रयत्न या पुस्तकांत केला आहे. त्यांच्या जीवन-कार्याचा अन्वयार्थ स्पष्ट होण्यासाठीं दत्तोपासनेची पूर्व-परंपरा आणि उत्तर-परंपरा यांचाहि स्थूल परामर्श घेतला आहे. जिज्ञासू वाचक आणि भाविक दत्तोपासक या सर्वांना माझा प्रयत्न आवडेल, अशी आशा आहे.

या पुस्तकाला श्रीप्रभुदास यांनीं उत्कट आशीर्वाद देऊन मला कृतार्थ बनविलें आहे. तसेंच अनेक सुहृदांचें प्रोत्साहन, मार्गदर्शन आणि संदर्भ-साह्य मला लाभलें आहे. प्रकाशक, मुद्रक आणि चित्रकार यांचा अकृत्रिम स्नेहहि या पुस्तकामागें जागा आहे. त्यांच्या सहाय्यांत उपकाराऐवजीं सहकाराची भावना असल्यामुळें आभाराचे उपचार त्यांना रुचणार नाहींत.

१५९ शनिवार, पुणें २
बलिप्रतिपदा : शके १८८०

**रामचंद्र चिंतामण ढेरे**

# १ : दत्तावताराचें रहस्य

## महाद्वारांतील चिन्तन :

दत्तात्रेयाचे दुसरे अवतार आणि दत्तोपासनेचे संजीवक म्हणून अखिल महाराष्ट्रांत ख्याति पावलेले श्रीनरसिंह सरस्वती यांच्या चरित्राचें आणि जीवनकार्याचें चिन्तन करतांना मनांत स्वाभाविकच दत्तात्रेयाची मूर्ति उभी राहते. दत्तात्रेय ही भारतीय संस्कृतीच्या विकासांतील एक अद्‌भुत निर्मिति आहे. शैव, वैष्णव आणि शाक्त या तीनहि प्रमुख उपासना-प्रवाहांना व्यापून उरणारा दत्तात्रेयाचा प्रभाव गेलीं हजार-बाराशें वर्षें भारतांत—विशेषतः आपल्या महाराष्ट्रांत गाजत आहे. महाराष्ट्रांत दत्तभक्तीचा प्रसार जातिभेदातीत, संप्रदायातीत, किंबहुना धर्मातीत आहे. महानुभाव संप्रदाय, नाथ संप्रदाय, वारकरी संप्रदाय आणि समर्थ संप्रदाय या चारहि संप्रदायांत दत्तात्रेयाविषयीं उत्कट श्रद्धाभाव आहे. तसेंच खास दत्तभक्तीची परंपरा चालविणारा दत्तसंप्रदायहि गेलीं पांचशें वर्षें महाराष्ट्रांत नांदत आहे. या संप्रदायांत दत्तात्रेयाला श्रद्धेय मानणाऱ्या उपासकांत हिंदूंबरोबर मुसलमानांचाहि समावेश आहे.

अशा या अत्यंत लोकप्रिय आणि अद्‌भुत देवतेचें दर्शन घेण्यासाठीं इतिहास-मंदिरांत प्रवेश करण्याचा माझा हेतु आहे. परंतु मंदिराच्या महाद्वारांत पाऊल टाकतांच मनांत अनेक चित्र-विचित्र विचारांचें वादळ उठतें: माझ्यासारखा अनभ्यस्त विद्यार्थी या दर्शनाला पात्र होऊं शकेल का ? ज्याचें भावबळ विकल्प-विकारांनीं कुरतडलें आहे, ज्याची श्रद्धा शंका-कुशंकांनीं डळमळली आहे आणि ज्याची प्रज्ञा बहिर्मुखतेनें पांगुळली आहे, त्याला इष्टदर्शन होत नाहीं, असें जाणत्यांनीं ठासून सांगितलें आहे. हा जाणत्यांचा सांगोवा कानांवर पडल्याबरोबर पाऊल जागच्या जागीं खिळून राहतें आणि आपण केवळ अनधिकारानें हा सर्व प्रपंच करावयास धजलों आहोंत, याचें शल्य अंतर्मनाला बोचूं लागतें. आपल्याजवळ आहे काय ?—तर केवळ कोरडी जिज्ञासा.

परंतु, जो आस्तिक आहे, तो कोणत्याहि भावनेनें परमेश्वराच्याजवळ गेला, तरी तो इष्टदर्शनास पात्र होतो, असा भागवतकारांचा आश्वासक अभिप्राय आहे. या आश्वासनाचा आधार घेऊनच विनीतभावानें दत्तात्रेयाच्या मंदिरांत पाऊल टाकण्याचें साहस मी करीत आहें.

संस्कृतीच्या इतिहासांत देवतांच्या निर्मितीचा आणि विकासाचा विचार अत्यंत महत्त्वपूर्ण असतो. मानवाच्या वैयक्तिक आणि सामूहिक चिंतनाच्या मुशींतूनच विविध देवतांच्या मूर्ति आकारास येत असतात. त्याचमुळें देवतांच्या विकासाचा इतिहास मानवाच्या भावनिक आणि वैचारिक विकसनावर प्रकाश टाकण्यास अत्यंत उपयुक्त ठरतो. विविध मानवसमूहांचीं देवतायनें हीं त्या त्या समाजाच्या संस्कृतीचीं अर्थगर्भ प्रतीकें असतात. देवतांच्या स्वरूपांत युगांचें चिंतन घनीभूत होत असतें.

आदिमानवाच्या मनांतील भीति, आश्चर्य आणि कृतज्ञता या तीन भावनांनीं प्रथम देवतांना जन्म दिला आहे. ऋतुचक्रांत विविध रंग-रूपें धारण करणारीं पंचमहाभूतें, वृक्ष, वेली आणि पशु-पक्षी यांतून मानवाच्या आदिदेवता जन्म पावल्या. या बाह्यसृष्टीबरोबरच मानवाच्या जीवनांतील जनन आणि मरण या दोन गूढ घटनांनींहि देवतानिर्मितीला हातभार लावला आहे. जननाच्या आश्चर्यांतून लिंगपूजेचा उद्‌भव झाला आणि मरणाच्या भयांतून भूत-पिशाचांची आणि संहारक देवतांची निर्मिति झाली. पुढें जसजसें मानवाचें जीवनविषयक आणि विश्वविषयक चिंतन वाढूं लागलें, तसतसें या प्राकृतिक देवतांनीं सुसंस्कृत स्वरूप धारण केलें. बाह्य शत्रूंवर विजय मिळविणारा वीरपुरुष आणि आंतरिक शत्रूंवर विजय मिळवणारा सिद्धपुरुष यांनाहि देवत्व प्राप्त होतें. वेदांतील इंद्र ही वीरदेवता आहे, तर मध्ययुगांतील दत्त ही सिद्धदेवता आहे. दत्तात्रेय ही देवता भारतीयांच्या प्रगल्भ चिंतनाची निर्मिति आहे. भारतीय संस्कृतींतील अत्यंत परिणत विचार आणि निगूढ भावना व्यक्त करण्यासाठीं इतिहासाच्या गर्भांतून हें अद्‌भुत प्रतीक जन्म पावलें आहे. त्यांत समग्रता आणि सामंजस्य असल्यामुळें तें सार्वत्रिक श्रद्धेचा विषय बनलें आहे.

भक्त-भाविकांच्या दृढ श्रद्धेनुसार आणि अनुभूतीनुसार दत्तात्रेयाचें स्वरूप अनाद्यनन्त असलें, तरी त्याचा दृश्य इतिहास दोन हजार वर्षांहून

अधिक जुना नाहीं. ख्रिस्तसनोत्तर काळांत संपूर्ण भारतांत भक्तीचा जो वेगवान् स्रोत निर्माण झाला, त्याच्या उगमाच्या कांहींसें आगें-मागें दत्तात्रेय या देवतेचा उद्‌भव झाला असावा, असें माझें निरीक्षण आहे. ख्रिस्त-सनाचें पहिलें सहस्रक ( इ. स. १ ते १००० ) वैचारिक आन्दोलनांनीं, प्रयोगांनीं आणि संघर्षांनीं व्यापलेलें होतें. या काळांत बौद्धधर्मानें तांत्रिक साधनेचें स्वरूप धारण केलें होतें आणि त्या तांत्रिक साधनेच्या जटिल आचारांचा संभार हिंदु संप्रदायांनींहि उत्कटतेनें अंगीकारला होता. रूढ सनातन परंपरेविरुद्ध बौद्ध, जैन आणि हिंदु अशा तिन्ही धर्मकक्षांतील समर्थ साधकांनीं वैचारिक बंड उभारलें होतें. वेदविरोध, वर्णाश्रमातीतता, योगप्राधान्य, गुरुसंस्थेचें महिमान आणि एक प्रकारची उन्मुक्त चिंतन-शीलता या गुणविशेषांनीं भारलेली सिद्धांची मांदियाळी या तिन्ही धर्मांत वावरत होती. या सिद्धांच्या आचार-विचारानें—विशेषतः बौद्ध सिद्धांच्या बंडखोरीनें प्रतिष्ठित साधनाप्रणालीला आणि जीवनमूल्यांना आव्हानच दिलें होतें. या आव्हानानें रूढ सनातन परंपरा अत्यंत अस्वस्थ बनली होती. परंतु या सनातन परंपरेचा एक गुणविशेष असा आहे कीं, ती सनातन असूनहि लवचिक आहे. बंडखोरीपुढें कांहींशी माघार घेईल, शरणागति पत्करील आणि स्वतःचें उदर मोठें करून सारी बंडखोरी त्यांत रिचवून टाकील. थेट उपनिषत्काळापासून या दोन संघर्षशील प्रवृत्तींचा समन्वय घडवीत घडवीत सनातन परंपरा टिकून राहिली आहे. दत्तात्रेयाच्या जडण-घडणींतहि सनातनी आणि विद्रोही या दोन परंपरांचा संघर्ष आणि समन्वय कारणीभूत झाला आहे, हें आपणांस पुढें दिसून येईलच. ख्रिस्त सनाच्या पहिल्या सहस्रकांतील सर्व वैचारिक खळबळीचें आणि प्रतिभावन्तांच्या समन्वयकारी सर्जनशीलतेचें स्पष्ट प्रतिबिंब दत्तदेवतेच्या उदय-विकासांत दिसून येतें.

हें प्रतिबिंब न्याहाळण्यासाठीं ख्रिस्त सनाच्या पहिल्या सहस्रकांतील पुराणें, नव्य उपनिषदें आणि तांत्रिक साधनेचें साहित्य धांडोळून पाहिलें पाहिजे. या साहित्य-संभारांतील दत्तविषयक उल्लेखांचा उपसा करून दत्तात्रेयाचें प्राचीन स्वरूप कसें दिसून येतें, त्याचा ऐतिहासिक दृष्टया विचार आपण या प्रकरणांत करणार आहोंत.

**इतिहास-पुराणांतील दत्तात्रेय :**

प्राचीन कल्पनेप्रमाणें रामायण व महाभारत या ग्रंथांना ‘ इतिहास ’ अशी संज्ञा आहे. या दोन ग्रंथांपैकीं महाभारतांत दत्तात्रेयाचे उल्लेख आढळतात आणि पुराणकाळांतच दत्तात्रेय या देवतेची निर्मिति झाली असल्यामुळें अनेक पुराणांत दत्तात्रेयाची चरित्रकथा वर्णिली आहे. येथें ‘ चरित्रकथा ’ हा शब्द मीं अगदीं स्थूल अर्थानें वापरला आहे. कारण कोणत्याहि पुराणांत दत्तात्रेयाचें साद्यन्त चरित्र वर्णिलेलें नाहीं.

तो विष्णूचा अंश असून अत्रि-अनसूयेचा पुत्र होय, ही गोष्ट मात्र प्रायः सर्वमान्य आहे. परंतु तो अयोनिसंभव आहे कीं अनसूयेच्या उदरीं जन्मला, या बाबतींत मात्र भिन्न मतें आढळतात.बहुतेक पौराणिक उल्लेखांत कार्तवीर्य सहस्रार्जुन त्याच्या कृपाप्रसादानें आणि वरदानानें बलशाली सम्राट् बनला, ही घटना आढळते.

महाभारतांत वनपर्वांत ( ११५.१२ ), शांतिपर्वांत ( ४९.३६.३७ ) आणि अनुशासनपर्वांत ( १५२.५ व १५३.१२ ) दत्तात्रेयानें सहस्रार्जुनावर केलेल्या कृपेचे उल्लेख आहेत. अनुशासनपर्वाच्या ९१ व्या अध्यायांत मात्र एक विशेष उल्लेख आला आहे :

> **स्वायंभुवोऽत्रिः कौरव्य परमर्षिः प्रतापवान् ।**
> **तस्य वंशे महाराज दत्तात्रेय इति स्मृतः ॥ ४ ॥**
> **दत्तात्रेयस्य पुत्रोऽभून्निमिर्नाम तपोधनः ।**
> **निमेश्चाप्यभवत्पुत्रः श्रीमान् नाम श्रिया युतः ॥ ५ ॥**

अत्रीच्या वंशांत जन्मलेल्या दत्तात्रेयाला निमि नांवाचा पुत्र होता आणि निमीला श्रीमान् नांवाचा पुत्र होता, ही दत्तात्रेयाच्या गार्हस्थ्यजीवनाविषयींची साक्ष विशेष चिंतनीय आहे. अन्य पुराणांतून क्वचित् दत्तात्रेयाबरोबर त्याच्या शक्तीचा वास असल्याचें वर्णन आढळत असलें तरी त्यांतून गृहस्थजीवन सूचित होत नाहीं. तसेंच येथें दत्तात्रेय हा ‘ अत्रिपुत्र ’ आहे, असें न म्हणतां तो ‘ अत्रीच्या वंशांतील ’ आहे, असें म्हटलें आहे. येथें उल्लेखिलेला दत्तपुत्र जो निमि त्याचा पुत्र श्रीमान् हा अकालीं मृत्यु पावला. पुत्रशोकानें निमि विव्हळ झाला. या शोकांतून मनःशांति मिळविण्यासाठीं निमीनें श्राद्धकल्पना

निर्माण केली, असें पुढें वर्णिलें आहे. हा अध्याय श्राद्धकल्पाचें माहात्म्य विशद करणारा आहे.

दत्तोऽर्जुनाय तपते सप्तद्वीपमहीशताम् ।
ददौ बाहुसहस्रं च ह्यजेयत्वं रणे तथा ॥

"तप करणाऱ्या कार्तवीर्य अर्जुनाला दत्तात्रेयानें सप्तद्वीपांकित पृथ्वीचें राज्य, सहस्र बाहु आणि युद्धांत अजेयत्व दिलें," ही अग्निपुराणांतील (२७५.५) माहिती इतर पुराणांतून कमी-अधिक विस्तारानें आली आहे. अर्थात् ही माहिती कार्तवीर्यचरित्राच्या अनुषंगानें आलेली आहे. दत्तात्रेयानें कार्तवीर्यावर कृपा करून, त्याला समर्थ बनवून त्याच्या करवीं आपले चरित्र-हेतु सफळ केले. दत्तात्रेयाच्या या अवतार-हेतूंची कल्पना ब्रह्मपुराणांतील (२१३.१०६–११२) खालील उताऱ्यावरून येईल :

भूयो भूतात्मनो विष्णोः प्रादुर्भावो महात्मनः ।
दत्तात्रेय इति ख्यातः क्षमया परया युतः ॥
तेन नष्टेपु वेदेषु प्रक्रियासु मखेषु च ।
चातुर्वर्ण्ये च संकीर्णे धर्मे शिथिलतां गते ॥
अतिवर्धति चाधर्मे सत्ये नष्टेऽनृते स्थिते ।
प्रजासु शीर्यमाणासु धर्मे चाकुलतां गते ॥
सयज्ञाः सक्रियाः वेदाः प्रत्यानीता हि तेन वै ।
चातुर्वर्ण्यमसंकीर्णं कृतं तेन महात्मना ॥

[ जो सर्व भूतमात्राचा अंतरात्मा आहे, त्या विष्णूचा दत्तात्रेय नामक अवतार झाला. हा अवतार क्षमाप्रधान होता. त्यानें वेदांना प्रतिष्ठा मिळवून दिली; यज्ञसंस्थेचें उज्जीवन केलें; चातुर्वर्ण्यातील शैथिल्य दूर केलें; अधर्म आणि असत्य यांचा उच्छेद केला आणि क्षीण होत चाललेल्या प्रजेंत सामर्थ्य निर्माण केलें. ]

याच अवतारहेतूंचें अधिक स्पष्टीकरण विष्णुधर्मोत्तर पुराणांत (१.२५.६–१६) आलें आहे. कार्तवीर्यानें दत्तात्रेयाकडून प्राप्त झालेल्या वरांच्या बळावर राज्य हतकंटक बनविलें आणि आर्यावर्तातील भूमि 'निर्म्लेंच्छ'

केली ("आर्यावर्तेषु निर्म्लेंच्छा कृता तेन वसुन्धरा।"), हा विष्णुधर्मोत्तर-पुराणांतील (१.२५.१६) उल्लेख चिंतनीय आहे.

१. मार्कंडेय पुराणांतील दत्तात्रेय-चरित्र मात्र कांहींसें विलक्षण आहे. या पुराणांत, ब्रह्माविष्णुमहेशांच्या वरदानानें अनुक्रमें सोम, दत्त आणि दुर्वास हे तीन अत्रिपुत्र निर्माण झाले, अशी हकीकत दिल्यावर पुढें एक विलक्षण घटना वर्णिली आहे :

मुनिपुत्रवृतो योगी दत्तात्रेयोऽप्यसङ्गिताम् ।
अभीप्स्यमानः सरसि निममज्ज चिरं प्रभुः ॥
तथापि तं महात्मानमतीव प्रियदर्शनम् ।
तत्यजुर्न कुमारास्ते सरस्तीरमाश्रिताः ॥
दिव्ये वर्षशते पूर्णे यदा ते न त्यजन्ति तम् ।
तत्प्रीत्या सरस्तीरं सर्वे मुनिकुमारकाः ॥
ततो दिव्याम्बरधरां चारुपीननितम्बिनीम् ।
नारीमादाय कल्याणीमुत्ततार जलान्मुनिः ॥
स्त्रीसन्निकर्षाद्येते परित्यक्षन्ति मामिति ।
मुनिपुत्रास्ततोऽसङ्गी स्थास्यामीति विचिन्तयन् ॥
तथापि तं मुनिसुता न त्यजन्ति यदा मुनिम् ।
ततः सह तया नार्या मद्यपानमथापिबत् ॥
सुरापानरतं ते न सभार्यं तत्यजुस्ततः ।
गीतवाद्यादिवनिताभोगसंसर्गदूषितम् ॥
मन्यमाना महात्मानं तया सह बहिष्क्रियम् ।
नावाप दोषं योगीशो वारुणीं स पिबन्नपि ॥ [१]

[ दत्तात्रेयाच्या तेजस्वी स्वरूपामुळें मुनिकुमारांचा मेळा सतत त्याच्या-भोंवतीं वावरत असे. 'अरतिर्जनसंसदि' या वृत्तीमुळें दत्तात्रेयानें त्यांना टाळून एकांतवास मिळविण्यासाठीं एका सरोवरांत बुडी मारली. ते मुनि-कुमार त्या प्रियदर्शन महात्म्याच्या पुनर्दर्शनाची वाट पाहत दीर्घकाळपर्यंत (दिव्ये वर्षशते पूर्णे) सरोवराच्या तीरावर तिष्ठत राहिले. ते आपली

१. मार्कंडेय पुराण, १७.१७–२४.

प्रतीक्षा सोडीत नाहींत, असें पाहून दत्तात्रेय मुनि एका दिव्यवस्त्रें नेसलेल्या अत्यंत सुंदर तरुणीसह जळांतून बाहेर आला. “ आपल्याबरोबर एक स्त्री आहे असें पाहून हे मुनिकुमार आपला त्याग करतील आणि आपल्याला पुनः ‘ असङ्गी ’ अवस्थेंत राहतां येईल ” अशी दत्तात्रेयाची कल्पना होती; परंतु तशाहि अवस्थेंत मुनिकुमार आपणांस सोडून जात नाहींत, असें पाहून त्या तरुणीबरोबर दत्तात्रेयानें मद्यपान करावयास प्रारंभ केला. परंतु “ जो योगेश्वर आहे, त्याला सुरापान वा गीतवाद्यादि वनिताभोग यांच्या संसर्गानें दोष लागत नाहीं, ” अशा विचारानें मुनिकुमारांनीं त्याचा त्याग केला नाहीं.

त्या विष्णुस्वरूप दत्तात्रेयानें योगस्थ बनून विषयांचा उपभोग घेतला ( दत्तात्रेयोपि विषयान् योगस्थो बुभुजे हरिः । ”) असें आणखी एका ठिकाणीं ( १७·१५ ) या पुराणांत उल्लेखिलें आहे.

मार्कंडेय पुराणाच्या अठराव्या अध्यायांत, कार्तवीर्यानें दत्तात्रेयाची कृपा कशी संपादन केली, यासंबंधींची कथा आली आहे. गर्गऋषींनीं कार्तवीर्याला दत्तात्रेयाच्या आराधनेचा उपदेश केल्यावर कार्तवीर्यानें गर्गऋषींना दत्त-कृपेच्या पूर्वप्रत्ययासंबंधीं प्रश्न विचारला. त्यावर गर्गऋषींनीं सांगितलें कीं, पूर्वीं जंभदैत्याच्या विनाशासाठीं देवांनीं दैत्यांशीं युद्ध मांडलें होतें. या युद्धांत देवांचा वर्षभर पराभव होत राहिला. यांतून मार्ग काढण्यासाठीं देवांनीं बृहस्पतीकडे मार्गदर्शनाची विनंति केली. बृहस्पतींनीं देवांना सल्ला दिला :

**दत्तात्रेयं महात्मानमत्रेः पुत्रं तपोधनम् ।**
**विकृताचरणं भक्त्या संतोषमितुमर्हथ ॥**

[ ज्याचें बाह्याचरण विकृत आहे असा अत्रिपुत्र जो तपोधन दत्तात्रेय त्याला तुम्हीं भक्तीनें संतुष्ट करावें. ]

गुरुदेवांच्या सल्लयानुसार देव दत्तात्रेयाच्या आश्रमाकडे गेले, तों तेथें दत्तात्रेय लक्ष्मीसह सुरापान करीत होते आणि गंधर्वांचें गायन चाललें होतें, असें दृश्य त्यांना दिसलें. देवांनीं दत्तात्रेयाला प्रणिपात केला आणि त्याच्या-जवळ आपला हेतु निवेदन केला. त्यावर दत्तात्रेयानें देवांना असें उत्तर दिलें :

**मद्यासक्तोऽहमुच्छिष्टो न चैवाहं जितेन्द्रियः ।**
**कथमिच्छथ मत्तोऽपि देवाः शत्रुपराभवम् ॥**

[मी मद्यासक्त, अपवित्र आणि अजितेन्द्रिय असा आहें. माझ्यापासून तुम्ही शत्रुपराभवाची अपेक्षा कशी धरतां?]

आपल्या शेजारीं बसलेल्या लक्ष्मीकडे निर्देश करून दत्तात्रेय पुढें म्हणाला कीं, स्त्रीसंग हा महान् दोषाला कारणीभूत होतो; आणि मीं तर त्याचें सातत्यानें सेवन केलें असल्यामुळें मी अपवित्र बनलों आहें.]

त्यावर देव लगेच उद्‍गारले :

**अनघस्त्वं जगन्नाथ न लेपस्तव विद्यते ॥ ...**
**अनघेयं द्विजश्रेष्ठ जगन्माता न दुष्यते ।**
**यथांशुमाला सूर्यस्य द्विजचंडालसंगिनी ॥**

[हे जगन्नाथ, तूं दोषरहित आहेस. तुला कोणत्याहि भोगाचा लेप लागत नाहीं. ही जगन्माताहि, द्विज आणि चांडाल यांचा एकसाथ संग करणाऱ्या सूर्यकिरणमालेप्रमाणें सदैव पवित्र आहे.]

पुढें देवांचा पाठलाग करीत दैत्य दत्तात्रेयाश्रमांत आले. तेथें त्यांना लक्ष्मीचें दर्शन झाल्यावर त्यांनीं देवांचा पाठलाग सोडून त्रैलोक्यसुंदरी लक्ष्मीलाच पळवून नेलें. या घटनेनंतर देवांनीं दत्तात्रेयाच्या सहाय्यानें दैत्यांचें पारिपत्य केलें आणि लक्ष्मीस मुक्त केलें.

दत्तकृपेचा हा पूर्वप्रत्यय गर्गमुनींनीं सांगितल्यावर कार्तवीर्य दत्तात्रेयाच्या आश्रमाव गेला. तेव्हां त्यालाहि तिथें पूर्वीप्रमाणेंच 'विकृताचरणी' दत्ताचें दर्शन झालें.

माघकवीच्या 'शिशुपालवध' या महाकाव्यांत ( १४·७९ ) विष्णूच्या अवतारांत दत्तात्रेयाची गणना केली आहे :

**सम्प्रदायविगमादुपेयुषीरेव नाशविनाशिविग्रहः ।**
**स्मर्तुमप्रातिहतस्मृतिः श्रुतीर्दत्त इत्यभवदत्रिगोत्रजः ॥**

या उल्लेखांतील 'अत्रिगोत्रजः' हें विशेषण चिंतनीय आहे. महाभारतांतील 'तस्य वंशे महाराज दत्तात्रेय इति स्मृतः' या उल्लेखाशीं या विशेषणाचें साम्य आहे. दत्तात्रेय हा अत्रिगोत्रांत जन्मलेला कुणी महामुनि असावा आणि त्याचेंच पुराणांत दैवतीकरण झालें असावें, असें यावरून वाटूं लागतें.

मार्कंडेय पुराणांत प्रकट झालेल्या दत्तरूपाचें समर्थन त्याच प्रकरणीं पुराणकारानें कसें केलें आहे, तें आपण पाहिलें. सर्व पुराणांतील दत्त-विषयक सामग्रीच्या मंथनांतून श्रीवासुदेवानंद सरस्वतींनी 'दत्तपुराण' हा संस्कृत ग्रंथ आणि 'दत्तमाहात्म्य' हा मराठी ओवीबद्ध ग्रंथ लिहिला आहे. दत्तात्रेयाच्या विकृताचरणाचें समर्थन 'दत्तमाहात्म्यां'त ते असें करतात :

ईश्वर करी साहस। धर्मव्यतिक्रम खास।
तेजीयस्त्वामुळें दोष। अग्नि निर्दोष ज्यापरी॥
ऐश्वर्य सामर्थ्य नसोन। मूढ एवढा घेई गुण।
तो नष्ट होई न लागतां क्षण। कर्म दारुण गती दे॥
धर्मातीत वागे हर। तो गुण घेती पामर॥
काळकूट जिरवी शंकर। मरे पामर त्या शिवतां।
ईश आणि गुणातीत। धर्माधर्मविवर्जित।
श्रुतीमस्तकीं राहतात। ते वायुवत् निर्दोषी॥
त्यांचीं आचरणें प्रायः न घ्यावीं। वचनें मात्र न टाळावीं।
दोन्हीशीं योग्य तीं पाळावीं। सांभाळावी धर्माहि॥
त्यांचीं सुचरितें घ्यावीं। अशी बोले श्रुति बरवी।
त्याचे सरीस ये न रवी। नर वीर्यहीन कायसा॥
काय सारिखा दिसला तरी। ज्ञानी अज्ञानी यांची न हो सरी॥
हें जाणिजे सुज्ञ चतुरीं। कुतर्क करी तो मूर्ख॥[२]

या सांप्रदायिक समर्थनाचें स्वरूप भागवतकारांनी रासक्रीडेंतील शृंगारातिशयाचें जसें समर्थन केलें आहे, त्यासारखेंच आहे. भागवताच्या दशमस्कंधावर मराठींत टीका लिहिणारे शिवकल्याण, कृष्णदयार्णव इत्यादि प्रख्यात संतकवि या विकृताचरणाचें समर्थन अशाच पद्धतीनें करीत आले आहेत.[३]

आज महाराष्ट्रांत दत्तोपासनेचा प्रसार सर्वत्र झालेला असल्यामुळें दत्तावतारकथा सर्वपरिचित आहेतच.

---

२. दत्तमाहात्म्य, ३·१०१–१०७.

३. श्रीमद्भागवत, १०.३३·३०–३८; हरिवरदा, ३३·३३४–४४५.

येथून पुढें आपण पुराणांत प्रकटलेल्या दत्तात्रेयाच्या अवतार-चरित्राचें क्रमशः स्थूल निरीक्षण करूं.

**विष्णूचा अवतार** : दत्तात्रेय हा विष्णूचा सहावा ( क्वचित् चौथा, वा सातवा ) अवतार समजला जातो.

**माता-पिता** : तो अत्रिऋषि आणि त्याची पत्नी सती अनसूया यांचा पुत्र होय.

**जन्मकथा** : दत्तात्रेयाच्या जन्माविषयीं विविध कथा प्रचालित आहेत. अर्थात् त्या सर्व कथांतून तो अत्रि-अनसूयेचा पुत्र आणि विष्णूचा अंश होय, हें मात्र सर्वमान्य आहे. त्यांतील मुख्य कथा पुढें देत आहें :

१. अत्रिऋषीनें पुत्रप्राप्तीसाठीं त्र्यक्षकुल पर्वतावर घोर तपश्चर्या केली. त्या तपानें त्रिभुवन पोळूं लागलें. अत्रीच्या या प्रखर तपानें संतुष्ट होऊन ब्रह्मा-विष्णु-महेश हे तिन्ही देव त्याच्यासमोर प्रकट झाले आणि त्यांनीं अत्रीला तपाचें कारण विचारलें. अत्रीनें त्यांना विनविलें कीं, " आपण माझ्या उदरीं पुत्ररूपानें जन्म घ्यावा. " तिन्ही देवांनीं त्याची विनंती मान्य केली. देवत्रयीच्या आशीर्वादानें अनुक्रमें ब्रह्मदेवापासून सोम ( चंद्र ), विष्णूपासून दत्त आणि शिवापासून दुर्वास हे तीन पुत्र अनसूयेच्या उदरीं जन्म पावले.

२. अत्रीनें ब्रह्मा-विष्णु-महेशांची पुत्रप्राप्तीसाठीं आराधना केली. ते संतुष्ट झाल्यावर त्यानें देवांना विनविलें कीं, " आपण माझ्या घरीं पुत्ररूपानें जन्म घ्यावा आणि मला एक रूपवती कन्याहि प्राप्त व्हावी. " देवांच्या आशीर्वादानें दत्तात्रेय, सोम, दुर्वास हे तीन पुत्र आणि शुभात्रेयी नांवाची कन्या अत्रीस प्राप्त झाली. ही कथा ब्रह्मपुराणांत आली आहे.[४]

३. प्रतिष्ठान नगरांत कौशिक नांवाचा एक ब्राह्मण राहत असे. तो ब्राह्मण असूनहि नित्य वेश्यासमागम करीत असे. त्याची पत्नी अत्यंत साध्वी असूनहि तो तिची चाड बाळगीत नसे. पुढें त्याला महारोग झाला आणि क्रमानें त्याचीं गात्रें सडूं-झडूं लागलीं. त्याची अशी अवस्था होऊं लागल्यावर वेश्येनें त्याचा स्वाभाविकच त्याग केला. त्यानंतर त्याला कुठेंच

४. ब्रह्मपुराण, १४४.२–४

आसरा मिळेनासा झाल्यावर त्याला पत्नीची आठवण झाली आणि तो घरीं आला. त्याची ती किळसवाणी अवस्था पाहूनहि त्याच्या पत्नीनें त्याची घृणा केली नाही. तिनें मनोभावें त्याची सेवाशुश्रूशा चालविली. अर्थात् ती इतकी सेवापरायण असूनहि कौशिकाच्या मनांत तिच्याविषयीं मुळींच स्नेहभाव नव्हता. त्याच्या ध्यानीं-मनीं त्या वेश्येचें ध्यान असे. एक दिवस त्यानें पत्नीला सांगितलें कीं, " मला त्या वेश्येच्या घरीं घेऊन चल." ती साध्वी त्याला घेऊन रात्रीच्या वेळीं अंधारांतून वाट चालू लागली.

त्याच नगरांत चुकीनें चोर समजून मांडव्य ऋषीला सुळावर चढविलें होतें. मांडव्य ऋषि ध्याननिष्ठ होऊन सुळावरच यातना सहन करीत होते. ही सती अंधारांतून कौशिकाला घेऊन जात असतां मांडव्यऋषीला कौशिकाचा धक्का लागला. त्या धक्क्यानें विव्हळून कौशिकाला त्यांनीं शाप दिला कीं, " सूर्योदय झाल्याबरोबर तूं मरशील." कौशिकपत्नीनें आपल्या पतीला वांचविण्यासाठीं सतीत्वाच्या प्रभावानें सूर्योदयच थांबविला.

यामुळें संपूर्ण विश्वचक्रांतच बिघाड झाला. देव घाबरून ब्रह्मदेवाकडे गेले आणि ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून त्यांनीं सती अनसूयेला या प्रकरणीं मध्यस्थी करावयास सांगितलें. अनुसूयेनें कौशिकपत्नीला अभयाचें आश्वासन देऊन सूर्योदय घडवून आणला. सूर्योदय झाल्यावर मांडव्यांच्या शापामुळें कौशिक मृत्यु पावला; परंतु अनसूयेनें त्याला जिवंत केलें. अनसूयेच्या या कार्यामुळें संतुष्ट झालेल्या देवांनीं तिला आशीर्वाद दिला कीं, " त्रिमूर्ति तुझ्या उदरीं जन्म घेईल."

४. राहूनें सूर्याला ग्रस्त केलें असतां सर्व पृथ्वी अंधारानें व्याप्त झाली. अत्रीनें सूर्याला राहूच्या मगरमिठींतून सोडविलें आणि पुनः पृथ्वी प्रकाशमान् केली. अत्रीच्या या महत्कार्यामुळें संतुष्ट झालेल्या शिव-विष्णूंनीं अनुक्रमें दुर्वास आणि दत्त या रूपानें अत्रीच्या घरीं जन्म घेतला.

या दत्तजन्मकथेला एक वैदिक आधार आहे. ऋग्वेदाच्या पांचव्या मंडलाच्या चाळिसाव्या सूक्तांत पुढील आशयाच्या ऋचा आहेत : " (५) हे सूर्या, जेव्हां तुला राहूनें अंधकारानें ग्रासलें, तेव्हां सर्व लोक वेड्यासारखे झाले आणि त्यांना आपण कोठें आहोंत, हेंहि कळेना. (६) इंद्रा, जेव्हां तूं

आकाशांत चाललेले स्वर्भानूचे ( राहूचे ) कपटप्रयोग नष्ट केलेस, तेव्हां त्या व्रतभ्रष्ट अंधकारानें झांकलेला सूर्य चौथ्या मंत्रानें अत्रीनें प्राप्त केला. (७) सूर्य म्हणतो, हे अत्रे, अशा स्थितींत असलेल्या मला या दुष्टानें भीतीनें किंवा भुकेनें गिळून टाकूं नये. तूं खरें ऐश्वर्य असलेला मित्र आहेस. राजा वरुण आणि तूं असे दोघे माझें संरक्षण करा. (८) स्तोत्रवेत्त्या अत्रीनें ग्रावे एकत्र करून स्तोत्रानें आणि नमस्कार करून देवाची सेवा करीत सर्वांचा नेत्र असलेल्या सूर्याची आकाशांत स्थापना केली आणि स्वर्भानूचा ( राहूचा ) उपद्व्याप नष्ट केला. (९) राहूनें अंधकारानें ज्या सूर्याला ग्रासून टाकलें होतें, त्याला अत्रीनें शोधून काढलें. इतर ते करूं शकले नाहींत. "

दत्तात्रेय हा अत्रिऋषीचा पुत्र आहे, असें कल्पिल्यानंतर वेदकाळापासूनचे अत्रिविषयक उल्लेख दत्तचरित्राच्या संदर्भांत कसकसे गुंफले जाऊं लागले, त्याचा हा एक पुरावा आहे. दत्तात्रेयाच्या अवतार-चरित्रांतील सर्व कथा अशाच प्रकारें जन्म पावल्या आहेत. या बाबतींत सूक्ष्म संशोधन होण्याची आवश्यकता आहे. केवळ दत्तात्रेयाच्या बाबतींतच नव्हे, तर इतर अनेक प्रसिद्ध देवतांच्या चरित्रकथा कसकशा विस्तार पावत गेल्या, याचा इतिहास उद्बोधक व रंजक ठरेल.

५. नारदानें केलेल्या अनसूयेच्या सतीत्वाच्या गौरवामुळें ब्रह्मा-विष्णु-महेशांच्या पत्नींच्या मनांत अनसूयेविषयीं असूया निर्माण झाली. अनसूयेचें सत्त्वहरण करण्यासाठीं त्यांनी आपल्या पतींना अतिथिवेशानें अनसूयेकडे पाठविलें. आश्रमांत अत्रि नव्हते. अनसूयेनें अतिथींना विसांवण्याची विनंति केली. परंतु सत्त्वहरणाच्या हेतूनें आलेल्या देवांनीं तिला सांगितलें कीं, " तूं विवस्त्र होऊन भोजन वाढीत असशील, तरच आम्ही भोजन स्वीकारूं. " अनसूयेनें तें मान्य केलें आणि विवस्त्र होऊन तिन्ही देवांच्या मस्तकांवर पतिस्मरणपूर्वक तीर्थ शिंपडलें. त्याबरोबर त्या तिन्ही देवांचीं लहान बाळें बनलीं. इकडे पतींची वाट पाहून शिणलेल्या देवभार्या पतिशोधार्थ अत्रि-ऋषीच्या आश्रमांत आल्या. त्या शोध घेऊन पाहतात तों अनसूयेनें आपल्या पतींचीं तीन बालकें बनविलीं आहेत. देवभार्यांची विकलावस्था पाहिल्यावर अनसूयेनें देवांना पुन्हा पूर्वरूप दिलें. पूर्वरूप प्राप्त झाल्यावर, अनसूयेच्या

सत्त्वसाक्षात्कारानें चकित झालेल्या देवांनीं तिच्या इच्छेनुसार तिच्या उदरीं जंन्म घेण्याचें मान्य केलें.[५]

**दत्तात्रेयाचे गुरु :** अत्रिऋषीच्या आदेशावरून दत्तात्रेयानें गौतमीच्या तीरावर शंकराची आराधना करून त्याच्याकडून ब्रह्मज्ञान प्राप्त केलें, असें ब्रह्मपुराण सांगतें. दत्तात्रेयाचा बोधदाता आदिनाथ शंकर असल्यामुळेंच कदाचित् नाथसंप्रदायांत ‘ आदिसिद्ध ’ म्हणून दत्तात्रेयाची विशेष प्रतिष्ठा असावी. भागवताच्या एकादश स्कंधांत सांगितलेले अवधूताचे चोवीस गुरु पुढें ‘ दत्तानें केलेले चोवीस गुरु ’ म्हणून समजले जाऊं लागले. ‘ उद्धवगीता ’ ही पहिली मराठी एकादश टीका. ‘ उद्धवगीते ’चा कर्ता भास्करभट बोरीकर हा एक प्रकारें दत्तात्रेयाचाच उपासक. ग्रंथारंभीं त्यानें आपला दत्तात्रेयाविषयींचा आत्यंतिक श्रद्धाभाव व्यक्तहि केला आहे; परंतु भास्करभटानें एकनाथांप्रमाणें अवधूत-यदुसंवादाच्या भागावर मराठींत विवरण लिहितांना अवधूत म्हणजे दत्तात्रेयच, असें मानलेलें नाहीं. याचा अर्थ असा कीं, अवधूतानें केलेल्या चोवीस गुरूंची कथा दत्तात्रेयाच्या चरित्रांत समाविष्ट होण्याचा प्रकार भास्करभटानंतर ( बहुधा प्रथम नाथांच्या एकादश-टीकेंतच ) घडलेला आहे. वास्तविक भागवतांत विष्णूचा अवतार म्हणून अन्यत्र दत्तात्रेयाचे निर्देश असूनहि अवधूत म्हणजे दत्तात्रेय, असें भागवतकारांनीहि सूचित केलेलें नाहीं. अवधूताचें व्यक्तिमत्त्व दत्तात्रेयाशीं साम्य दर्शविणारें असल्यामुळें नाथांनीं आपल्या श्रद्धेनुसार अवधूताला दत्तात्रेय बनवून टाकलें. वाचकांच्या सोयी-साठीं भास्करभटानें केलेलें अवधूत-वर्णन पुढें देत आहें :

**तो अवधुतु : मूर्ती तरि शांतु**
**परि काळासि कृतांतु : होऊनि ठेला**
**तो वैराग्याचा कांतिउं : किं माहातपाचा वोतिउं**
**किं निवृतिचा थळिउं : वोडरला तो**
**किं भक्तिचा वोटकारू : ज्ञानाचा निडारू**

५. भविष्यपुराणांत या कथेतील विकृताचार अधिकच भडक स्वरूपांत वर्णिलेला आहे. “ लिङ्गहस्तः स्वयं रुद्रो विष्णुस्तदरसवर्धनः । ब्रह्मा कामब्रह्मलोपास्थितस्तस्या वशं गतः । रतिं देहि मदाघूर्णे नो चेत् प्राणास्त्यजाम्यहम् ॥ मोहितास्तत्र देवा गृहीत्वा तां बलात्तदा । मैथुनाय समुद्योगं चक्रुर्मायाविमोहिताः ॥ ”

नां तरि जगासि पुढारु : मोक्षाचा तो
तो वीवेकु वेठला : किं प्रबोधु बोधला
नां तरि योगुचि मूर्तीसि आला : अवधुतवेषें
तो जगा वेगळा : असे योगि लीळा :
विचरे एकला : महि मंडळीं[६]

भागवतांतील एकादशस्कंधाच्या ७ ( श्लोक २५ पासून ) ते ९ या अध्यायांत अवधूताच्या चोवीस गुरूंचें प्रकरण आहे. सर्व चराचर विश्व हाच साधकाचा गुरु आहे, असें या प्रकरणीं सूचित केलें आहे. साधकास साधनेच्या वाटचालींत आवश्यक असलेल्या गुणांचा निर्देश या चोवीस गुरूंच्या द्वारां केला आहे. " सहिष्णुता, धैर्य, परोपकार ( पृथ्वी, पर्वत, वृक्ष ), अनासक्ति, वैराग्य, अलिप्तता ( वायु, आकाश, देह ), स्निग्धता, माधुर्य ( पाणी ), तेजस्विता, मलनाश ( अग्नि ), दुर्गुणांचा परिहार व सद्गुणांचा उदंड व्यवहार ( सूर्य ), स्त्रीसंगाचा त्याग ( कपोत, पतंग, हत्ती, हरिण ), यदृच्छालाभसंतोष ( अजगर ), अक्षुब्धता, प्रसाद, गांभीर्य, लाभालाभविषयक समान दृष्टि ( समुद्र ), असंग्रह; अपरिग्रह ( माशी, मध-माशी, कुरर, सर्प ), स्वावलंबनानें स्वोद्धार ( पिंगला ), एकांतरुचि ( कुमारी ), खाद्यपेयांसंबंधानें संयम ( मासा ), एकांतिक एकाग्र ध्यान, ( इषुकार, भिंगुरटी ), कर्त्या-संहर्त्या ईश्वराचें ज्ञान ( कोळी, कांतीण ), मानापमानाची समान दृष्टि ( बालक ) असे गुण त्या त्या चराचर गुरूकडून दत्तात्रेयानें मिळविले आहेत. नाथ या विश्वात्मक गुरुसंस्थेविषयीं भाष्य करतांना म्हणतात :

जो जो जयाचा घेतला गुण । तो तो म्यां गुरु केला जाण ।
गुरूंसी आलें अपारपण । जग संपूर्ण गुरु दिसे ॥
ज्याचा गुण घेतला । तो सहजें गुरुत्वा आला ।
ज्याचा गुण त्यागरूपें घेतला । तोहि गुरु झाला अहितत्यागें ॥[७]

हा अवधूत म्हणजेच दत्तात्रेय, असें नाथांनीं आपल्या दृढश्रद्धेतून सांगितलें आहे :

---

६. उद्धवगीता, २५०–२५४.
७. एकनाथी भागवत, ७.३४१–४२.

तो अवधूत जाण दत्तात्रेया । तेणें आलिंगूनि यदुराया ।
निजरूपाचा बोधु तया । अनुभवावया दीधला ॥ [८]

हे अवधूताचे चोवीस गुरु पुढें कायमचेच दत्त-चरित्रांत समाविष्ट झाले.

**दत्तात्रेयाचे शिष्य :** सहस्रार्जुन, कार्तवीर्य, भार्गव, परशुराम, यदु, अलर्क, आयु आणि प्रल्हाद हे दत्तात्रेयाचे पौराणिक शिष्य समजले जातात. यांच्यावर दत्तात्रेयानें केलेल्या कृपेचे विस्तृत वृत्तान्त पुराणांत आढळतात. ' अवधूतोपनिषद् ' आणि ' जाबालदर्शनोपनिषद् ' या दोन उपनिषदांत उल्लेखिलेला सांकृति नामक आणखी एक दत्तशिष्य आहे. पुराणांतील सर्व शिष्य क्षत्रिय पेशांतले आहेत, तर उपनिषदांतला हा ' सांकृति ' योगसाधना आचरणारा ब्राह्मण आहे.

**निवास आणि विहार :** दत्तात्रेयानें अत्रिऋषीच्या आदेशानुसार गौतमीच्या कांठीं शिवाची उपासना करून योगसिद्धि आणि ब्रह्मज्ञान प्राप्त केलें.[९] दत्तात्रेयाचा आश्रम सिंहाचळाजवळ प्रयागवनांत असे. तो स्वेच्छा-विहारी आहे. माहूर, पांचाळेश्वर, कोल्हापूर हीं त्याचीं विहारस्थानें आहेत. यांतील माहूर हें पुरातन दत्तक्षेत्र दत्तात्रेयाचें शयनस्थान समजलें जातें. तो पांचाळेश्वरीं स्नान करतो आणि कोल्हापुरीं भिक्षाटन करतो, अशी श्रद्धा रूढ आहे.

**दत्तात्रेयाचे अवतार :** दत्तात्रेयानें निरनिराळ्या निमित्तांनीं सोळा अवतार घेतले. त्या सोळा अवतारांचीं नांवें आणि जन्मतिथी पुढीलप्रमाणें आहेत : १. योगिराज ( कार्तिक शु. १५ ), २. अत्रिवरद ( कार्तिक कृ. १ ), ३. दत्तात्रेय ( कार्तिक कृ. २ ), ४. कालाग्निशमन ( मार्गशीर्ष शु. १४ ), ५. योगिजनवल्लभ ( मार्गशीर्ष शु. १५ ), ६. लीलाविश्वंभर ( पौष शु. १५ ), ७. सिद्धराज ( माघ शु. १५ ), ८. ज्ञानसागर ( फाल्गुन शु. १० ), ९. विश्वंभर ( चैत्र शु. १५ ), १०. मायामुक्त ( वैशाख शु. १५ ), ११. मायायुक्त ( ज्येष्ठ शु. १३ ), १२. आदिगुरु ( आषाढ शु. १५ ), १३. शिवरूप ( श्रावण शु. ८ ), १४. देवदेव ( भाद्रपद

८. एकनाथी भागवत, ९.४२९.
९. ब्रह्मपुराण, अ. ११७.

शु. १४ ), १५. दिगंबर ( आश्विन शु. १५ ), १६. कृष्णश्यामकमलनयन ( कार्तिक शु. १२ ). या सोळा अवतारांच्या कथा सांगणारा संस्कृत ग्रंथ ( ' श्रीदत्तात्रेयषोडशावताराः ' ) श्रीवासुदेवानंद सरस्वतींनीं लिहिलेला आहे. दासोपंतांच्या परंपरेंतील उपासनेंत या सोळा अवतारांचे जन्मोत्सव पाळले जातात. त्या परंपरेंत दासोपंतांना सतरावा सर्वज्ञावतार मानण्यांत येतें. दत्त-संप्रदायांत इतिहासकाळांतील पहिले दत्तावतार श्रीपाद श्रीवल्लभ आणि दुसरे दत्तावतार श्रीनरसिंह सरस्वती समजले जातात. त्याचप्रमाणें अक्कलकोटचे स्वामी महाराज आणि श्रीमाणिकप्रभु हेहि दत्तावतार मानले जातात.

**दत्तप्रणीत ग्रंथरचना :** ' अवधूतोपनिषद् ' आणि ' जाबालदर्शनोपनिषद् ' यांतील बोध दत्तप्रणीत असल्याची भूमिका त्या उपनिषदांत मांडलेली आहे. ' अवधूतगीता ' हा प्रसिद्ध सांप्रदायिक ग्रंथ दत्त-प्रणीत समजला जातो. तंत्रग्रंथांत ' त्रिपुरोपास्तिपतिः ' या नांवाचा ग्रंथ दत्तात्रेयानें केला असल्याची कथा ' त्रिपुरारहस्य ' या ग्रंथांत आली आहे. 'परशुरामकल्पसूत्रम्' हा ग्रंथ दत्तप्रणीत तंत्रविज्ञानाचें सार होय, असें मानलें जातें.

### अर्वाचीन उपनिषदांतील दत्तात्रेय :

कांहीं अर्वाचीन उपनिषदांत दत्तात्रेयाचे उल्लेख आले आहेत. पण या अर्वाचीन उपनिषदांचा काल ठरविणें अशक्य आहे. प्राचीन दशोपनिषदांनंतर उपनिषदांची संख्या वाढतां वाढतां दोनशेंच्या वर गेली. प्राचीन उपनिषदांचें प्रामाण्य प्रस्थापित झाल्यानंतर अनेकांनीं आपापल्या मत-प्रचारासाठीं उपनिषदांची रचना केली आणि आपल्या मताला ' श्रुतीचा आधार ' असल्याचा आभास निर्माण केला. असा प्रयत्न करतांना उपनिषदांतील निवेदन-पद्धति, भाषा आणि आरुणि-याज्ञवल्क्यादि औपनिषदिक ऋषींचीं नांवें वापरून प्राचीनतेचा आव आणण्याचें तंत्रहि या अर्वाचीन मत-प्रचारकांनी हाताळलें आहे. त्यामुळें या उपनिषदांच्या कालनिर्णयाचा प्रयत्न अवघड होऊन बसला आहे.

परंतु या मुखवट्यांना अनेक छिद्रेंहि आहेत. भाषेच्या आर्षतेचें अनुकरण करण्याचा प्रयत्न होऊनहि अर्वाचीनतेच्या खुणा भाषेंत स्पष्ट आहेत. ती अनेकदां साधी, सोपी व काव्यात्म स्वरूप पावलेली आहे. शिवाय या सर्व

अर्वाचीन उपनिषदांत मध्ययुगांत महत्त्व पावलेल्या शैव, वैष्णव, शाक्त देवता आणि संन्यास-योगादि साधना-पद्धति यांचा प्रचार आहे. या अन्तः-प्रमाणांवरून त्यांच्या काळासंबंधीं कांहीं अनुमान बांधणें शक्य आहे. . . .

दत्तात्रेय हा योगमार्गाचा उपदेष्टा समजला जातो. दत्तात्रेयाचा संबंध आलेलीं उपनिषदें हीं साधारणतः 'योग उपनिषदां'च्या गटांत समाविष्ट होणारीं आहेत. हीं 'योग उपनिषदें' उपनिषदांच्या रचनाक्रमांत अगदीं अखेरीस निर्माण झालीं, असें तज्ज्ञांचें मत आहे. उपनिषदांचा विख्यात अभ्यासक डॉ. डायसन यानें कालक्रमानुसार उपनिषदांचे जे चार गट केले आहेत, त्यांतील शेवटच्या 'आथर्वण उपनिषदां'त या योग-उपनिषदांचा समावेश होतो.[१०] या योग-उपनिषदांचें सूक्ष्म निरीक्षण केलें, तर असें आढळून येतें की, यांतील बरींच उपनिषदें गोरखनाथ आणि त्याचा योगप्रधान नाथ संप्रदाय यांच्या प्रभावांतून निर्माण झालीं असावींत. निदान, गोरखनाथा-पूर्वीं योग आणि तंत्र या उभयविध साधनांनीं जी सिद्ध संस्कृति भारताच्या सर्व भागांत निर्माण झाली होती, तिच्या प्रभावाखालीं हीं उपनिषदें निर्माण झालीं असावीं. गोरखनाथाचा काळ इ. स. १०५० ते ११५० या दरम्यान असल्यामुळें, प्रस्तुत उपनिषदांची रचना इसवी सनाच्या पांचव्या शतकापासून दहाव्या शतकापर्यंत होत राहिली असावी, असें विधान करणें अतिशयोक्तीचें ठरणार नाहीं. गोरखनाथ आणि त्याचा नाथ-संप्रदाय यांचा दत्तात्रेयाशीं संबंध जोडला जातो, ही गोष्टहि या संदर्भांत चिंतनीय आहे. योग-उपनिषदांतील अनेक उपनिषदें गोरक्षोपदिष्ट आणि गोरक्षोत्तर योगप्रणालीशीं जुळतीं आहेत, हें निरीक्षणान्तीं सहज दिसून येईल. 'गोरक्ष-सिद्धान्तसंग्रह' या गोरक्ष-मताच्या सर्वसंग्राहक ग्रंथांत बहुतेक सर्व योग-उपनिषदांतील अवतरणें प्रमाणभूत म्हणून वापरलीं आहेत. परंतु योग-उपनिषदें आणि नाथ संप्रदाय यांच्या अनुबंधाचा हा विषय स्वतंत्र चर्चेचा असल्यामुळें त्याचा विस्तार येथें कर्तव्य नाहीं.

शांडिल्योपनिषद्, भिक्षुकोपनिषद्, अवधूतोपनिषद्, जाबालदर्शनो-पनिषद् आणि दत्तात्रेयोपनिषद् या पांच उपनिषदांत दत्तात्रेयाचे उल्लेख

१०. फिलॉसफी ऑफ् उपनिषत्स, पृ. २१-२६.

येतात. इ. स. १००० किंवा त्यापूर्वी कांहीं काळ निर्माण झालेलीं हीं उपनिषदें प्रस्तुत विषयाच्या दृष्टीनें पुराण-कालांत पडतात. या पांच उपनिषदांत प्रकट झालेलें दत्तस्वरूप आपण क्रमशः पाहूं.

१. **शांडिल्योपनिषद्** : या योगपर उपनिषदाच्या अखेरीस (तृतीयाध्याय) ‘ दत्तात्रेय ’ या नांवाची व्युत्पत्ति दिली आहे : “ अथ कस्मादुच्यते दत्तात्रेय इति ” असा प्रश्न उपस्थित करून, “ यस्मात्सुदुश्चरं तपस्तप्यमानायात्रये पुत्रकामायातितरां तुष्टेन भगवता ज्योतिर्मयेनात्मैव दत्तो यस्माच्चानसूयायामत्रेस्तनयोऽभवत्तस्मादुच्यते दत्तात्रेय इति । ” पुत्रप्राप्तीसाठीं प्रखर तप करणाऱ्या अत्रीला प्रसन्न झालेल्या भगवंतानें जो आत्मरूप पुत्र दिला आणि ज्याचा जन्म अनसूयेच्या पोटीं झाला, तो दत्तात्रेय ), असें ‘ दत्तात्रेय ’ या नांवाचें स्पष्टीकरण दिलें आहे. यानंतर दत्तात्रेयाचें स्वरूपवर्णन करणारे चार श्लोक आहेत :

दत्तात्रेयं शिवं शान्तमिन्द्रनीलानिभं प्रभुम् ।
आत्ममायारतं देवमवधूतं दिगम्बरम् ॥ १ ॥
भस्मोद्धूलितसर्वाङ्गं जटाजूटधरं विभुम् ।
चतुर्बाहुमुदाराङ्गं प्रफुल्लकमलेक्षणम् ॥ २ ॥
ज्ञानयोगनिधिं विश्वगुरुं योगिजनप्रियम् ।
भक्तानुकम्पिनं सर्वसाक्षिणं सिद्धसेवितम् ॥ ३ ॥
एवं यः सततं ध्यायेद्देवदेवं सनातनम् ।
स मुक्तः सर्वपापेभ्यो निःश्रेयसमवाप्नुयात् ॥ ४ ॥[११]

वरील वर्णनानुसार दत्तात्रेय हा विष्णूप्रमाणें चतुर्भुज ( आणि एकमुख ) आहे. तो विशालकाय ( उदाराङ्ग ) असून त्याची कांति इंद्रनीलाप्रमाणें आहे. त्याचे डोळे प्रफुल्ल कमलांप्रमाणें आहेत. त्याचें स्वरूप शिव आणि शान्त आहे. तो सनातन, प्रभु, देवदेव, आत्ममायारत, भक्तांवर करुणा करणारा ( भक्तानुकम्पी ) आणि सर्वसाक्षी आहे. आणि विशेष म्हणजे तो ज्ञानयोगाचा निधि, विश्वाचा गुरु, योगिजनांना प्रिय व सिद्धांना सेव्य, सर्वांगाला भस्म फासलेला आणि जटाजूटधारी असा अवधूत दिगम्बर आहे. त्याची उपासना करणारा सर्व पापांपासून मुक्त होऊन निःश्रेयस प्राप्त करतो.

---

११. शाण्डिल्योपनिषद्, ३ १-४.

**२. भिक्षुकोपनिषद् :** या लहानशा उपनिषदांत मोक्षार्थी भिक्षूंचे कुटीचक, बहूदक, हंस आणि परमहंस असे चार वर्ग कल्पिले असून, त्यांतील परमहंसांच्या वर्गात दत्तात्रेयाची गणना केली आहे :

"अथ परमहंसा नाम संवर्तकारुणिश्वेतकेतुजडभरतदत्तात्रेयशुकवामदेवहारीतकप्रभृतयोऽष्टौ ग्रासोश्चरन्तो योगमार्गे मोक्षमेव प्रार्थयन्ते। वृक्षमूले शून्यगृहे श्मशानवासिनो वा साम्बरा वा दिगम्बरा वा। न तेषां धर्माधर्मौ लाभालाभौ शुद्धाशुद्धौ द्वैतवर्जिता समलोष्टाश्मकाञ्चनाः सर्ववर्णेषु भैक्षाचरणं कृत्वा सर्वत्रात्मैवेति पश्यन्ति। अथ जातरूपधरा निर्द्वन्द्वा निष्परिग्रहाः शुक्लध्यानपरायणा आत्मनिष्ठाः प्राणसंधारणार्थे यथोक्तकाले भैक्षमाचरन्तः शून्यागारदेवगृहतृणकूटवल्मीकवृक्षमूलकुलालशालाग्निहोत्रशालानदीपुलिनगिरि-कन्दर-कुहर-कोटर-निर्झर-स्थण्डिले तत्र ब्रह्ममार्गे सम्यक्सम्पन्नाः शुद्धमानसाः परमहंसाचरणेन संन्यासेन देहत्यागं कुर्वन्ति ते परमहंसा नाम।"

या उपनिषदानुसार दत्तात्रेय हा विरागी, मुक्तविहारी, निर्द्वन्द्व, निष्परिग्रह आत्मनिष्ठ, सर्व वर्णांची भिक्षा स्वीकारणारा, ब्रह्ममार्गात सम्यक्सम्पन्न असा एक परमहंस संन्यासी आहे.

**३. अवधूतोपनिषद् :** सांकृति नामक एक शिष्य भगवान् अवधूत दत्तात्रेयाजवळ जाऊन त्याला विचारतो : "अवधूताची स्थिति, लक्षण आणि संसरण कसें असतें?" त्यावर परमकारुणिक दत्तात्रेयानें अवधूताचीं जीं लक्षणें विवरिलीं, तींच या उपनिषदाचा विषय बनलीं आहेत.

अक्षरत्वाद्वरेण्यत्वाद्धूतसंसारबन्धनात्।
तत्त्वमस्यादिलक्ष्यत्वादवधूत इतीर्यते ॥ १ ॥
यो विलङ्घ्याश्रमान्वर्णानात्मन्येव स्थितः सदा।
अतिवर्णाश्रमी योगी अवधूतः स कथ्यते ॥ २ ॥

अशी प्रारंभींच अवधूताची व्याख्या दिली आहे. हा 'अतिवर्णाश्रमी' अवधूत योगी स्वैरविहारी, दिगंबर, धर्माधर्मादिद्वन्द्वरहित असतो. रसशोषक सूर्य किंवा सर्वभक्षक अग्नि यांच्याप्रमाणें सर्व विषय भोगूनहि तो निर्लेप राहतो. उदाहरणार्थ, सुरापान, सुवर्णचौर्य, ब्रह्महत्या इत्यादि पापांनींहि तो निर्द्वन्द्व योगी बद्ध बनूं शकत नाहीं.

**४. जाबालदर्शनोपनिषद् :** या उपनिषदाची रचनाहि सांकृतीच्या अष्टांगयोगाच्या जिज्ञासेपोटीं झालेली आहे :

> दत्तात्रेयो महायोगी भगवान् भूतभावनः ।
> चतुर्भुजो महाविष्णुर्योगसाम्राज्यदीक्षितः ॥ १ ॥
> तस्य शिष्यो मुनिवरः सांकृतिर्नाम भक्तिमान् ।
> पप्रच्छ गुरुमेकान्ते प्राञ्जलिर्विनयान्वितः ॥ २ ॥
> भगवन् ब्रूहि मे योगं साष्टाङ्गं सप्रपञ्चकम् ।
> येन विज्ञातमात्रेण जीवन्मुक्तो भवाम्यहम् ॥ ३ ॥

याप्रमाणें दत्तात्रेयाचें स्वरूप ' चतुर्भुज महाविष्णु, भगवान्, भूतभावन, योगसाम्राज्य-दीक्षित, महायोगी ' असें आहे. त्याचा शिष्य जो सांकृति तो मुनिवर असून भक्तिमान् आहे आणि त्याला जीवन्मुक्तीसाठीं अष्टांग-योगाची जिज्ञासा आहे. ६ व्या खंडाच्या ४१ व्या श्लोकांत त्याला ' विप्रेन्द्र ' असेंहि दत्तात्रेयानें संबोधलें आहे. प्रत्यक्ष दत्तात्रेय आपल्या या समर्थ शिष्याला ' महामुनि ', ' मुनिपुङ्गव ' या शब्दांनी गौरवीत आहे. या सांकृतीच्या जिज्ञासेवरून दत्तात्रेयानें यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधि हीं योगाचीं अष्टांगें अत्यंत प्रसन्न भाषेंत सुस्पष्टपणें विवरून सांगितलीं आहेत. १० खंडांत विभागलेलें २२४ श्लोकांचें हें उपनिषद् म्हणजे जणुं ' अष्टाङ्गयोगसार ' आहे.

**५. दत्तात्रेयोपनिषद् :** हें उपनिषद् मंत्रात्मक आहे.

जो या मंत्रांची नित्य उपासना करतो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो, अशी शेवटीं फलश्रुति दिली आहे. अर्थातच या सर्व मंत्रांची देवता दत्तात्रेय ही आहे.

या पांच उपनिषदांचें एकत्र निरीक्षण केलें तर दत्तात्रेयाविषयीं आपणांस खालील गोष्टी समजून येतात :

१. दत्तात्रेय हा अत्रिऋषीचा अनसूयेच्या पोटीं जन्मलेला पुत्र होय.

२. अत्रिऋषीनें पुत्रप्राप्तीसाठीं केलेल्या तपामुळें प्रसन्न झालेल्या विष्णूनें अत्रीच्या घरीं अवतार धारण केला.

३. म्हणजेच दत्त हा विष्णुस्वरूप असून तो चतुर्भुज व एकमुखी आहे.

४. तो विष्णूचा अवतार असूनहि मुक्त विहरण करणारा दिगंबर योगी आहे.

५. योगमार्गाचा उपदेष्टा म्हणून त्याचें स्थान सर्वोच्च आहे. तो विश्वगुरु आहे.

६. दत्तात्रेयाचा सांकृति नामक एक अधिकारी शिष्य होता. तो ब्राह्मण जातीचा आणि 'महामुनि' पद पावलेला होता. दत्तात्रेयानें त्याला अवधूत-लक्षणें आणि अष्टांगयोग सांगितला.

याचा अर्थ असा की, या उपनिषदांच्या रचनाकाळापर्यंत (सुमारें इ. स. १००० ) दत्तात्रेय त्रिमूर्तिस्वरूप पावला नव्हता. तो विष्णूचा अवतार असला तरी गुरुप्रधान योगमार्गाचा उपदेष्टा असा अवधूत दिगंबर योगी आहे. त्याचें विहरण वर्णाश्रमांच्या कक्षा न मानणारें आहे.

## दत्तात्रेय आणि शाक्त तांत्रिक उपासना :

मार्कंडेय पुराणांत दत्तात्रेय 'दिव्याम्बरधरा' आणि 'चारुपीननितम्बिनी' अशा नारीबरोबर मद्यपान करीत आहे, असें दृश्य चितारलें आहे, हें आपण मागें पाहिलें. संप्रदायांतील अधिकारी पुरुष या दृश्याचें समर्थन कसें करतात, तेंहि आपण पाहिलें. ( पृ. ८ व ९ ) या समर्थनाचें सूचन प्रत्यक्ष मार्कंडेय पुराणाच्या त्या कथाभागांत आहेच. हें समर्थन ध्यानीं घेऊनहि असें वाटतें कीं, दत्तात्रेय ही देवता मूलतः शाक्त तांत्रिक वातावरणांत निर्माण झाली असावी.

वास्तविक दत्तात्रेय हा विष्णुरूप आहे. त्यामुळें उत्तरकालीन वैष्णव-संप्रदायांप्रमाणें दत्तात्रेयाचें स्वरूप विष्णूसारखें षड्गुणैश्वर्यसंपन्न असें जाण-वावयास हवें. परंतु दत्तात्रेय हा राजराजेश्वर विष्णूसारखा सालंकृत सुंदर नसून शिवासारखा जटाजूटधर, स्वेच्छाविहारी, अवधूत-दिगंबर जोगी आहे. मार्कंडेय पुराणांतील दत्तात्रेय हा तर एखाद्या शाक्त सिद्धासारखा भासतो. तो 'योगरथ' असल्यामुळें स्त्री आणि मद्य यांचा भोग घेऊनहि निर्लेप आहे. शाक्तांच्या प्रसिद्ध पंचमकारांपैकीं मद्य आणि मैथुन या दोन प्रभावी मकारांचें येथील अस्तित्व चिंतनीय आहे.

तंत्रग्रंथांच्या निर्मात्यांत दत्तात्रेयाचें स्थान सर्वोच्च समजलें जातें. विशेषतः त्रिपुरसुंदरीची उपासना दत्तात्रेयानें प्रवर्तित केली, असा रूढ समज आहे. 'त्रिपुरारहस्य' या तंत्रग्रंथाचा ज्ञानखंड[१२] दत्तात्रेय-भार्गव-संवादात्मक आहे. त्रिपुरोपासनेवरील दुसरा प्रमाणग्रंथ 'परशुरामकल्पसूत्र' हाहि दत्तात्रेय-प्रणीतच समजला जातो. हा ग्रंथ श्रीविद्येच्या (शक्त्युपासनेच्या) क्षेत्रांतील सार-भूत ग्रंथ (Digest) आहे. या ग्रंथावर अनेक टीका झाल्या आहेत. उपलब्ध टीकांतील पहिली टीका 'नित्योत्सवः' या नांवाची आहे. या टीकेचा कर्ता उमानन्दनाथ हा विश्वामित्रगोत्री महाराष्ट्रीय ब्राह्मण तंजावरच्या राज-सभेतील पंडित होता. विख्यात तंत्राचार्य भासुरानन्दाचा हा शिष्य. त्यानें ही टीका इ. स. १७७५ मध्यें लिहिली. दुसरी टीका 'सौभाग्योदयः' या नांवाची असून तिचा कर्ता रामेश्वर (इ. स. १८३१) हा भासुरानन्द-नाथाचा प्रशिष्य होता. तिसरी टीका 'सूत्रतत्त्वविमार्शिणी' या नांवाची असून तिची रचना अगदीं अलीकडे (इ. स. १८८८) लक्ष्मणशास्त्री रानडे नामक पंडितानें केली आहे.

या लक्ष्मणशास्त्र्यांनीं परशुरामकल्पसूत्राच्या निर्मितीचा खुलासा करण्या-साठीं 'त्रिपुरारहस्यां'तील एक उतारा आपल्या टीकेंत दिला आहे :

नारदं प्रति सुमेधोक्तिः —

आदौ श्रीदत्तगुरुणा शिष्याणां हितकाम्यया ।
स्वनाम्ना संहिता चक्रे त्रिपुरोपास्तिपद्धतिः ॥ १ ॥
अष्टादशसहस्राणि ग्रन्थतोऽभूच्च संहिता ।
अधीत्य तां जामदग्न्यः विस्तृतां सागरोपमाम् ॥ २ ॥
गम्भीरगूढतात्पर्यां मन्दानां तत्र वै गतिम् ।
मत्वा सुदुर्लभां भूयः संक्षिप्य विशदाशयम् ॥ ३ ॥
निर्ममे सूत्रजालं वै पञ्चाशत्खण्डमाण्डितम् ।
तद्गुरोर्यज्जामदग्न्यादधीतं सूत्रमण्डलम् ॥ ४ ॥

---

१२. त्रिपुरारहस्याच्या ज्ञानखंडाचें मराठी रूपांतर श्री. बा. भा. जोशी यांनीं 'दत्तभार्गवसंवाद' या नांवानें केलें आहे.

अधीत्य संहितां चापि तत्पश्चाद्गुरुनामतः ।
सूत्रजाले संहितायाः प्रतिबिम्बात्मकेऽभवत् ॥ ५ ॥
ग्रन्थतः षट्सहस्रं तु सूत्रं तदपि संस्थितम् ।
संहितार्थस्य संक्षेपात्मकं सूत्रमुदाहृतम् ॥ ६ ॥
संहितासूत्रयोः सारं संगृहीते मया मुने ।
तद्दत्तरामसंवादात्मकमेव पुरा कृतम् ॥ ७ ॥

दत्तात्रेयानें 'त्रिपुरोपासितपद्धतिः' नामक अठरा हजार श्लोकांची जी संहिता निर्माण केली होती, तिचा सुलभ संक्षेप करण्यासाठीं परशुराम-कल्पसूत्राची रचना झाली, असा वरील उताऱ्याचा आशय आहे.

याचा मथितार्थ असा कीं, दत्तात्रेय हा त्रिपुरोपासनेचा मूलप्रवर्तक समजला जातो. त्रिपुरसुंदरीच्या उपासनेचा उद्भव दक्षिणेंत झाला आणि नंतर तिचा प्रसार[२] काश्मीरपर्यंत झाला, असें तज्ज्ञांचें मत आहे. शंकराचार्यांची स्फुट रचना जर खरोखरच त्यांची असेल, तर ते एक त्रिपुरोपासक शाक्त होते, असें सिद्ध होईल.[१३] त्यांच्या भक्तिस्तोत्रांत 'त्रिपुरसुंदरी'चीं दोन स्तोत्रें आहेत. शिवाय 'सौंदर्यलहरी' हें त्यांच्या नांवावर असलेलें अत्यंत लोकप्रिय स्तोत्र शक्तिमहिमा वर्णन करणारें आहे. त्यांच्या त्रिपुरसुंदरी-स्तोत्रांतील खालील कांहीं भाग चिंतनीय आहे :

कुचाञ्चितविपञ्चिकां कुटिलकुन्तलालङ्कृताम् ।
कुशेशयनिवासिनीं कुटिलचित्तविद्वेषिणीम् ।
मदारुणविलोचनां मनसिजारिसम्मोहिनीम् ।
मतङ्गमुनिकन्यकां मधुरभाषिणीमाश्रये ॥ ५ ॥
स्मरेत्प्रथमपुष्पिणीं रुधिरबिन्दुनीलाम्बराम् ।
गृहीतमधुपात्रिकां मधुविघूर्णनेत्राञ्चलाम् ।

---

१३. शंकराचार्यांच्या पीठांत 'श्रीचक्रपूजा' हा शाक्त उपासनाविशेष आजपर्यंत रूढ आहे. तसेंच माहूर येथील आद्य दत्तस्थानाची व्यवस्था शृंगेरी पीठांतील शांकर सांप्रदायिकांकडे चालत आलेली आहे. शंकराचार्यांच्या नांवावर एक दत्तात्रेयस्तोत्रहि आढळतें. (समर्थ वाग्देवता मंदिर, बा. क्र. १६२१.)

घनस्तनभरोन्नतां गलितचूलिकां श्यामलाम् ।
त्रिलोचनकुटुम्बिनीं त्रिपुरसुन्दरीमाश्रये ॥ ६ ॥[१४]

या त्रिपुरास्तुतींतील 'मदारुणविलोचना', 'गृहीतमधुपात्रिका', 'मधु-विघूर्णनेत्राञ्चला' हीं विशेषणें मुद्दाम ध्यानीं घेण्यासारखीं आहेत.

अर्वाचीन उपनिषदांच्या संभारांत 'त्रिपुरतापिन्युपनिषद्' आणि 'त्रिपुरोपनिषद्' अशीं दोन त्रिपुरोपासक उपनिषदें आहेत. या सर्व त्रिपुरोपासनापर साहित्यांत त्रिपुरसुन्दरीला महालक्ष्मी, रेणुका, भुवनेश्वरी, इत्यादि अन्य शक्तिवाचक संबोधनांनीहि बाहिलें आहे.

श्रीविद्या सिद्धविद्या च मातङ्गी भुवनेश्वरी ।
आसुरी सुमुखी चैव रेणुका च सरस्वती ।[१५]

अशीं त्रिपुरेची अनेक नांवें 'नित्योत्सवां'त आली आहेत. यांतील 'मातङ्गी' हें विशेषण शंकराचार्यांच्या स्तोत्रांतील 'मतङ्गमुनिकन्यका' या विशेषणाशीं एकरूप आहे. त्रिपुरतापिन्युपनिषदांत तिला अनेकदां 'महालक्ष्मी' या नांवानें संबोधिलें आहे.

यावरून एक महत्त्वाची गोष्ट दिसून येते ती ही की, दत्तात्रेयचरित्राशीं संबंधित असलेलीं माहूर, कोल्हापूर, औदुंबर हीं महाराष्ट्रांतील स्थानें मूलतः प्राचीन शक्तिपीठें आहेत. माहूरची रेणुका, कोल्हापूरची महालक्ष्मी आणि औदुंबरची भुवनेश्वरी या तीनहि शक्तिदेवता आहेत. त्रिपुरसुंदरीच्या नाम-गणनेंत त्यांच्या नांवांचा समावेश झालेला आहेच. त्रिपुरोपासनेच्या सांप्रदायिक विधि-विधानांत जी महालक्ष्मीची आरती योजिली आहे, तींत 'कृत-करवीर-निवासा'[१६] असें स्पष्ट संबोधन आहे. तंत्रग्रंथांच्या संभारांत 'दत्तात्रेयतंत्र' या नांवाचेंहि एक तंत्र (प्रकाशित) आहे. 'रुद्रयामल' या प्रसिद्ध तंत्र-ग्रंथांत दत्तात्रेयाला महत्त्वाचें स्थान आहे. 'रुद्रयामलां'-तील 'दत्तात्रेयकवचस्तोत्र' आज दत्तोपासनेच्या क्षेत्रांत सर्वत्र प्रचलित आहे.

या सर्व गोष्टींचा साकल्यानें विचार करतां असें निश्चयपूर्वक मानावेंसें वाटतें की, इसवी सनाच्या प्रारंभी त्रिपुरोपासक शाक्त उपासनेच्या क्षेत्रांत

१४. शंकराचार्यविरचितप्रकरणसंग्रहः, पृष्ठें ३८८-३८९.
१५. नित्योत्सवः, पृ. १६४
१६. परशुरामकल्पसूत्र पृ. ५६५

दत्तात्रेयाची निर्मिति झाली असावी. कदाचित् या तंत्रप्रणालीचा प्रवर्तक दत्तात्रेय नामक कोणी महान् सिद्धपुरुष असावा आणि त्याचेंच पुढें, पुराणांच्या अंतिम संस्करणाच्या काळी, दैवतीकरण झालें असावें. महाभारतांत आणि माघाच्या 'शिशुपालवधां'त दत्तात्रेयाला 'अत्रिपुत्र' न मानतां 'अत्रिगोत्रोत्पन्न' मानलें आहे, हें आपण मागें पाहिलें आहेच. हा अत्रिगोत्रोत्पन्न दत्तात्रेय मुनिच पुढें पुराणांत अत्रीचा पुत्र बनविला गेला असावा आणि त्रिपुरोपासनेच्या क्षेत्रांतील त्याचा शिष्य-कल्पसूत्रांचा रचनाकार-परशुराम हा 'भार्गव परशुराम' बनविला गेला असावा. या रूपांतराबरोबरच परशुरामाशीं संबंधित कार्तवीर्य सहस्रार्जुनाची कथा दत्तचरित्रांत आपोआपच समाविष्ट झाली असणार.

अर्थात् हें एक संदिग्ध अनुमान आहे. पुराणांचें आणि तंत्रग्रंथांचें तौलनिक अध्ययन करून आणि त्यांतील निरनिराळ्या कथाभागांचें पौर्वापर्य ठरवून यासंबंधीचा निर्णायक सिद्धान्त मांडणें शक्य होईल. हें काम अर्थातच मर्मज्ञ पंडितांचें आहे. त्यांच्यापुढें अधिक विचारासाठीं मीं ही कल्पना मांडली आहे.

## दत्तात्रेयाचें मूर्तिवैज्ञानिक स्वरूप :

श्री. खरे यांच्या माहितीनुसार पुरातन ग्रंथांत दत्तात्रेयाची उणी-पुरी तीनच वर्णनें मिळतात : अग्निपुराण, दत्तात्रेयकल्प आणि विष्णुधर्मोत्तरपुराण या तीनच प्राचीन ग्रंथांत दत्तात्रेयाचीं मूर्तिवर्णनें आढळतात. अर्थात् हीं वर्णनेंहि सांग नाहींत.

> वामपादो धृतः शेषे दक्षिणः कूर्मपृष्ठगः ।
> दत्तात्रेयो द्विबाहुः स्याद् वामोत्सङ्गे श्रिया सह ॥[१७]

असें वर्णन अग्निपुराणांत आहे. डावा पाय शेषावर, उजवा पाय कूर्मपृष्ठावर, दोन हात आणि डाव्या मांडीवर लक्ष्मी (श्री) बसलेली, अशी ही मूर्ति आहे. या मूर्तीचा वर्ण कोणता, हातांत आयुधें कोणतीं, याचा खुलासा नाहीं. ही मूर्ति एकमुखी व द्विभुज आहे, हें मात्र चिंतनीय आहे.

---

१७. अग्निपुराण, ४९.२७.

दत्तात्रेयकल्पानुसार त्याचा वर्ण पांढरा असून तो एकमुख व चतुर्भुज आहे. एक हात व्याख्यानमुद्रेत, एक गुडघ्यावर ठेवलेला आणि दोन हातांत कमळें असलेलीं ही मूर्ति अर्धोन्मीलित नेत्रांची आहे.

विष्णुधर्मोत्तर पुराणांतील वर्णन तर या दोन्ही वर्णनांहून अधिक संदिग्ध आहे.

**तपस्यभिरतः शान्तो न कृशो न च पीवरः ।**
**वाल्मीकिरूपं सकलं दत्तात्रेयस्य कारयेत् ॥**[१८]

तपोमग्न, शांत, फार कृशहि नाहीं आणि फार लठ्ठहि नाहीं, जटाभारानें युक्त ( वाल्मीकिरूप ) अशी ही दत्तमूर्ति आहे. यांत वर्ण, मुख, भुजा, आयुधें, वाहन, इत्यादि कशाचाच खुलासा नाहीं.

दत्तात्रेयाचें व्यवच्छेदक स्वरूप दाखविणारीं प्राचीन शिल्पें आढळत नाहींत. कै. गोपीनाथ राव यांच्या मतें : "ब्रह्मा-विष्णु-महेश एकमेकांच्या संगतीनें काढणें हा दत्तात्रेयमूर्तीचा एक प्रकार होय. योगीश्वर विष्णु काढून त्याच्या आसनावर हंस, गरुड व नंदी अशी तिन्ही वाहनें दाखविणें हा दुसरा प्रकार आहे आणि तिसरा प्रकार म्हणजे ब्रह्मा-विष्णु-महेशांचें संयुक्त रूप करून खोदणें हा होय."[१९] परंतु हें म्हणणें बरोबर दिसत नाहीं. त्यांनीं वर्णिलेले वरील तीनहि प्रकार त्रिमूर्तिशिल्पाच्या तीन वेगवेगळ्या तऱ्हा आहेत. पुराणांच्या अंतिम संस्करणाच्या काळीहि दत्त त्रिमुखी बनलेला नसल्यामुळें दत्तात्रेयाचीं त्रिमुखी शिल्पें शोधणें योग्य होणार नाहीं. वरील त्रिमुखी शिल्पें त्रिमुखी दत्तात्रेयाच्या निर्मितीला कारणीभूत झालीं असणें मात्र शक्य आहे.

श्री. टी. एन्. श्रीनिवासन् यांनी ' दक्षिण भारतांतील मूर्तिशिल्पें ' या नांवाच्या इंग्रजी ग्रंथांत दत्तमूर्तीचें जें वर्णन दिलें आहे, तेंहि असंच अपसमजावर आधारलेलें आहे :

"Dattatreya is a combination of the trimurtis, the image having three heads and six hands carrying the

१८. विष्णुधर्मोत्तर पुराण, ३. ८५. ६४.
१९. मूर्तिविज्ञान, पृ. १७–३९.

representative ayudhas of Brahma, Vishnu and Siva—Shankha, Chakra, Kamandalu, Shruva, Trisula and Khatvanga. He is also known as Harihara-prapitamaha-murti, and is in standing posture. Usually the vehicles, Hamsa, Garuda and Vrishabha are also represented on the pedestal."[१०]

[ ब्रह्मा-विष्णु-महेशांचीं शंख—चक्र—कमंडलु—श्रुव—त्रिशूळ—खट्वांग हीं प्रातिनिधिक आयुधें धारण करणारी सहा हातांची व तीन मुखांची त्रिमूर्तियुक्त देवता म्हणजे दत्तात्रेय. दत्तात्रेय हा 'हरि-हर-प्रपितामहमूर्ति' म्हणूनहि ओळखला जातो. तो उभ्या अवस्थेंत आहे. हंस, गरुड आणि वृषभ हीं तीन देवांची तीन वाहनें आसनावर खोदलेलीं असतात. ]

बदामी येथें दत्तात्रेयमूर्ति म्हणून समजली जाणारी एक प्राचीन मूर्ति आहे. तिचें वर्णन श्री. खरे यांनी आपल्या पुस्तकांत दिलें आहे : "ती योगासनी आहे. हिच्या वरच्या दोन हातांत चक्र व शंख या वस्तु आहेत आणि खालचे दोन्ही हात मांडीवर एकावर एक उताणे, डावा खालीं व उजवा वरतीं अशा तऱ्हेनें ठेवलेले आहेत. मात्र उजव्या हाताची व्याख्यानमुद्रा आहे. बैठकीवर डावीकडून उजवीकडे अनुक्रमें गरुड, नंदी व हंस असे तिन्ही प्राणी आहेत."[२१] दत्तात्रेय हा विष्णूचा अंश असल्यामुळें ही दत्तमूर्ति ( किंवा विष्णुमूर्ति ) आहे, हें सूचित करण्यासाठीं वाहनांच्या क्रमांत गरुड मध्यभागीं हवा होता. या मूर्तींत नंदी मध्यभागीं असल्यामुळें ही शिवाची योगमूर्ति असावी.

वरील विवेचनाचा इत्यर्थ असा कीं, निरपवादपणें दत्तमूर्ति म्हणून समजली जाणारी प्राचीन मूर्ति आढळत नाहीं. दत्तदेवतेला स्वतंत्र चरित्र, स्वतंत्र व्यक्तिमत्त्व आणि स्वतंत्र रूपविशेष असतांना अशी मूर्ति आढळूं नये, याचें आश्चर्य वाटतें. दत्तमूर्तींच्या प्राचीन शिल्पांच्या अभावाचें कारण माझ्या मतें असें असावें कीं, दत्तदेवता इ. स. १००० पर्यंत क्रमशः आकार घेत होती. निरनिराळ्या पुराणांतून आणि अर्वाचीन उपनिषदांतून तिच्या

१०. A Hand Book of South Indian Images, p. 56.

२१. मूर्तिविज्ञान, पृ. ३९.

चरित्रकथा थोड्याफार फरकानें वर्णिलेल्या आढळतात. तसेंच त्रिमूर्ति-शिल्पाची कल्पना सुद्धां निरनिराळीं रूपें घेत विकास पावत होती. या दोन्ही कल्पना विकसित होऊन जेव्हां त्यांचें एकत्रीकरण झालें आणि 'तीन शिरें सहा हात' असें दत्तस्वरूप बनलें, तेव्हांच दत्ताचें चरित्र व स्वरूप स्थिर आणि परिपूर्ण बनलें असावें, असें वाटतें.

## दत्तात्रेय आणि त्रिमूर्ति कल्पना :

आज सर्वत्र आढळणारी दत्तमूर्ति 'त्रिमूर्ति' आहे. महाभारत, पुराणें, आणि अर्वाचीन उपनिषदें यांतील दत्तात्रेयाचीं प्राचीन वर्णनें आपण पाहिलीं; परंतु त्या सर्व वर्णनांत दत्तात्रेय त्रिमुखी नसून एकमुखीच आहे. प्राचीन मूर्ति-विज्ञानांतहि दत्तात्रेय एकमुखीच आहे. इतिहास-काळांतील पहिला दत्तभक्त चांगदेव राऊळ (इ. स. ११५०–१२२०) याचें उपास्यहि एकमुखी दत्तात्रेय हेंच आहे. असें असतांना त्रिमुखी दत्तात्रेयाची निर्मिति कशी आणि केव्हां झाली? दत्तात्रेय आणि भारतीय परंपरेंतील त्रिमूर्तिकल्पना यांचें ऐकात्म्य केव्हां झालें? या ऐकात्म्याला कांहीं वैचारिक पार्श्वभूमि आहे काय? या प्रश्नांचीं उत्तरें शोधण्याचा प्रयत्न करण्यासाठीं आपण त्रिमूर्ति कल्पनेचा स्थूल इतिहास पहावयास हवा.

भारतीय परंपरेंतील त्रिमूर्ति ही ब्रह्मा-विष्णु-महेशात्मक आहे, असें समजलें जातें. या तिच्या तीन घटकांमुळें उत्पत्ति-स्थिति-लय या तीन अवस्था आणि सत्त्व-रज-तम हे त्रिगुण तिच्यांतून सूचित होतात. त्रिमूर्तींतील ब्रह्मा-विष्णु-महेश या तीन देवतांपैकीं फक्त विष्णु आणि महेश (रुद्र) हे दोनच वेदांत आढळतात. ब्रह्मयाची निर्मिति वेदोत्तरकाळीं झालेली आहे. विष्णु आणि रुद्र या दोन देवतांपैकीं विष्णु ही वेदांतील गौण देवता आहे. वेदवाङ्मयांत सर्वोच्च स्थान पावलेली देवता म्हणजे इन्द्र. तें स्थान विष्णु वा रुद्र यांना नाहीं. अर्थातच ब्रह्मा-विष्णु-महेश यांचा समावेश असणारी त्रिमूर्ति वेदवाङ्मयांत नाहीं. वैदिक परंपरेंत देवता-त्रयीचा पहिला उल्लेख मैत्रायणी संहितेंत "तिस्र एव देवताः। क्षित्यन्तरिक्षद्युस्थानाः अग्नि वायुः सूर्य इति।" (देवता तीनच आहेत : पृथ्वीवर अग्नि, अन्तरिक्षांत वायु आणि द्युलोकांत सूर्य.) अशा स्वरूपाचा आहे. आज सर्वमान्य झालेल्या

ब्रह्मविष्णुमहेशात्मक त्रिमूर्तीचा पहिला उल्लेख मैत्रायणी उपनिषदांत आढळतो. या उपनिषदाची रचना सर्व अर्वाचीन उपनिषदांत प्राचीनतम समजली जाते. या उपनिषदांतील त्रिमूर्तीचें स्वरूप पाहण्यापूर्वी आपण वेदपूर्व संस्कृतींतील त्रिमूर्तीचें स्वरूप पाहूं.

मोहेंजोदारो येथें झालेल्या उत्खननावरून असें सिद्ध झालें आहे कीं, शिव ही देवता वेदपूर्व भारतीय संस्कृतींत प्राधान्य पावलेली होती. लिंग आणि मूर्ति अशा दोन्ही स्वरूपांत शिवाची उपासना होत असावी. वेदांतील रुद्र आणि वेदपूर्व लिंगोपासना यांच्या समन्वयांतूनच पुढें पुराणकालीन शिव देवता आकारास आली. मोहेंजोदरो येथें मिळालेल्या पुराणावशेषांत शिवाची मूर्ति आहे. या शिवमूर्तीचें स्वरूप असें आहे : "हा एका चौरंगावर आसन घालून, पायाचे तळवे एकमेकांवर ठेवून जमिनीस चिकट-तील अशा तऱ्हेनें बसला असून हात योग्याप्रमाणें गुडघ्यावर ठेवण्याच्या उद्देशानें जवळ आणले आहेत. तोंड व डोळे प्रत्येकीं तीन आहेत. डोक्यावर मध्यभागीं मुकुट असून दोन बाजूंस दोन शिंगें आहेत. प्रत्येक हातावर तीन मोठीं व मध्यें प्रत्येकीं चार अशीं आठ मिळून अकरा कंकणें आहेत. गळ्यांत एकाखालीं एक लोंबणारे असे तिकोनी हार आहेत. कमरेस बंध असून लिंग व वृषण हीं बहुधा दिगत आहेत. म्हणजे मूर्ति नग्न आहे."[२२] त्रिमूर्ति स्वरूपांत असलेल्या या योगासनस्थ शिवाच्या परिवारांत हत्ती, वाघ, गेंडा, म्हैसा व दोन हरणें असा पशुसमुदायहि आहे. म्हणजे हा शिव पशुपति व महायोगी आहे. त्याचीं त्रिमुखें हीं उत्पत्ति-स्थिति-लयाचीं निदर्शक आहेत. या त्रिमुखी शिवाच्या उपासकांचा आणि ऋग्वेदांतील इन्द्राच्या उपासकांचा संघर्ष चालू होता, याचें सूचन ऋग्वेदांत आढळतें : "हे इन्द्रा, तूं तीन तोंडांच्या व सहा डोळ्यांच्या दासांचा पराभव केलास !" असे धन्यो-द्गार एका इन्द्रोपासकानें काढले आहेत.

याचा अर्थ असा कीं, उत्पत्ति-स्थिति-लयदर्शक त्रिमूर्तीचा उगम वेद-पूर्वकाळीं सिंधु संस्कृतींत झाला असून, तिचें आद्य स्वरूप केवळ शिवात्मक आहे—तीन देवतांना एकत्र आणणारें नाहीं. पुढील काळांतहि जगन्मुख

२२. मूर्तिविज्ञान, उपोद्घात पृ. १४; मोहेंजोदरो (इंग्रजी) : प्रा. मारीवाला, पृ. ५४-५५.

( कुलू ), मेलचेरी ( उत्तर अर्काट जिल्हा ), गोकाक, चितोडगड, काश्मीर, मथुरा, चारसद्दा ( पेशावर ) येथें त्रिमूर्तिशिवाच्या मूर्ति सांपडल्या आहेत. याशिवाय " कुशाण राजा हुविष्क याच्या कांहीं नाण्यांवर त्रिमुखी शिवाची आकृति आढळून येते." तसेंच बाल्हीक देशांत कुशाण-ससानियन गव्हर्नरांच्या कांहीं नाण्यांवर त्रिमुखी शिवाची आकृति आहे. श्री. ग. ह. खरे यांनीं ' मूर्तिविज्ञानां 'त त्रिमुखी शिवाचीं अनेक चित्रें दिलीं आहेत.

या त्रिमुखी शिवाच्या अनुकरणांतून ब्रह्मा-विष्णु-महेशात्मक त्रिमूर्तीचा उद्‌भव झाला असावा. ' उत्तरकामिकागम ', ' रूपावतार ', ' रूपमंडन ', ' शिल्परत्न ' इत्यादि ग्रंथांतून त्रिमूर्तीचीं मूर्तिवैज्ञानिक वर्णनें आलेलीं आहेत. ब्रह्मा-विष्णु-महेशात्मक त्रिमूर्तींतहि तीन भेद आढळून येतात : कांहीं शिव-प्रधान, कांहीं विष्णु-प्रधान, तर कांहीं ब्रह्मा-प्रधान. ज्या देवतेला प्राधान्य द्यावयाचें असेल तिचें मुख मध्यस्थानीं असतें. घारापुरीची जगत्-प्रसिद्ध त्रिमूर्ति ब्रह्मा-प्रधान आहे, असें कांहीं तज्ज्ञांचें मत आहे; तर कांहींच्या मतें रुद्र व सौम्य अशीं शिवाचीं दोन मुखें व उमेचें एक मुख अशी ती शिवशक्तीची मूर्ति आहे. कै. गोपीनाथ राव यांनीं आपल्या पुस्तकांत शिव-प्रमुख व विष्णु-प्रमुख अशा दोन्ही प्रकारच्या त्रिमूर्तींचीं चित्रें दिलेलीं आहेत.

मैत्रायणी उपनिषदांत ब्रह्मा, विष्णु आणि रुद्र हीं एकाच अव्यक्ताचीं अंगें असून तीं सत्त्व-रज-तमाचीं प्रतीकें होत, असें म्हटलें आहे. ब्रह्मोपनिषदांत " तत्र चतुष्पादं ब्रह्म विभाति। जागरिते ब्रह्मा स्वप्ने विष्णुः सुषुप्तौ रुद्रस्तुरीयमक्षरम् । " असा या त्रयीचा उल्लेख आहे. रुद्रहृदयोपनिषदांत—

ये नमस्यन्ति गोविन्दं ते नमस्यन्ति शङ्करम् ।
येऽर्चयन्ति हरिं भक्त्या तेऽर्चयन्ति वृषध्वजम् ॥
ये द्विषन्ति विरूपाक्षं ते द्विषन्ति जनार्दनम् ।
ये रुद्रं नाभिजानन्ति ते न जानन्ति केशवम् ॥

अशी प्रारंभीं हरि-हरांची एकता प्रतिपादिली असून, पुढें ' यो रुद्रः स स्वयं ब्रह्मा ' आणि ' ब्रह्माविष्णुमयो रुद्रः ' अशी क्रमानें त्रिमूर्ति सिद्ध केली आहे. या त्रिमूर्तीचें स्पष्टीकरण असें केलें आहे :

अन्तरात्मा भवेद्ब्रह्मा परमात्मा महेश्वरः ।
सर्वेषामेव भूतानां विष्णुरात्मा सनातनः ॥
अस्य त्रैलोक्यवृक्षस्य भूमौ विटपशाखिनः ।
अग्रं मध्यं तथा मूलं विष्णुब्रह्ममहेश्वराः ॥
कार्यं विष्णुः क्रिया ब्रह्मा कारणं तु महेश्वरः ।
प्रयोजनार्थं रुद्रेण मूर्तिरेका त्रिधा कृता ॥

यांतील ' मूर्तिरेका त्रिधा कृता ' हा उल्लेख चिंतनीय आहे. मैत्रायणी उपनिषदांतहि ' एष एकस्त्रिधा भूतः ' असा उल्लेख आहे. रामोत्तरतापिनी-उपनिषदांतील " यो ब्रह्मा विष्णुर्महेश्वरो यः सर्वदेवात्मा ।" आणि प्राणाग्नि-होत्र उपनिषदांतील " त्वं ब्रह्मा त्वं रुद्रस्त्वं विष्णुः । " हे उल्लेख ब्रह्माविष्णु-महेशात्मक त्रिमूर्ति-कल्पनेचें दृढीकरण करणारे आहेत. मध्ययुगांत प्रत्येक देवतेचा उपासक संप्रदाय आपापल्या देवतेंत ब्रह्माविष्णुमहेश अंगभूत असल्याचें सांगूं लागला. अर्थात् अशा सांगण्यांतूनहि ब्रह्मा-विष्णु-महेश या देवतात्रयीचें माहात्म्य आणि ऐकात्म्य आपोआपच सूचित होत राहिलें. कालिदासाच्या ' कुमार-संभवां 'त ( २·४ ) ब्रह्मदेवाचा ' त्रिमूर्ति '-स्वरूपांत उल्लेख आहे.

अशा प्रकारें त्रिकाची आवड असणाऱ्या भारतीय परंपरेंत ब्रह्माविष्णु-महेशात्मक त्रिमूर्ति दृढ झाली. जीव-जगत्-जगदीश्वर हीं त्रितत्त्वें, सत्त्व-रज-तम हे त्रिगुण, स्वर्ग-मृत्यु-पाताळ हे त्रिलोक, आधिभौतिक-आधिदैविक-आध्यात्मिक हे त्रिताप, कायिक-वाचिक-मानसिक हीं त्रितपें, भूत-भविष्य-वर्तमान हे त्रिकाळ, वात-पित्त-कफ हे आयुर्वेदांतील त्रिदोष, कर्म-ज्ञान-भक्ति हे त्रियोग इत्यादि अनेक त्रिकांप्रमाणेंच जन्म पावलेली ही त्रिमूर्ति भारताच्या दार्शनिक चिंतनाचें महनीय प्रतीक बनली. या प्रतीकाचा कलात्मक आविष्कार घारापुरीच्या त्रिमूर्तिशिल्पांत उत्कट स्वरूपांत घडून आला आहे. डॉ. वासुदेवशरण अग्रवाल या त्रिमूर्तिशिल्पाविषयीं लिहितांना म्हणतात : " या त्रिमूर्तीच्या मागें दार्शनिक चिंतनाचा केवढा रहस्यमय संकेत आहे ! प्रणवा-पासून तो त्रैगुण्यापर्यंतच्या विराट् भावांच्या अभिव्यक्तीसाठीं कलेनें ' त्रिमूर्ति ' हें प्रतीक निर्माण केलें आणि तें सर्वांना संतोषप्रद झालें. त्रिमूर्ति म्हणजे भारतीय दर्शनाची प्रतिमा आहे. तत्त्वज्ञानाच्या प्रांगणांत उभे राहून आपण

जेव्हां ‘ एकैव मूर्तिर्बिभिदे त्रिधा सा ’ या रहस्याचा उद्घोष करतों, तेव्हा कलेनें निर्माण केलेली ही प्रतिमा जणु त्या उद्घोषाचा साक्षात्कारच दाखवते.”[२३]

त्रिमूर्तीचा उगम आणि विकास पाहिल्यावर आपल्यापुढें प्रश्न उभा रहातो कीं, या त्रिमूर्तींचें आणि दत्तात्रेयाचें एकीकरण कसें आणि केव्हां घडून आलें ? आपण मागें पाहिलें आहे कीं, इ. स. १२०० पर्यंत दत्तात्रेयाचें स्वरूप एकमुखीच होतें. पुढें इसवी सनाच्या पंधराव्या शतकांत सरस्वती-गंगाधरानें लिहिलेल्या गुरुचरित्रांत मात्र दत्तात्रेयाचें स्वरूप ‘ त्रिमूर्ति ’ मानलें आहे. हा बदल घडून यायला दत्तजन्माच्या कथेंत बराच वाव होता. त्रिमूर्तींत समाविष्ट असणाऱ्या तीनहि देवतांचा आशीर्वाद दत्तजन्माला कारणीभूत आहे. या तीन देवतांपासून अंशभूत असे तीन पुत्र—ब्रह्मापासून चंद्र, विष्णूपासून दत्त व शिवापासून दुर्वास—झाले असले, तरी ‘ विष्णूचा अवतार ’ म्हणून दत्ताचेंच महिमान पुराणांनीं गायिलें आहे. या पुत्रांपैकीं केवळ दत्तच अत्रीच्या घरीं राहिला आणि चंद्र व दुर्वास निघून गेले. दत्ताच्या तुलनेनें चंद्र-दुर्वासांच्या चरित्रांना गौणता लाभली. त्यामुळें पुढें चंद्र आणि दुर्वास लोकमानसांत विस्मृत होत गेले आणि दत्त हा ब्रह्मा-विष्णु-महेशांचा एकरस अवतार बनला. त्रिमूर्तीचें दत्ताशीं ऐकात्म्य होण्यापूर्वीं त्रिमूर्ति ही केवळ तात्त्विक व कलात्मक कल्पना होती. एक विशिष्ट देवत्ता म्हणून तिचें नाम-करण, चरित्र वा उपासनापद्धति रूढ झाली नसावी. भक्तिप्रवण लोक-मानसानें या ब्रह्माविष्णुमहेशात्मक त्रिमूर्तीची आणि ब्रह्मा-विष्णु-महेशांच्या आशीर्वादानें जन्मलेल्या दत्तात्रेयाची सांगड घातली तर त्यांत मुळींच आश्चर्य नाहीं. हें ऐकात्म्य जेव्हां घडून आलें, तेव्हां त्रिमूर्ति कल्पनेच्या तात्त्विक विकसनाची परिसीमा झाली. हें ऐकात्म्य नरसिंह सरस्वतींच्या जीवन-कालांत वा त्यापूर्वीं शंभर-दोनशें वर्षें ( सुमारें इसवी सनाच्या तेराव्या शतकांत ) घडून आलें असावें. या कालापर्यंत त्रिमूर्ति कल्पना आणि दत्तात्रेयाचें चरित्र एकसाथ विकास पावत होतें—आकार घेत होतें. या दोन कल्पनांचे प्रवाह पुष्ट होत होत तेराव्या शतकांत उपासकांच्या हृदयांत एकवटले आणि त्या संगमांतून ‘ त्रिगुणात्मक त्रैमूर्ति ’ अशा दत्तात्रेयाचें स्वरूप आविष्कृत झालें.

---

२३. संस्कृतीचीं प्रतीकें : पं. महादेवशास्त्री जोशी, पृ. ६५.



दत्तसदृश दिसणारा त्रिमुखी शिव
( पेशावर म्यूझियम )



निरंजन रघुनाथांचे नातू विश्वनाथबोवा
यांनीं काशींत स्थापिलेली दत्तमूर्ति



मोहेंजोदरोची त्रिमूर्ति



त्रिमुखी शिव ( गोकाक )

**त्रिमुखी दत्त आणि साक्षात्कारी दत्तोपासक :**

गुरुचरित्रांत (इ. स. १५५० चा सुमार) आणि संत एकनाथ (इ. स. १५२३–१५९९) यांच्या 'त्रिगुणात्मक त्रैमूर्ति' या दत्तात्रेयाच्या आरतींत त्रिमुखी दत्त मानला असला, तरी त्रिमुखी दत्ताला सार्वत्रिक मान्यता मिळून दत्तात्रेयाचें एकमुखी स्वरूप मागें पडलें, असें घडलें नाहीं. सर्वसाधारण लोकांच्या प्रचारांत त्रिमुखी दत्तमूर्ति जास्त प्रमाणांत येऊं लागली हें खरें असलें, तरी अनेक साक्षात्कारी दत्तभक्तांच्या साक्षी त्रिमुखी दत्तमूर्तीच्या विरुद्ध आहेत. गुरुचरित्रांतील दत्तसंप्रदायाची परंपराच पुढें दत्तोपासनेच्या क्षेत्रांत अत्यंत प्रभावी ठरत गेल्यामुळें त्रिमुखी दत्तमूर्ति हेंच प्रधान दत्तस्वरूप बनत गेलें. परंतु 'गुरुचरित्रां'तील परंपरेला आदरणीय मानणारे आणि नरसोबाच्या वाडीहून दत्तभक्तीची प्रेरणा मिळविणारे असे सत्पुरुषहि एकमुखी दत्ताचे पुरस्कर्ते होते.

'त्रिगुणात्मक त्रैमूर्ती'ची आरती गाणाऱ्या नाथांच्याच कालांत वावरणारे महान् दत्तोपासक दासोपन्त (इ. स. १५५१–१६१५) यांचें उपास्य एकमुखी आणि षड्भुज दत्तात्रेय आहे.[२४] या सहा हातांत शंख-चक्र, त्रिशूल-डमरु आणि कमंडलु-रुद्राक्ष हीं धारण केलेलीं आहेत. मस्तकावर जटाभार असूनहि मुकुट आहे आणि कमरेला पीतांबर वेढलेला आहे. दासोपंतांनीं 'पासोडी'वर स्वहस्तें चितारलेली दत्तात्रेयाची मूर्ति ही अशी आहे. त्यांच्या देव्हाऱ्यांतील तांब्याची दत्तमूर्ति आणि त्यांचे अनुगृहीत डाकुळगी गांवचे कृष्णाजीपंत कुलकर्णी यांना त्यांनीं दिलेली दत्तमूर्ति याच स्वरूपाची आहे. नाथांची 'त्रिगुणात्मक त्रैमूर्ति' आणि दासोपंतांची 'एकमुखी षड्भुज मूर्ति' एकाच काळांत पूजार्ह म्हणून नांदत असल्याचें पाहून हें स्पष्ट होईल कीं, दत्तात्रेयाचें स्वरूप या काळांत त्रिमुखी बनलें असलें तरी पूर्वपरंपरेचे अवशेषहि भक्तमान्य होते.

त्यानंतर झालेले निरंजन रघुनाथ (इ. स. १७८२–१८५५) आणि त्यांचे गुरु रघुनाथस्वामी यांचा दत्तसाक्षात्कार 'एकमुख षड्भुज' अशा

---

२४. दासोपंतांनीं पासोडीवर स्वहस्तें चितारलेलें दत्तचित्र पहा. ('दासोपंतांची पासोडी' : सं. न. शे. पोहनेरकर).

स्वरूपाचाच आहे. निरंजन रघुनाथांनीं लिहिलेल्या 'स्वात्मप्रचीति' व 'साक्षात्कार' या दोन आत्मचरित्रपर ग्रंथांत त्यांनी आपल्याला झालेल्या दत्तसाक्षात्काराचें हृदयंगम वर्णन केलें आहे. श्रीगुरूंनीं निरंजन रघुनाथांस सगुणध्यानाकरितां जें दत्तस्वरूप पत्रानें कळविलें, तें असें :

षड्भुज मूर्तीचें ध्यान । साळंकृत प्रसन्नवदन ।
तेजस्वी दैदीप्यमान । श्यामवर्ण सर्वांगीं ॥
रत्नभूषणें मंडित । वस्त्रें उत्तम शुचिष्मंत ।
मस्तकीं मुगुट शोभिवंत । विद्युल्लतेचियेपरी ॥
कर्णीमाजीं रत्नकुंडलें । भाळीं चंदन परिमळ ।
केशर-कस्तूरीचा मळ । करोनिया लावावा ॥
भोवया सरळ सुरेखा । आकर्ण नयन विशाल देखा ।
सरळ सुंदर नासिका । मुखशोभा त्याखालीं ॥
तयामाजीं दंत-पंक्ति । पहात जाव्या अपूर्वगती ।
चंद्रसूर्यांची दीप्ति । तयास्थानीं योजावी ॥
आरक्त प्रवाळ बारिक अधर । हनुवटी चंद्रबिंबाकार ।
जैसा द्वितीयेचा शीतकर । सोज्वळपणें दिसतसे ॥
तैसी आतिशयिक सान । उंच कपोला संलग्न ।
तयाखालीं ग्रीवेचें स्थान । लंबायमान योजावें ॥
तयामाजीं कंठमणि । विशाल तेजें फाके गगनीं ।
शोभायमान एकरणी । गळयामाजीं योजावें ॥
तयाखालीं मुक्तामाळा । सुरेखपणीं अतिसोज्वळा ॥
पदकलग जडित विशाळा । अतिमृदुळ पहाव्या ॥
सुवर्णपुतळियांच्या माळा । अनेक प्रकारीं बोरमाळा ।
त्याचियेखालीं जत्रमाळा । साकळया गळा शोभती ॥
तयावरुते पुष्पमाळा । आपादपर्यंत अति कोमळा ।
टवटवीत बहु परिमळा । शुभ्रवर्ण चांगल्या ॥
यज्ञोपवीत त्या आंतून । सर्वांगीं चर्चिला चंदन ।
पट्टकुळ तेजायमान । तयावरी शोभतसे ॥

कासे कसिला पीतांबर । सुवर्णवर्णी तेजाकार ।
रत्नखचित शोभती पदर । काठी आणि दुभागी ॥
त्यावरि कटिसूत्र सरणी । घागऱ्या वाजती किणकिणी ।
अतिसोज्वळा उभयजघनीं । रत्नकोंदणीं शोभती ॥
षड् हस्तकीं बहु सम्यक । मुद्रिका कंकणें तेज अमूप ।
आयुधें शोभतीं पृथुक पृथुक । सर्व हस्तांमाझारीं ॥
ऊर्ध्व हस्तांचिये ठायीं । शंखचक्र शोभती दोहीं ।
मध्यहस्तांमाजी पाही । त्रिशूल डमरू विराजे ॥
अधो कमंडलु घेऊन । सव्यहस्तीं माळा जाण ।
फिरती जैसे ग्रहगण । एकसरे सारिखी ॥
पायीं वाळे रुणझुणती । अभिनव तयांची दीप्ति ॥
पादांगुळ्या उत्तम गती । सुंदरपणें शोभल्या ।
पादुका रत्नखचित सुंदर । चरणीं जडिल्या तेजाकार ।
तयावरुते श्रीकरधर । विराजमान शोभती ॥
भोंवतें शोभे उपवन । पूजा उपचार बहुविधपण ।
छत्रचामरें आदिकरून । पारपत्यकार करिताती ।
यापरीची मूर्ती सगुण । उंची आपुलिया समान ।
निज मस्तकावरि ध्यान । ज्ञानदृष्टीनें पहावें ॥ [२५]

निरंजन रघुनाथांच्या ध्यानांतील हें दत्तस्वरूप आजहि भाविकांच्या मनाला वेड लावील, असें आहे. निरंजन रघुनाथांप्रमाणेंच त्यांचे शिष्य झाशीचे नारायणमहाराज जालवणकर (इ. स. १७९३–१८६८) यांनाहि गिरनारवरच दत्तसाक्षात्कार झाला होता. त्यांनीं देवास (सीनियर) येथें प्रस्थापिलेली गंडिकेची स्वयंभू दत्तमूर्ति 'एकमुखी षड्भुज' अशीच आहे. कै. थोरले बाळासाहेब पटवर्धन यांनीं निरंजन रघुनाथांच्या हस्तें मिरजेच्या किल्ल्यांत स्थापन केलेली मूर्ति आणि निरंजन रघुनाथांचे नातू विश्वनाथबोवा यांनीं काशी येथें प्रस्थापिलेली मूर्ति 'एकमुखी षड्भुज' याच स्वरूपाची आहे.

---

२५. निरंजन रघुनाथांची कविता : सं. य. त्र्यं. कोल्हटकर ('साक्षात्कार', १.७९–९१).

नरसोबाच्या वाडीला श्रद्धाकेंद्र मानणारे असे अगदीं अलीकडच्या काळांतील दत्तसाक्षात्कारी सत्पुरुष श्रीवासुदेवानंद सरस्वती ऊर्फ टेंभेस्वामी (इ. स. १८५४-१९१४) यांनीं कागलहून, मूर्तिकारास खास सूचना देऊन बनवून आणलेली आणि माणगांवीं विधिविधानासह अनेक वर्षे उपासिलेली दत्तमूर्ति "सात बोटें उंचीची, द्विभुज, वराभयकर, सिद्धासन घातलेली अशी पितळेची" होती.[२६] त्यांनीं आपल्या संन्यस्त जीवनांत तीर्थभ्रमण करतांना अनेक ठिकाणीं दत्तमूर्तीची स्थापना केली. राजमहेंद्री येथें, तेथील श्रद्धावन्ताच्या आग्रहावरून त्यांनीं त्रिमुखी दत्तमूर्ति प्रस्थापिली. एवढा एक अपवाद वगळून सर्वत्र त्यांनी 'एकमुखी द्विभुज' अशीच दत्तमूर्ति पुरस्कारिली आहे.

या उदाहरणांशिवाय उत्तरपेशवाईतील नाथपंथी सिद्धपुरुष श्रीगंगानाथ-महाराज यांच्या पुण्यांतील मठांत, पंढरपूरच्या विप्रमठांतील एकमुखी दत्ताप्रमाणेंच एकमुखी दत्त आहे. नाशिक येथील भटजी महाराजांच्या मठामागें एकमुखी दत्तात्रेयाचें मंदिर आहे. नेपाळांतील भटगांवचें दत्त-स्थानहि एकमुखी दत्तात्रेयाचेंच आहे, असें जाणते सांगतात.

सुमारें तीस-पसतीस वर्षांपूर्वीं गौड सारस्वत वैष्णव ब्राह्मण कुमठा नारायणाचार्य यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'गुरुपरंपरामृत' नांवाच्या ग्रंथांत "दत्तात्रेयाची त्रिमुखी व षड्भुज मूर्ति वैदिक-लौकिक धर्माच्या अगदीं उलट असून त्रिमुखी दत्ताचे उपासक ईश्वरद्रोही आहेत"[२७] अशी एकांतिक टीका आली होती.

अशा प्रकारें कांहीं साक्षात्कारी दत्तोपासकांच्या साक्षी त्रिमुखी दत्तमूर्तींच्या विरुद्ध असल्या तरी सुमारें तेराव्या शतकापासून 'तीन शिरें सहा हात' असलेली दत्तमूर्तिच मराठी लोकधर्मांत वैशिष्ट्यानें नांदत राहिली आहे. या सर्वप्रिय दत्तमूर्तीचें स्वरूप आतां आपण पाहूं या.

## दत्तमूर्तीचें परिणत स्वरूप :

मागील दोन छेदकांतील विवेचनावरून हें स्पष्ट झालें आहेच कीं,

---

२६. श्रीगुरुदेव-चरित्र : द. धुं. कवीश्वर, पृ. २७.

२७. ज्ञानकोश, खं. १५, पृ. (द.) १५.

दत्तात्रेयाचें स्वरूप क्रमशः विकास पावत राहिलें आहे. आजच्या सर्वमान्य दत्तमूर्तीचें रूप-ध्यान तुकारामाच्या खालील अभंगांत वर्णिलें आहे :

तीन शिरें सहा हात । तया माझा दंडवत ॥ १ ॥
काखे झोळी पुढें श्वान । नित्य जान्हवीचें स्नान ॥ २ ॥
माथां शोभे जटाभार । अंगीं विभूति सुंदर ॥ ३ ॥
शख चक्र गदा हातीं । पायीं खडावा गर्जती ॥ ४ ॥
तुका म्हणे दिगंबर । तया माझा नमस्कार ॥ ५ ॥

दत्तात्रेयाच्या रूपध्यानाचे अनेक श्लोक उपासकांत प्रचलित आहेत; त्यांपैकीं खालील श्लोक सर्वसंमत व शास्त्रपूत समजला जातो :

मालाकमंडलुरधःकरपद्मयुग्मे,
मध्यस्थपाणियुगले डमरुत्रिशूले ।
यस्यस्त ऊर्ध्वकरयोः शुभशंखचक्रे,
वन्दे तमत्रिवरदं भुजषट्कयुक्तम् ॥

श्रीगुरुचरित्राच्या प्रारंभीं दिलेलें श्रीदत्तध्यान पुढीलप्रमाणें आहे :

बालार्कप्रभमिन्द्रनीलजटिलं भस्माङ्गरागोज्ज्वलम् ।
शान्तं नादविलीनचित्रपवनं शार्दूलचर्माम्बरम् ॥
ब्रह्मज्ञैः सनकादिभिः परिवृतं सिद्धैः समाराधितम् ।
दत्तात्रेयमुपास्महे हृदि मुदा ध्येयं सदा योगिभिः ॥

ब्रह्माविष्णुमहेशांचें समावेशन दाखविणारीं तीन मुखें, सहा हात, खालच्या दोन हातांत माला व कमंडलु, मधल्या दोन हातांत डमरु आणि त्रिशूळ, वरच्या दोन हातांत शंख आणि चक्र हीं अनुक्रमें ब्रह्मा, शिव आणि विष्णु यांचीं द्योतक असलेलीं आयुधें, माथां जटाभार, अंगाला विभूति चर्चिलेली, पायीं खडावा, व्याघ्रचर्माम्बर परिधान केलेलें आणि काखेंत झोळी हें दत्तात्रेयाचें आजचें सर्वमान्य समग्र ध्यान आहे. या ध्यानाच्या वर्णनांत दत्तमूर्तीच्या मागें गाय आणि जवळ चार कुत्रीं यांचा समावेश असतो. या रूपध्यानांतील एकेका बाबीचा आपण आतां क्रमशः विचार करूं.

**मुखें** : ‘ दत्तात्रेय आणि त्रिमूर्ति-कल्पना ’ आणि ‘ त्रिमुखी दत्त आणि साक्षात्कारी दत्तोपासक ’ या छेदकांत दत्तात्रेयाच्या मुखसंख्येची चर्चा विस्तारानें आली आहे. ‘ गुरुचरित्रा ’तील दत्तस्वरूपापूर्वीचा त्रिमुखी दत्त-

मूर्तीचा पुरावा आज तरी उपलब्ध नाहीं. चांगदेव राऊळ ( १२ वें शतक ) हा ज्या दत्तस्थानांतील दत्तोपासक होता, त्या माहूरचा दत्त हा एकमुखीच ( द्विभुज ) होता, हें आपण मागें पाहिलेंच आहे. म्हणजे इ. स. १२०० नंतरच्या शें-दोनशें वर्षांत दत्तात्रेयानें त्रिमुखी स्वरूप धारण केलें.

**भुजा** : अग्निपुराणांत ( ४९.२७ ) दत्तात्रेयाच्या भुजांची संख्या दोन आहे; तर दत्तात्रेयकल्पांत आणि शांडिल्योपनिषदांत ती चार आहे. प्राचीन ग्रंथांत अन्यत्र याविषयींचे उल्लेख नाहींत. महानुभावांचा दत्त द्विभुज ( एकमुखी ) असल्याचें आपण पाहिलें आहेच. दासोपंत, निरंजन रघुनाथ, नारायणमहाराज जालवणकर, पंतमहाराज बाळेकुंद्रीकर यांचा दत्त एकमुखी असूनहि षड्भुज आहे. वासुदेवानंद सरस्वतींचा दत्त द्विभुज (एकमुखी) आहे.

**आयुधें** : 'तीन शिरें, सहा हात' असें ब्रह्माविष्णुमहेशात्मक स्वरूप मानलें कीं, माला-कमंडलु-डमरु-त्रिशूल-शंख-चक्र हीं सहा आयुधें आपोआपच त्या सहा हातांत विराजूं लागतात. क्वचित् एका हातीं योगदंडहि वर्णिलेला आहे. दत्तात्रेयकल्पांत चार हातांपैकीं दोन हातांत कमळें, एक हात व्याख्यान-मुद्रेंत आणि एक हात गुडघ्यावर ठेवलेला आहे. प्राचीन ग्रंथांत आज रूढ असलेल्या सहा आयुधांचा उल्लेख आढळत नाहीं.

**वर्ण-कांति** : प्राचीन वर्णनांपैकीं दत्तात्रेयकल्पांतील वर्णनांत दत्तात्रेयाचा वर्ण पांढरा असल्याचें सांगितलें आहे. शांडिल्योपनिषदांत आणि गुरुचरित्रांतील प्रारंभीच्या ध्यानश्लोकांत दत्तात्रेयाची कांति 'इंद्रनीलमण्याप्रमाणें' असल्याचें वर्णिलें आहे. श. १२५५ ( इ. स. १३३३ ) मध्यें तयार झालेल्या 'सैहाद्रवर्णन' या महानुभावीय ग्रंथांत 'ते श्रीमूर्त चांपेगौर' ( ओ. २८ ) असा दत्तात्रेयाच्या वर्णाचा उल्लेख आहे. त्याच वर्णनांत 'चंद्रांगकांति' ( ओ. ३७ ) असेंहि कांतीचें वर्णन केलें आहे. आज प्रचलित असलेल्या दत्तात्रेयस्तोत्रांत 'कर्पूरकांतिदेह' असा वर्णाचा उल्लेख आहे. एकनाथांनीं मात्र आपल्या आवडीनुसार त्याला सांवळ्या रूपांत पाहिलें आहे.

**त्रिगुणात्मक त्रिमूर्ति वेगळा । पाहे तो सांवळा दत्तरावो ।।**

एकनाथांनीं आणखी एका अभंगांत दत्तात्रेयाचें रूप वर्णिलें आहे :

**दत्त वसे औदुंबरीं । त्रिशूळ डमरु जटाधारी ॥१॥**
**कामधेनु आणि श्वान । उभे शोभती समान ॥२॥**
**गोदातीरीं नित्य वस्ती । अंगीं चर्चिली विभूती ॥३॥**
**काखेमाजी शोभे झोळी । अर्धचंद्र वसे भाळीं ॥४॥**
**एका जनार्दनी दत्त । रात्रंदिनीं आठवीत ॥५॥**

एकनाथांच्या या अभंगांतील ‘ अर्धचंद्र वसे भाळीं ’

हा उल्लेख चिंतनीय आहे. आणखी एका अभंगांत—

**त्रिशूळ घेऊनियां करीं । उभा असे भक्तद्वारीं ॥ २ ॥**
**भाळीं चर्चिली विभूती । रुद्राक्षाची माळ कंठीं ॥ ३ ॥**

असें वर्णन नाथांनीं केलें आहे. मागच्या अभंगांतील ‘ अर्धचंद्रा ’चा उल्लेख आणि येथें भक्तरक्षणासाठीं त्रिशूळ हातीं घेतल्याचा उल्लेख दत्तमूर्तीचें शिव-प्राधान्य दाखवितात, असें वाटतें. या वर्णनांत ‘ रुद्राक्षाची माळ ’ कंठीं शोभत आहे. नाथांप्रमाणेंच दासोपंतांनाहि तो ‘ सांवळा सुंदरु ’ असाच प्रतीत झाला आहे. निरंजन रघुनाथांनाहि तो ‘ सर्वांगीं श्यामवर्ण ’ असाच दिसला आहे.

**वेश :** दत्तात्रेय हा अवधूत दिगम्बर योगी असल्यामुळें त्याचा वेश स्वाभाविकच जोग्यासारखा असणार. पुराणांत मात्र तो तसा भासत नाहीं. त्याचें पुराणांतील स्वरूप ‘श्री’–मान् विष्णूसारखें आहे. शांडिल्योपनिषदांत ‘ भस्मोद्धूलितसर्वाङ्गं जटाजूटधरं विभुम् ’ असें वर्णन आहे. विष्णुधर्मोत्तर-पुराणांत मात्र ‘ जटांनीं जणूं न दिसणारा ’ ( वाल्मीकिरूप ) असें दत्तरूप वर्णिलें आहे. मस्तकीं जटाभार, अंगाला विभूति, कटीला व्याघ्रचर्मांबर, पायीं खडावा आणि काखेंत झोळी हें त्याचें जोगी-रूप सर्वपरिचित आहे. नाथपंथाच्या वातारणांत—

**शैली शृंगी कंथा झोली बभूत लगाया तनमों ।**
**कोटि चंद्रका तेज झुलत है चलो आपने गतमों ॥**

अशा प्रकारें त्याला संपूर्ण नाथजोगी बनविलें आहे. दत्तात्रेयस्तोत्रांत ‘ भिक्षाटनं गृहे ग्रामे पात्रं हेममयं करे । ’ अशी त्याची भिक्षाटन-भूमिका

वर्णिली आहे; परंतु झोळीऐवजीं जोग्याच्या हातांत जें हेममय पात्र वर्णिलें आहे, तें जोगीवेशाला उचित वाटत नाही. अर्थात् भक्तांच्या आवडींत हा औचित्यविचार बसत नाही. एकीकडे त्याला अवधूत-दिगंबर जोगी असें मानूनहि त्याच्या वस्त्रालंकारांचा थाट भक्त वर्णन करतात. ' सैह्याद्रवर्णनां 'त—

**मूर्ति देउळाचा कळसु : कीं ब्रह्मरस वोतीव तेजसु**
**जेथ कैवल्य नीळकीर्णा विकाशु : तो श्रीमुकुट देखा ॥**

असें मुकुटवर्णन ( ओ. १२९ ) केलें आहे. निरंजन रघुनाथांनीं दत्तात्रेयाचें ' सालंकृत ' वर्णन कसें केलें आहे, तें आपण पृ. ३४–३५ वर पाहिलें आहेच.

**धेनु आणि श्वान** : धेनु हें पृथ्वीचें प्रतीक आहे आणि चार श्वान हें चारी वेदांचें प्रतीक आहे, असें सांगितलें जातें. चारी वेद दत्तात्रेयाला श्वानांप्रमाणें अनुसरले, असें सूचन या चार श्वानांच्या कल्पनेंत आहे, असें मानलें जातें. एकनाथांच्या एका दत्तपर अभंगांत धेनु आणि श्वान यांचा उल्लेख असल्याचें आपण पाहिलें आहेच. श्री. शं. बा. जोशी यांनीं या चार कुत्र्यांवरून अशी कल्पना केली आहे कीं, वैदिकांना अशुभ असणाऱ्या कुत्र्यांना जवळ करणारी ही देवता अवैदिक यतिसंप्रदायांतील असावी. आपल्या ' मऱ्हाठी संस्कृति ' या ग्रंथांत श्री. जोशी यासंबंधी लिहितात :

" दत्ताच्या चित्रांतील तीं कुत्रीं कुत्रींच नव्हेत तर कुत्र्यांच्या रूपानें वेद दत्ताला अनुसरीत आहेत, असें सांगितलें जातें. पण कोणत्याहि वैदिक देवतेच्या पाठीशीं कुत्रीं ( वेद ) आहेत, असें सुचविलेलें आढळत नाहीं. मल्हारी मार्तंडाजवळ कुत्रे वेदसूचक आहे असें सांगितलेलें ऐकिवांत नाहीं आणि मल्हारी मार्तंड ही देवता ( मल्लयदेवता ) मुळांत आर्यांची नसून पत्तिजनांची आहे. पत्तिजनांचा कुत्रा हा आवडता प्राणी आहे....

" वेद हे अपौरुषेय; त्या वेदांना संपूर्ण अनुसरणें ही वैदिकांची निष्ठा आहे. असें असतां वेदच अनुयायी होऊन अवधूत निरंजन अशा दत्तामागें कुत्र्याप्रमाणें पाठीस लागावेत, या संकेतामध्यें कांहींतरी विशेष खोच खास आहे.

" कुत्रा हा वैदिकांना न आवडणारा अपवित्र प्राणी. त्याचा स्पर्श झाला असतां सचैल स्नान करावें, अशी धर्मसूत्रांत आज्ञा केलेली आहे." [२८]

२८. मऱ्हाटी संस्कृति, पृ. १५१–१५२.

श्री. जोशी यांच्या या अभिप्रायावर आपलें मत नोंदवितांना श्री. चिं. ग. कर्वे म्हणतात : " त्रिमूर्ति दत्ताच्या भोंवतीं चार कुत्रीं दाखविलीं जातात. या दृश्यावरून हा देव अवैदिक आहे, असें कांहीं संशोधक मानतात. उदा. शं. बा. जोशीकृत ' मऱ्हाटी संस्कृति ' पहा. ) पण या तुच्छ, अधार्मिक मानल्या गेलेल्या प्राण्यांच्या संग्रहावरून या देवतेची सार्वत्रिक लोकप्रियताच प्रतीत होते." [१९]

आपण मागें पाहिलेंच आहे कीं, दत्तदेवतेचा उदय योग-तान्त्रिक वातावरणांत झाला असून दत्तसंप्रदायाच्या प्रारंभिक घडणींत नाथसंप्रदायाचा प्रभाव फार आहे. भिक्षाटनशील नाथजोगी जेव्हां संचार करीत, तेव्हां त्यांच्या बरोबर गाईंचे कळप आणि गो-रक्षणासाठीं कुत्रीं असत. आजहि गाईंचे कळप आणि कुत्री बरोबर घेऊन हिंडणारे नाथ-जोगी आपणांस आढळतात. नाथसंप्रदायांत ' आदिगुरू'चें स्थान पावलेला ' महाजोगी ' दत्तात्रेय आपोआपच हें स्वरूप पावला असावा, असें वाटतें. आणि प्रारंभीं आपाततः रूढ होणाऱ्या गोष्टींचें पुढें पुढें आध्यात्मिक वा प्रतीकात्मक रूप बनत जातें, हें जाणत्यांना चांगलें परिचित आहे. नाथसांप्रदायिक योग्यांच्या वेशांतील प्रत्येक वस्तूचें प्रतीकात्मक स्पष्टीकरण सांप्रदायिक साहित्यांत केलेलें आहे. महानुभाव संप्रदायाच्या श्रद्धेनुसार दत्तात्रेयाला मृगयेचें वेड आहे. या मृगयेच्या वेडाचाहि कुत्र्यांशीं संबंध सहजशक्य आहे.

**औदुंबरातळीं निवास** : दत्तात्रेयाचा वास औदुंबरातळीं असतो, अशी सर्वत्र श्रद्धा आहे. त्याचमुळें गुरुचरित्रादि ग्रंथांचें वाचन आणि ध्यानधारणादि साधन औदुंबरातळीं करण्याचें विशेष फल मानलें जातें. हें औदुंबराचें महिमान नरसिंह सरस्वतींनीं औदुंबराच्या छायेंत भिलवडी येथें चार महिने निवास केल्यामुळें रूढ झालें. गुरुचरित्राच्या १९ व्या अध्यायांत औदुंबर-महिमा वर्णिला आहे.

वरील सर्व विवेचनावरून एक गोष्ट स्पष्ट होते ती ही कीं, दत्तदेवता गेलीं दीड हजार वर्षें क्रमशः विकास पावत आली आहे. आज सर्वमान्य झालेलें दत्तस्वरूपहि सदैव स्थिर राहील, असें सांगतां यावयाचें नाहीं. भक्तांच्या अनुभूतीसुसार आणि चिन्तकांच्या प्रतिभेंतून उद्भवणाऱ्या कल्पनांनुसार

---

१९. ' प्रसाद ', एप्रिल १९५६, पृ. ५४.

त्या रूपांत कदाचित् आणखीहि भर पडत जाईल. क्रमशः परिणत होत जाणाऱ्या मानवाच्या संस्कृतीचीं प्रतीकेंहि क्रमशः परिणत होत राहिलीं, तर त्यांत आश्चर्य नाहीं.

## दत्तावताराचें रहस्य :

दत्तचरित्राच्या आणि दत्तस्वरूपाच्या येथवरच्या पाहणीवरून दत्तावतारासंबंधींची स्थूल कल्पना वाचकांस आली असेलच. दत्तात्रेयाच्या चरित्रावर प्रकाश टाकूं शकणारी जी प्राचीन सामग्री आपण धांडोळली, ती तीन प्रकारची आहे : १. पुराण–साहित्य, २. उपनिषत्साहित्य, आणि ३. तंत्रसाहित्य. या तीन प्रकारच्या सामग्रींतून प्रकटणाऱ्या दत्तस्वरूपांत कांहीं समान वैशिष्ट्यें असलीं तरी त्यांत भेदहि पुष्कळ आहे. या त्रिविध दत्तस्वरूपाचें सामंजस्य पुढें यथाक्रम घडून आलें, हें जरी खरें असलें तरी या तीन प्रणालींना मानणारे जे वेगवेगळे साधनासंप्रदाय नांदत राहिले, त्यांना अभिप्रेत असलेल्या दत्तस्वरूपांत आणि दत्तप्रणीत साधनापद्धतींत वेगवेगळेपण आजतागायत टिकून आहे. पुढील प्रकरणांत दत्तोपासनेच्या प्रसारासंबंधीं विवेचन करतांना या मुद्दयांचें अधिक स्पष्टीकरण होईलच.

तंत्रसाहित्यांतील दत्तात्रेय हा प्राधान्यानें त्रिपुरादेवीच्या उपासनेचा प्रवर्तक आहे. त्रिपुरा म्हणजे ( त्रि + पुरा – पूर्वी ) त्रयीच्या—ब्रह्मा - विष्णु - महेशांच्या–पूर्वीची, अनादि शक्ति. तिचें रहस्य जो जाणतो तो त्रिपुरारहस्याचा उद्गाता दत्तात्रेय होय. दत्तात्रेय हा अत्रीचा ( वा अत्रीच्या वंशांतील ) पुत्र होय. अत्रि म्हणजे ( अ+त्रि ) परमतत्त्वाच्या त्रैविध्याचा निषेध करणारा–तीन नसून एकच आहे असें उद्घोषिणारा–तत्त्वज्ञ. अत्रीचा पुत्र आणि त्रिपुरारहस्याचा प्रवर्तक या दत्तात्रेयाच्या दोन्ही भूमिका एकाच वैशिष्ट्याच्या निदर्शक आहेत, असें वाटतें. तंत्रसाहित्यांत दिसणारें दत्तात्रेयाचें स्वरूप हेंच दत्तात्रेयाचें आद्य स्वरूप असावें, असें मला वाटतें. योगस्थ बनून मद्य- मांस-मदिराक्षीचा उपभोग घेणारा आणि तरीहि सर्व बंधांपासून विमुक्त असणारा हा कुणी अत्रिगोत्रज तांत्रिक महासिद्ध असला पाहिजे. ज्यानें शिवाची आराधना करून योगसिद्धि आणि अद्वैतज्ञान प्राप्त केलें, मद्य-मांसादि मकारांना स्थान असणारी साधनापद्धति

अवलंबिली, वर्णाश्रमातीत अशा अवधूत दिगंबर वृत्तीचा आदर्श निर्माण केला, गुरुसंस्थेचें महिमान वाढवून स्वतः गुरुतत्त्वरूप बनला आणि शास्त्र-प्रामाण्याऐवजीं अनुभूतिप्रामाण्याची प्रतिष्ठा सिद्ध केली, त्या दत्तात्रेयाला तांत्रिक साधनेच्या क्षेत्रांत अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झालें, तर त्यांत आश्चर्य नाहीं.

इसवी सनाच्या दहाव्या शतकांत या तांत्रिक साधलेला जें विकृत, वामाचारप्रधान असें स्वरूप आलें—तसें स्वरूप येणें स्वाभाविकच होतें—त्याला विरोध करण्यासाठीं आणि भारतीय साधनेचें शुद्धीकरण करण्यासाठीं गुरु गोरक्षनाथानें नाथ संप्रदायाची उभारणी केली. तांत्रिक साधनेच्या प्रभावांतून भारतीय साधनेला मुक्त करण्याच्या प्रयत्नांत गोरक्षनाथानें पूर्ववर्ती साधनांतील जें ग्राह्य होतें तें तें सर्व अंगीकारलें, अशुद्ध होतें तें परिशुद्ध केलें आणि त्याज्य होतें तें नष्ट करून टाकलें. तांत्रिक साधनांतील शिव-शक्तिप्राधान्य, गुरुसंस्थेचें महिमान, अद्वैत विचार, प्रतीतिप्रामाण्य आणि अवधूतावस्था प्राप्त करण्याचें ध्येय या गोष्टी गोरक्षनाथानें उदार-वृत्तीनें स्वीकारल्या. तंत्रमार्गांतील यौगिक प्रक्रियांचें शुद्धीकरण करून त्यांतील मद्यादि पंचमकारांचें सेवन आणि स्त्री-प्रधान तंत्रयोग हे वामाचार त्यानें कटाक्षानें दूर केले आणि 'विषयविध्वंसैकवीर' असें बिरुद प्राप्त केलें. गोरक्षनाथाच्या प्रभावी व्यक्तिमत्त्वानें, अलौकिक योगसामर्थ्यानें आणि अतलस्पर्शी प्रज्ञेनें हें स्थित्यन्तर फार थोड्या कालावधींत घडून आलें. अर्थात् तंत्रमार्गांतील साधकांचीं दलेंच्या दलें गोरक्षानुयायी बनलीं आणि आपले पूर्वसंस्कार व गोरक्षोपदिष्ट मार्ग यांचें चमत्कारिक संमिश्रण बनवून त्यांनीं आपली नवी वाटचाल सुरू केली. या सर्व परिवर्तनांत तंत्रमार्गाचा एक महान् पूर्वाचार्य म्हणून दत्तात्रेय हा नाथसांप्रदायिक साधकांनाहि पूज्य वाटूं लागला असणार. दत्तात्रेयाच्या नांवावर पडणारें तंत्रसाहित्य आणि योगसाहित्य यांची वरवर तुलना केली, तरी त्यांत या परिवर्तनाचें प्रतिबिंब दिसून आल्याशिवाय राहणार नाहीं. नाथ संप्रदायाचा एक प्रमाणग्रंथ असलेली 'अवधूतगीता' ही दत्तप्रणीत समजली जाते. 'अवधूतगीते'च्या आठव्या अध्यायांत (श्लो. २६) मद्यपान आणि स्त्रीसंग यांचा कठोर निषेध केलेला आहे :

मद्यपानं महापापं नारीसंगस्तथैव च।
तस्माद्द्वयं परित्यज्य तत्त्वनिष्ठो भवेन्मुनिः ॥

हा अभिप्राय तांत्रिक साधनेंतील 'वामाचाराच्या पार्श्वभूमीवर विशेष चिन्तनीय आहे. नाथ संप्रदायाच्या वातावरणांत अवधूतावस्थेचा आदर्श व गुरुतत्त्वाचें प्रतीक म्हणून दत्तात्रेयाचें महिमान खूपच वाढलें आणि सर्व भारतभर नाथसंप्रदायाच्या विस्ताराबरोबर दत्तोपासनेचाहि प्रसार झाला. गिरनार येथील दत्तस्थान आणि नेपाळांतील भटगांव येथील एकमुखी दत्ताचें स्थान या नाथसंप्रदायाच्या प्रसाराच्याच पाऊलखुणा आहेत. अवधूतगीता, अवधूतोपनिषद् , जाबालदर्शनोपनिषद् इत्यादि ग्रंथांतून दिसणारें दत्तात्रेयाचें स्वरूप हें संपूर्णतः नाथ-प्रभावित आहे.

दत्तात्रेयाचें हें योग-तांत्रिक स्वरूप पुराणांत सुरक्षित असूनहि पुराणांतील दत्तात्रेय कांहींसा वेगळा भासतो. तंत्र आणि योग साधनेच्या क्षेत्रांत दत्तात्रेय देवतास्वरूप पावल्यानंतर आणि तंत्र व योग या साधनांच्या प्रभावानें समग्र भारतभूमि भारावल्यानंतर सनातन वैदिक परंपरा आपल्या स्वभावानुसार दत्त-देवतेला आपल्या पठडींत पचवून टाकायला सिद्ध झाली असणार. सनातन वैदिक परंपरेच्या समन्वयवृत्तींतून दत्तात्रेय या लोकप्रिय सिद्ध देवतेचें पुराणीकरण घडून आलें; तो विष्णूचा अवतार मानला गेला आणि त्याच्या अवतार-कथेंत प्राचीनतेचा आभास निर्माण करणाऱ्या अनेक पौराणिक व्यक्तींचाहि समावेश झाला. हें इतक्या बेमालूमपणें घडून आलें कीं, पुराणांतील दत्त-चरित्र हेंच दत्तात्रेयाचें प्राचीनतम अवतारचरित्र भासावें. पुराणांतील दत्त हा स्वतः 'अतिवर्णाश्रमी' असून आपल्या सर्व शक्ति चातुर्वर्ण्याच्या संरक्षण-संवर्धनासाठीं वापरणारा आहे, हें चिंतनीय आहे.

दत्तदेवतेच्या स्वरूपांतील ही परिणति तंत्र-साधना→ नाथ संप्रदाय→ पुराण संस्कृति या क्रमानेंच कांटेकोरपणें घडून आली, असा मात्र याचा अर्थ नव्हे. प्रथम तंत्रसाधनेंत लोकप्रिय ठरलेली ही विभूति पुराणांत विष्णूचा अवतार म्हणून देवता-स्वरूप पावूं लागली आणि एकीकडे तंत्रसाधना मावळूं लागतांच ती आपल्या अनेक मूलवैशिष्ट्यांसह नाथपंथाच्या योगसाधनेंत गुरुतत्वाचें प्रतीक बनली. नाथपंथांतील दत्तात्रेय हा पुराणांच्या माध्यमांतून आलेला नसून तंत्रांच्या

माध्यमांतून आलेला आहे. तंत्रसाधनेशीं नाथ पंथाचा प्रत्यक्ष संघर्ष झडला असल्यामुळें त्या उभय साधनांत जो सहज समन्वय घडून आला, त्यांत नाथसंप्रदायाला दत्ताचें निधान प्राप्त झालें; नाथ संप्रदायाच्या दत्तात्रेयावर पुराण-प्रभाव आढळत नाहीं.

नाथसंप्रदायानंतर उदयास आलेल्या महानुभाव संप्रदायांत योग-तांत्रिक प्रभावाखालील दत्त आणि पौराणिक दत्त यांचें संमिश्र स्वरूप दिसून येतें, तर श्रीनरसिंह सरस्वतीच्या जीवनप्रेरणेनें रूढ झालेल्या दत्तसंप्रदायांत पुराण-प्रभावित दत्त अधिराज्य गाजवीत असलेला दिसतो. आज सर्व महाराष्ट्रभर उपास्य बनलेला दत्तायेत्र हा पुराण प्रभावित आहे, हें उघड आहे. विविध साधना-प्रणालींत विविध वैशिष्ट्यांनीं नांदणाऱ्या दत्तदेवतेविषयीं आपण पुढील प्रकरणीं अधिक विस्तारानें विचार करूं.

पुराणांनीं दत्तदेवतेच्या प्राचीनतेचा जो आभास निर्माण केला आहे, त्याला महाभारतांतील उल्लेखांनीं पुष्टि मिळाल्यासारखें वाटतें. परंतु महाभारतांतील दत्तविषयक उल्लेख प्रायः उपाख्यानें आणि व्रतमहिमानें अशा ठिकाणीं आले आहेत. हा भाग महाभारतांत नंतर समाविष्ट झालेल्या सामग्रीनें बनला आहे, हें जाणत्यांना सुपरिचित आहेच. शिशुपालवधांतील दत्तात्रेयाच्या अवतारित्वाविषयींचा उल्लेख मात्र कालदृष्ट्या निर्णायक आहे. शिशुपालवधाचा काल इ. स. ६५० च्या सुमाराचा आहे, हें विद्वानांनीं निश्चित केलें **आहे**. ज्या अर्थी सातव्या शतकाच्या मध्याला दत्तात्रेय हा विष्णूचा अवतार गणला गेला आहे, त्या अर्थी त्यापूर्वी दोन-चार शतकें तरी त्याचें दैवतीकरण झालें असावें, असें वाटतें.

अर्थात् दत्तदेवतेची प्राचीनता इसवी सनाच्या मागें जाऊं शकत नाहीं, या मुद्द्यावर त्या देवतेचें महिमान कमी होण्याचें कारण नाहीं. ती देवता लोकमतावर किती प्रमाणांत प्रभाव पाडूं शकते, अनन्य उपासकांची मांदियाळी आपल्या चरणीं किती प्रमाणांत गोळा करते आणि चिंतकांच्या प्रगाढ चिंतनाचा किती प्रमाणांत विषय बनते, यावर त्या देवतेचें महिमान अवलंबून असतें. इसवी सनाच्या पांचव्या शतकामागें ज्या पांडुरंगाची प्राचीनता जाऊं शकत नाहीं, त्या पंढरीच्या पांडुरंगानें इसवी सनाच्या तेराव्या शतकापासून सारें मराठी लोकमानस आपल्या भक्तीनें

कसें अंतर्बाह्य रंगवून टाकलें आहे, हा इतिहास आपल्यासमोर ज्वलन्त स्वरूपांत उभा आहे. तीच स्थिति दत्तात्रेयाची आहे.

दत्तदेवतेच्या उदय-विकासाचा हा ऐतिहासिक प्रपंच झाला. कांहीं जाणती मंडळी दत्तावताराचें आणि दत्तस्वरूपाचें प्रतीकात्मक स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न करतात. ‘ श्रीदत्त-दर्शन ’ या पुस्तकांत डॉ. स. कृ. फडके लिहितात :

“ मृग नक्षत्राचे चार खूर तेच चतुर्वेद, रोहिणी तीच आदिमाया धेनु, मृग नक्षत्रांतील अग्नि ( रुद्र ), सोम आणि विष्णु हे त्रिशर म्हणजेच दत्ताचें त्रिशिर, अशी ही नक्षत्ररचना ( मार्गशीर्ष शु. १५ च्या रात्रीं–दत्तजन्माच्या रात्रीं ) एका दृष्टीनें दत्तस्वरूपाचें प्रतीकच म्हणतां येईल. चंद्रालाहि कोठें कोठें विष्णु मानलें आहे....पौर्णिमेचा चंद्र म्हणजे विष्णु असें जर मानलें, तर शुद्ध चतुर्दशीचा वर्धिष्णु चंद्र म्हणजे ब्रह्मदेव व वद्य प्रतिपदेचा क्षयसूचक चंद्र हाच रुद्र असें मानून पौर्णिमेनें धारण केलेलें रूप हें उत्पत्ति–स्थिति–लय यांचें सूचक असेंहि एक रमणीय प्रतीक मानतां येईल.” [३०]

पं. महादेवशास्त्री जोशी यांनींहि एके ठिकाणीं दत्तजन्माचें वर्णन नक्षत्रप्रतीकानें केलें आहे : “....गगनांगणांत त्रैमूर्तींच्या जन्माचें समग्र आख्यान मांडलेलें दिसत होतें. उत्तरेला सारथि पुंजांतला ब्रह्महृदयाचा तो ठळक तारा म्हणजे श्रीविष्णु. त्याच्या पदकमलापासून निघालेली आणि कृत्तिकापुंजाच्या रेषेंत ब्रह्महृदयाच्या दक्षिणेस असलेल्या अग्नीलाच जर रुद्र मानलें, तर त्याच्या जटेंतून खालीं कोसळणारी ती स्वर्धुनी म्हणजे आकाश-गंगा. तो जवळच रोहिणी नक्षत्राचा अधिपति म्हणून उल्लेखलेला ब्रह्मा. असे हे ब्रह्मा–विष्णु–महेश आपापल्या स्थानीं विराजत होते....एक दिवस स्त्रीहट्टापुढें निरुपाय होऊन अनसूयेच्या सत्त्वहरणासाठीं त्यांना अत्रीच्या आश्रमांत जावें लागलें. पण झाला प्रकार उलटा. त्या महासतीचें सामर्थ्य त्यांच्याहून आगळें ठरलें. तिनें त्यांना अर्भकें बनविलीं आणि त्यांचा पाळणा लोंबवला. चार पायांचें लंबचौकोन मृग नक्षत्र जर पाळण्याच्या जागीं कल्पिलें, तर मधला इषुत्रिकांड हीं तीन गोजिरीं बालकें शेजारीं शेजारीं आंत पहुडलीं आहेत, असें म्हणायला हरकत कोणती ! दुसऱ्या प्रकारानें

---

३०. श्रीदत्तदर्शन : डॉ. स. कृ. फडके, पृ. ७.

बोलायचें तर जीव हा अविद्येच्या घोंगडींत गुरफटलेला आणि ईश्वर हा मायेची शाल पांघरलेला असतो. दत्तोपासनेंत घनिष्ठ संबंधानें असलेली त्रिपुरसुंदरी ही एक मायाच आहे. मृगाच्या ठिकाणीं जर तिची कल्पना केली, तर आंतला इषुत्रिकांड म्हणजेच मायोपाधिक ' त्रिगुणात्मक त्रैमूर्ति ' दत्त म्हणावें लागेल. दत्ताच्या चित्रांत नेहमीं आढळणारीं कुत्रींहि तिथें आहेतच. एक लुब्धक मंडळाची श्वानाकृति आणि दुसरा प्रश्वा. मार्गशीर्ष पौर्णिमेचा प्रदोष हा दत्तजन्माचा काल आहे. त्या दिवशीं सूर्यास्ताला दत्तजन्माचा गुलाल उधळत असतां मृगाचा पाळणा आंतल्या तीन बाळां-सह पूर्वक्षितिजावर झुलूं लागतो. "[३१]

या नक्षत्रप्रतीकाप्रमाणेंच एक तात्त्विक स्पष्टीकरणहि दिलें जातें : " अत्रि हें नांव नसून ती पदवी आहे. अ म्हणजे नाहीं आणि त्रि म्हणजे तीन. तीन निरनिराळ्या शक्ति नसून एकच तत्त्व आहे, हें सिद्ध करणारा तो अत्रि. त्याची पत्नी अनसूया म्हणजे जिच्या ठिकाणीं असूया ( Bias ) नाहीं अशी बुद्धि—निर्विकार बुद्धि. तिन्ही तत्त्वें संशोधनाकरितां आलीं असतां ती नागवी झाली, म्हणजे तिनें स्वतःवरील पूर्व संस्कारांचें पटल काढून टाकलें. ती वस्त्रहीन—निर्विकार झाल्याबरोबर त्या तिन्ही तत्त्वांचें प्रौढत्व संपलें—तीं बाळें झालीं. तपश्चर्येहून परतलेल्या अत्रीच्या दृष्टिक्षेपानें त्यांचें ऐक्य झालें. म्हणजे अत्रीच्या निर्विकार व तपोभिपूत चिन्तनाचा परिपाक असा, या त्रयीचें ऐक्य दाखविणारा, दत्तात्रेय आहे."[३२]

या सर्व कल्पना दत्तात्रेयाचें त्रिमूर्ति स्वरूप गृहीत धरून केलेल्या आहेत. एखाद्या उपास्याचा महिमा जसजसा वाढत जातो, तसतसे उपासक आपल्या भक्तिप्रवण प्रज्ञेनें त्या उपास्याचें तात्त्विक स्वरूप घडवीत-वाढवीत जातात आणि कांहीं काळानंतर तें उपास्य निगूढ तत्त्वांचें, उच्चतम अनुभूतींचें आणि संस्कृति-मूल्यांचें प्रतीक बनतें. दत्त-देवतेच्या विकास-क्रमाची कहाणीहि या सिद्धान्ताचें प्रत्यन्तर घडवीत आहे.

* * *

---

३१. तीर्थरूप महाराष्ट्र, भा. १ : पं. महादेवशास्त्री जोशी, पृ. ४६–४७.
३२. परिचय : ल. का. देशपांडे, पृ. १७५.

# २ : दत्तोपासना : उदय आणि विकास

## पुराणकालीन दत्तोपासना :

मागील प्रकरणांत दत्तावताराच्या रहस्याचा वेध घेण्याचा एक स्थूल प्रयत्न केला आहे. त्या सर्व विवेचनावरून असें दिसून आलें कीं, इसवी सनाच्या पहिल्या सहस्रकाच्या अखेरीस दत्तात्रेय ही देवता पुराण-वाङ्मयांत बरीच प्रसिद्धि पावली होती. अर्थात् प्रत्यक्ष लोकधर्माच्या क्षेत्रांत ती उपासनेचा विषय किती प्रमाणांत बनली होती, हें सांगायला आज तरी साधनें उपलब्ध नाहींत. पुराणांतील दत्तलीलांवरून दत्तोपासनेच्या व्याप्तीचे अंदाज बांधणें अशक्य आहे. पुराणांत वर्णिलेल्या सर्व अनेकविध देवता सार्वत्रिक उपासनेचा विषय बनल्या होत्या, असें म्हणतां येणार नाहीं. यादवपूर्व काळांत महाराष्ट्रांत प्राधान्यानें शिवाची (आणि शक्तीचीहि) उपासना व्यापक प्रमाणावर रूढ होती. यादवपूर्व काळांतील शेंकडों शिलालेखांतून तत्कालीन उपासनाविषयांचे उल्लेख आढळतात. त्या उल्लेखांतून शिव-शक्ति-विष्णु या प्रधान उपास्यांशिवाय अनेक गौण देवतांचेहि तुरळक उल्लेख आहेत; परंतु कुठेंहि दत्तात्रेयाचें मंदिर उभारलें गेल्याचा वा अन्य दत्तोपासनाविषयक उल्लेख आढळत नाहीं. पुराव्यांचा अभाव हें कारण दत्तोपासनेचें प्राचीन अस्तित्व नाकारण्यास पुरेसें नाहीं, हें जरी खरें असलें, तरी नाथसंप्रदायाच्या उदयापूर्वी (इसवी सनाचें ११ वें शतक) दत्तोपासना लोकमानसांत विशेष स्थान पावली नसावी, असें वाटतें.

पुराणांत वर्णन केलेल्या दत्तशिष्यांपैकीं यदु, आयु, अलर्क, सहस्रार्जुन व परशुराम हे क्षत्रिय वृत्तीचे आहेत. दत्तात्रेयाच्या कृपाप्रसादानें वर्णाश्रमधर्माची प्रतिष्ठा राखण्याचें कार्य या दत्तोपासकांनीं केलें, असें पुराणकारांचें सांगणें आहे. भागवतांत नोंदविलेला आणखी एक प्रसिद्ध दत्त-शिष्य म्हणजे प्रल्हाद. हा मात्र राज्यवैभवाचा मोह सोडून मुमुक्षु बनला होता. उपनिषदांत उल्लेखिलेला सांकृति हा दत्तशिष्य एक महामुनि होता. हे पुराणकालीन दत्तोपासक दत्ताचे शिष्य समजले जातात; ते उपासक नव्हत. प्रल्हाद हा दत्तशिष्य श्रीविष्णूचा उपासक होता, हें सर्वश्रुत आहे. म्हणजे दत्तात्रेय हें

गुरुतत्त्वाचें प्रतीक आहे, उपास्य दैवत नव्हे, अशी कांहिंशी कल्पना पुराण-काळांतहि रूढ असावी, असें वाटतें. या कल्पनेवरूनहि दत्तात्रेयाच्या रहस्य-मूळावर कांहीं प्रकाश पडूं शकेल. दत्तात्रेय हा जर विष्णूचा अवतार आहे, तर विष्णूच्या राम-कृष्ण आदि अन्य अवतारांप्रमाणें तो उपासनेचा स्वतंत्र विषय न बनतां केवळ शक्तिदान करणारा वा मंत्रदीक्षा देणारा गुरुच कसा ठरावा ? गुरुतत्त्वाचा अंतिम आदर्श हें जें दत्तात्रेयाचें स्वरूप पुराणकाळा-पासून आजतागायत रूढ आहे, त्या स्वरूपांतच दत्तात्रेयाच्या ' अवतारा 'चें रहस्य दडलेलें असावें. मीं मागील प्रकरणांत सूचित केल्याप्रमाणें दत्तात्रेय हा तंत्रसाधनेच्या क्षेत्रांतला एक महासिद्ध असला पाहिजे. त्याच्या सिद्धींच्या आणि पारमार्थिक अधिकाराच्या प्रसिद्धींतून अखिल भारतीय साधनेच्या क्षेत्रांत त्याला 'श्रीगुरू'चें स्थान लाभलें असावें आणि त्याचें संपूर्ण पुराणी-करण झाल्यानंतरहि त्याचें हें लोकप्रसिद्ध 'सद्‌गुरुस्वरूप' कायम राहिलें असावें.

पुराणकाळांतील बहुतेक दत्तोपासक ' अर्थार्थी ' आहेत. त्यांच्या कांहीं लौकिक—ऐहिक आकांक्षा आहेत आणि त्या आकांक्षांच्या परिपूर्तीसाठीं वा अडचणींच्या परिहारासाठीं त्यांना दत्तकृपेची आवश्यकता वाटत आहे; निष्काम बनून दत्तात्रेयाची अनन्य उपासना करणारे थोर दत्तोपासक अनेक होऊन गेले असले तरी पुराण-काळांतील दत्तोपासनेंतील हा ' सकामते'चा अंश अगदीं विसाव्या शतकापर्यंत बहुजनांत टिकून आहे, हें कुणाहि निरीक्षकाच्या सहज लक्षांत येईल.

पुराणकथांच्या अद्‌भुत आवरणांतून दिसणारें दत्तस्वरूप रहस्यमय आहे. आज उपलब्ध असलेल्या साधनसामग्रीवरून त्या रहस्याचा संपूर्ण उलगडा करतां येणें अशक्य आहे. तेव्हां आपण पुराणांच्या अद्‌भुतरम्य गूढ वाता-वरणांतून बाहेर येऊं आणि दत्तोपासनेच्या प्रत्यक्ष इतिहासाचा आढावा घेऊं. पुराणांचें क्षेत्र सोडून इतिहासाच्या भूमीवर पाऊल टाकल्याबरोबर आपणांस दत्तोपासनेचा आढळ होतो, तो नाथ संप्रदायाच्या वातावरणांत. नाथ संप्रदायाचा दत्तात्रेयाशीं असलेला संबंध मागें स्थूल स्वरूपांत सूचित केला आहेच. नाथ संप्रदायानंतर महानुभाव संप्रदायांतहि दत्तात्रेयाचें स्थान विशेष आहे. पुढें चौदाव्या शतकांत नरसिंह सरस्वतींच्या प्रेरणेंतून खास

दत्तभक्तिप्रधान दत्तसंप्रदाय रूढ झाला. परंतु या दत्तसंप्रदायाशिवाय वारकरी संप्रदाय, आनंद संप्रदाय, समर्थ संप्रदाय इत्यादि अन्य संप्रदायांतहि दत्तात्रेय हें एक परमश्रद्धास्थान मानलें गेलें आहे. दत्तसंप्रदायाचा विस्तृत परामर्श आपण पुढील प्रकरणांतून घेणार असल्यामुळें येथें दत्तसंप्रदायेतर संप्रदायांतील दत्तात्रेयाच्या स्थानाचा क्रमानें विचार करूं या.

## दत्तात्रेय आणि नाथ संप्रदाय :

दत्तात्रेय आणि नाथ संप्रदाय यांच्या संबंधाविषयीं मागें ओझरतें विवेचन आलें आहेच. दत्तात्रेय हा 'अवधूत' जोगी आहे आणि नाथ संप्रदाय हा 'अवधूत पंथ' आहे, एवढ्या एकाच गोष्टीवरून दत्तात्रेयाचा आणि नाथ संप्रदायाचा आत्मीय संबंध सिद्ध होऊं शकेल. परमप्राप्तीसाठीं योगसाधनेचा स्वीकार आणि गुरुसंस्थेची महनीयता हीं दत्तस्वरूपांतील दोन मोठीं वैशिष्ट्यें नाथ संप्रदायाच्या सिद्धान्तांत आणि साधनेंत अनुस्यूत आहेत. अवधूतावस्थेच्या विचाराला नाथ संप्रदायांत अत्यंत महत्त्वाचें स्थान आहे. गोरक्षनाथ हा अवधूतावस्थेचा परमप्रकर्ष समजला जातो. गोरक्षनाथाचा उल्लेख केवळ 'अवधू' (अवधूत) या शब्दानेंहि केला जातो. कबीराच्या साहित्यांत 'अवधू' हा शब्द नाथजोगी या अर्थानें अनेकदां आलेला आहे. त्याचमुळें दत्तात्रेयप्रणीत समजला जाणारा 'अवधूगीता' हा ग्रंथ नाथसंप्रदायांत एक प्रमाणग्रंथ म्हणून प्रतिष्ठा पावला आहे. कदाचित् नाथ संप्रदायांत दत्तात्रेयाला अवधूतावस्थेचा परमादर्श म्हणून स्थान असल्यामुळें 'अवधूतगीता' हा दत्तात्रेयप्रणीत ग्रंथ नाथ-संप्रदायाच्या परंपरेंत वा प्रभावाखालीं निर्माण झाला असावा असें वाटतें. ज्या अवधूतावस्थेमुळें दत्तात्रेय आणि नाथसंप्रदाय यांचा आत्मीय संबंध संभवला, त्या अवधूतावस्थेचीं लक्षणें तरी कोणतीं ?

पहिल्या प्रकरणांत उल्लेखिलेल्या अवधूतोपनिषदांत सांकृति नामक शिष्याला दत्तात्रेय अवधूताचीं लक्षणें सांगत आहे :

**अक्षरत्वाद्वरेण्यत्वाद्धूतसंसारबन्धनात् ।**
**तत्त्वमस्यादिलक्ष्यत्वादवधूत इतीर्यते ॥ १ ॥**
**यो विलङ्घ्याश्रमान्वर्णानात्मन्येव स्थितः सदा ।**
**अतिवर्णाश्रमी योगी अवधूतः स उच्यते ॥ २ ॥**

दत्तात्रेय-प्रणीत अवधूतगीतेंत ‘ अवधूत ’ या शब्दांतील प्रत्येक अक्षराचें लक्षण सांगून अवधूतावस्था चितारली आहे :

आशापाशविनिर्मुक्त आदिमध्यान्तनिर्मलः ।
आनन्दे वर्तते नित्यमकारं तस्य लक्षणम् ॥
वासना वर्जिता येन वक्तव्यं च निरामयम् ।
वर्तमानेषु वर्तेत वकारं तस्य लक्षणम् ॥
धूलिधूसरगात्राणि धूतचित्तो निरामयः ।
धारणाध्याननिर्मुक्तो धूकारस्तस्य लक्षणम् ॥
तत्त्वचिन्ता धुता येन चिन्ताचेष्टाविवर्जितः ।
तमोहंकारनिर्मुक्तस्तकारस्तस्य लक्षणम् ॥ [1]

‘ सिद्धसिद्धान्तपद्धति ’ या गोरक्षप्रणीत ग्रंथांत अवधूतावस्थेच्या लक्षणांवर एक संपूर्ण प्रकरण खर्ची पडलें आहे. प्रारंभींच गोरक्षनाथ सांगतो :

यः सर्वान् प्रकृतिविकारान् अवधुनोतीत्यवधूतः ।
दैहिक-प्रपंचादिषु विषयेषु संगतं मनः प्रतिगृह्य,
तेभ्यः प्रत्याहृत्य स्वधाममहिम्नि परिलीनचेताः
प्रपंचशून्य आदिमध्यान्तभेदवर्जितः ॥
क्लेशपाशतरङ्गाणां कृन्तनेन विमुण्डनम् ।
सर्वावस्थाविनिर्मुक्तः सोऽवधूतोऽभिधीयते ॥
निजस्मरविभूतिर्यो योगी स्वाङ्गे विभूषितः ।
आधारे यस्य वारूढः सोऽवधूतोऽभिधीयते ॥
लोकमध्ये स्थिरासीनः समस्तकलनोज्झितः ।
कौपीनं खर्परोऽदैन्यं सोऽवधूतोऽभिधीयते ॥
शं सुखं खं परं ब्रह्म शंखं संघट्टनाद्भवत् ।
सिद्धान्तं धारितं येन सोऽवधूतोऽभिधीयते ॥
पादुका पदसंवित्तिर्मृगत्वच् महाहतम् ।
वेला यस्य परा संवित्सोऽवधूतोऽभिधीयते ॥

१. अवधूतगीता, ८·६–९.

चित्प्रकाश-परानन्दौ यस्य वै कुण्डलद्वयम् ।
जपमालाक्षविश्रान्तिः सोऽवधूतोऽभिधीयते ॥
यस्य धैर्यमयो दण्डः पराकाशं च खर्परम् ।
योगपट्टं निजा शक्तिः सोऽवधूतोऽभिधीयते ॥
भेदाभेदौ स्वयं भिक्षां षट्रसास्वादने रतः ।
जारणा तन्मयीभावः सोऽवधूतोऽभिधीयते ॥
अचिन्त्ये निजदिग्देशे स्वान्तरं यस्तु गच्छति ।
एकदेशान्तरीयो यः सोऽवधूतोऽभिधीयते ॥
स्वपिण्डममरं कर्तुमनन्याममरीं च यः ।
स्वयमेव पिबेदेतां सोऽवधूतोऽभिधीयते ॥
अचिन्त्यं वज्रवद्गाढा वासनामलसङ्कुला ।
सा वज्री भक्षिता येन सोऽवधूतोऽभिधीयते ॥
आवर्तयति यः सम्यक् स्वस्वमध्ये स्वयं सदा ।
समत्वेन जगद्वेत्ति सोऽवधूतोऽभिधीयते ॥
स्वात्मानमवगच्छेद्यः स्वात्मन्येवावतिष्ठते ।
अनुत्थानमयः सम्यक् सोऽवधूतोऽभिधीयते ॥
अनुत्थाधारसम्पन्नः परविश्रान्तिपारगः ।
धृतिचिन्मययतत्त्वज्ञः सोऽवधूतोऽभिधीयते ॥
अव्यक्तं व्यक्तमाधत्ते व्यक्तं सर्वं ग्रसत्यलम् ।
सत्यं स्वान्तरे सन् यः सोऽवधूतोऽभिधीयते ॥
अवभासात्मको भासः स्वप्रकाशे सुसंस्थितः ।
लीलया रमते लोके सोऽवधूतोऽभिधीयते ॥
क्वचिद्भोगी क्वचित्त्यागी क्वचिन्नग्नः पिशाचवत् ।
क्वचिद्राजा क्वचाचारी सोऽवधूतोऽभिधीयते ॥[२]

या दीर्घ उताऱ्यांवरून दत्तात्रेयोक्त आणि गोरक्षनाथोक्त अवधूतकल्पनेचें एकत्व वाचकांना समजून येईल. जीवनध्येयाच्या या मूलभूत साम्याशिवाय या दोन 'सिद्धां'च्या विचारांत आणखीहि साम्यें आढळतील. गोरक्षनाथाचा

२. सिद्धसिद्धान्तपद्धति, ६·१,३-२०.

नाथसंप्रदाय हा वामाचारी साधनांविरुद्ध प्रतिक्रिया म्हणून उदय पावलेला आहे. स्त्री आणि मद्यमांसादि मादक द्रव्यांना ज्या साधनाप्रणालींत स्थान होतें, अशा तांत्रिक साधनांच्या प्रभावांतून भारतीय साधनेची मुक्ति करण्याचा एक महान् प्रयत्न गुरु गोरक्षनाथानें केला. या त्याच्या असामान्य जीवन-कार्यामुळेंच ज्ञानेश्वर आपल्या या परमगुरूला 'विषयविध्वंसैकवीर' या बिरुदानें गौरवितात. वामाचाराविरुद्ध आंदोलन उभें करतांना स्वाभाविकच गोरक्षवाणींत स्त्रीनिंदेचा प्रकर्ष झाला आहे. गोरक्षनाथाच्या नांवावर असलेल्या हिंदी रचनांचें संकलन ज्या 'गोरखबानी' या ग्रंथांत झालें आहे, त्याच्या पानोपानीं स्त्रीनिषेधाचे उद्गार आपणांस आढळतील. तांत्रिक योगिनींच्या जाळ्यांत अडकलेल्या आपल्या गुरूलाच गोरखनाथ सांगतो—

कांमनी बहतां जोग न होई, भग मुष परलै केता।
जहाँ उपजै तहाँ फिरि आवटै, च्यंतामानि चित एता ॥[3]

( कामिनीच्या संगतीनें योगसाधना सिद्धीस जाणें अशक्य आहे. आजवर भगमुखाच्या छंदानें कितीतरी भले भले नष्ट झाले. जेथून आपण या संसार-चक्रांत फेकले गेलों, त्याच स्थानाकडे पुनः परावृत्त होणें इष्ट नाहीं, अशी मनाला सारखी जाणीव द्यावयास हवी. )

अवधूतगीतेंहि अत्यन्त कठोरपणें स्त्रीनिंदा व्यक्त झालेली आहे :

न जानामि कथं तेन निर्मिता मृगलोचना ।
विश्वासघातकीं विद्धि स्वर्गमोक्षसुखार्गलाम् ॥
मूत्रशोणितदुर्गन्धे ह्यमेध्यद्वारदूषिते ।
चर्मकुण्डे ये रमन्ति ते लिप्यन्ते न संशयः ॥
कौटिल्यदम्भसंयुक्ता सत्यशौचविवर्जिता ।
केनापि निर्मिता नारी बन्धनं सर्वदेहिनाम् ॥
त्रैलोक्यजननी धात्री सा भगी नरको ध्रुवम् ।
तस्यां जातो रतस्तत्र हा हा संसारसंस्थितिः ॥
जानामि नरकं नारीं ध्रुवं जानामि बन्धनम् ।
यस्यां जातो रतस्तत्र पुनस्तत्रैव धावति ॥

३. गोरखबानी, पद ३.

भगादिकुचपर्यन्तं संविद्धि नरकार्णवम् ।
ये रमन्ति पुनस्तत्र तरन्ति नरकं कथम् ॥[४]

विस्तारभयास्तव दत्तात्रेय-गोरक्ष-विचारांतील साम्यांचा अधिक प्रपंच येथें करतां येत नाहीं. तो एक स्वतंत्र ग्रंथाचा विषय होऊं शकेल. येथें केवळ त्यांच्यांतील एकरसूत्रतेचें सूचन घडविलें आहे इतकेंच. या दिशेनें विचार करणाऱ्या जिज्ञासूंना त्या एकरसतेचीं दर्शनें संबंधित साहित्यांत जागोजाग घडतील. प्रत्यक्ष 'अवधूतगीता' हा ग्रंथ स्वामिकार्तिकसंवादात्मक असण्या-ऐवजीं दत्तात्रेयगोरक्षसंवादात्मक असल्याच्या नोंदीहि कांहीं हस्तलिखितांच्या समाप्तिलेखांत आढळतात.[५]

नाथ संप्रदायाच्या उत्तरकालीन ग्रंथांतून दत्त-गोरक्ष-संबंधाच्या अद्‌भुत कथा आणि त्यांच्यांतील तत्त्वसंवाद अनेकवार विवरिले आहेत. गोरख-बानींतील संकलनांत 'गोरष दत्त गुष्टि' या नांवाचें दत्तगोरक्षसंवादात्मक एक आर्ष हिंदी भाषेंतील प्रकरण आहे. मराठींतहि दत्तगोरक्षसंवादावर रचना झालेली आहे. चिंदड शंकर नांवाच्या तंजावरच्या नाथपंथी साधूनें लिहिलेलें 'गोरख-दत्तात्रयसंवाद' या नांवाचें २३ कडव्यांचें एक प्रकरण समर्थ वाग्देवता मंदिराच्या हस्तलिखित-संग्रहांत सुरक्षित आहे.[६] पुण्यांतील गंगानाथमठाच्या हस्तलिखित-संग्रहांत सुंदरनाथ ( काशीनाथ-शिष्य ) या नांवाच्या नाथपंथी साधूनें लिहिलेली 'अविनाशगीता' उपलब्ध झाली आहे. ही 'अविनाशगीता' दत्तगोरक्षसंवादात्मक आहे :

गोरक्षदत्तात्रयसंवादु । ऐकतां होये आत्मबोधु ।
उमळे अज्ञानाचा कंदु । श्रवणमात्रें ॥ १·२१.

'दत्तप्रबोध' या दत्तसांप्रदायिक ग्रंथांत ३६–४७ या १२ अध्यायांत मत्स्येंद्र-गोरक्षादि नाथसिद्धांच्या कथा समाविष्ट झालेल्या आहेत. त्यांतील ४६ व्या अध्यायांत मत्स्येंद-गोरक्षांना दत्तात्रेयानें गिरनार पर्वतावर उपदेश केल्याचा

४. अवधूतगीता ८·१२-१७.

५. Govt. Collections of Mss. ( B. O. R. I.) : Vol. IX, Part I ( Vedanta ). No. 95, 96

६. रामदासी संशोधन, खं. १, बाड क्र. १२२८.

वृत्तान्त आहे आणि ४७ व्या अध्यायांत गोरक्षनाथाच्या गर्वहरणासाठीं दत्तात्रेयानें दाखविलेल्या चमत्कारांचा वृत्तान्त आहे. 'नवनाथभक्तिसार' या नाथपंथीय ग्रंथाच्या ३७–३८ या अध्यायांत नागनाथ-चरपटनाथादि नाथसिद्धांना झालेल्या दत्तदर्शनाच्या आणि दत्तोपदेशाच्या कथा आलेल्या आहेत. नाथसांप्रदायिकांच्या कल्पनेनुसार दत्तात्रेय ही योगसिद्धि प्राप्त करून देणारी देवता आहे. उपास्य म्हणून नव्हे, तर सिद्धिदाता गुरु आणि अवधूतावस्थेचा आदर्श म्हणून नाथ संप्रदायांत दत्ताचें महिमान गायिलेलें आहे. गिरनार हें सुविख्यात दत्तक्षेत्र दत्तात्रेय आणि नाथ संप्रदाय यांच्या अनुबंधाचें जागतें प्रतीक आहे. सातशें वर्षांपूर्वी दत्तात्रेयाचा जयजयकार नेपाळपर्यंत पोंचविणारा संप्रदाय म्हणून दत्तोपासनेच्या इतिहासांत नाथ संप्रदायाचें महनीय स्थान आहे.

## दत्तात्रेय आणि महानुभाव संप्रदाय :

महानुभाव संप्रदाय हा दत्त संप्रदायच आहे. या संप्रदायाचे प्रवर्तक श्रीचक्रधर यांची परंपरा दत्तात्रेय–चांगदेव राऊळ–गुंडम राऊळ–चक्रधर अशी आहे. स्वतः चक्रधरांनींच सांगितलें आहे : "या मार्गासि श्रीदत्तात्रेयप्रभु आदिकारण ॥"[७] महानुभवांच्या 'पंचकृष्णां'त दत्तात्रेयाचा समावेश आहे. परंतु महानुभावांचा दत्तात्रेय हा देवतात्रयीचा वा विष्णूचा अवतार नाहीं. महानुभावांच्या तत्त्वज्ञानांत ब्रह्मा-विष्णु-महेश या गौण देवता मानल्या आहेत. त्यांच्या कल्पनेनुसार दत्तात्रेय, श्रीकृष्ण, चक्रपाणि ( चांगदेव राऊळ ), गोविंदप्रभु ( गुंडम राऊळ ) आणि श्रीचक्रधर हे पांच ईश्वरावतार होत. महानुभावांनीं दत्तात्रेयाचें पौराणिक चरित्र मात्र स्वीकारलें आहे. त्यांचा दत्तात्रेय हा अत्रि-अनसूयेचाच पुत्र आहे. अलर्क-सहस्रार्जुन-परशुराम हीं पुराणपात्रें त्याच्याशीं संबंधित आहेतच. या पंथांत आदिगुरु आणि उपास्य या उभय दृष्टींनीं दत्तात्रेयाचें स्थान आहे. महानुभावांच्या दत्तात्रेयाचें स्वरूप स्थूलतया पुढीलप्रमाणें आहे :

( १ ) महानुभावांचा दत्तात्रेय हा एकमुखी व द्विभुज आहे.

( २ ) तो विष्णूचा वा देवतात्रयीचा अवतार नाहीं.

---

७. चक्रधरोक्त सूत्रपाठ, विचार २८५.

( ३ ) त्यानें ‘ गर्भींचा अवतार ’ स्वीकारून परावर शक्तींचा स्वीकार केलेला आहे.

( ४ ) त्याचा अवतार चारी युगांत आहे.[८]

( ५ ) त्याची वाणी अमृतवर्षिणी[९] असून त्याचें दर्शन अमोघ आहे.[१०]

( ६ ) दत्तात्रेयाचा अवतार इतर अवतारांपेक्षां विलक्षण आहे. तो सदैव अदृश्यपणें वावरत असतो.

( ७ ) दत्तात्रेयाला निरंतर पारधीचें व्यसन आहे.

( ८ ) तो नेहमीं नाना वेष-रूपें धारण करून अधिकारी जीवांना मधून मधून दर्शन देतो.

“ महानुभावांच्या कल्पनेप्रमाणें दत्तात्रेयांच्या अवताराचा अदृश्य संचार महासंहारापर्यंत चालूच राहणार. त्यांचा अवतार त्रेतायुगांत झाला असला तरी त्याचें सर्व युगांत संचरण चालू असतें. ते सदैव अदृश्यरूपानें वावरत असल्यामुळें त्यांचें दर्शन साहसा कुणाला होत नाहीं. पण कधी सुदैवानें दर्शन झालें, तर तें वायां जात नाहीं. दत्तात्रेयांचें दर्शन म्हणजे एक परीनें जीवाला लाभलेला महाबोधच. दत्तात्रेय प्रभूंपासून ज्यांना बोधाची प्राप्ति होते, त्यांचा बोध सफल होऊन त्यांना निश्चयानें परमप्राप्ति होते. ज्याला दत्तात्रेयांपासून बोध लाभतो, त्याला दत्तात्रेय आपल्याबरोबर अदृश्य करून सदेहीच अपरोक्षदान करतात. उभय-दृश्यावतारापासून (श्रीचक्रधरापासून) ज्याला श्रीमुखें बोध व्हावा, अशी जोड ज्यानें जोडली असेल, त्यालाहि त्यांचें दर्शन होतें. तसेंच प्रेमाचें साधन ज्यानें जोडलें असेल, त्यालाहि त्यांचें दर्शन होतें; सारांश, भक्ताला तर नाहींच, पण त्याच्यापासून बोध झालेल्या ज्ञानियाला देखील ते दुसऱ्या अवताराजवळ निरवीत नाहींत. ज्यानें ज्ञानाधिकार जोडलेला नसेल, त्याला जर दत्तात्रेय प्रभूंचें दर्शन झालें, तर तेंहि वायां जात नाहीं. अशा पुरुषांना ते ज्ञानाधिकार घडवून दर्शन देतात. पण इतर कारणांमुळें ज्यांना ज्ञान होणें शक्य नाहीं, अशांना त्यांचें दर्शन झालें तर अशा पुरुषांच्या बाबतींत श्रीदत्तात्रेय प्रभूंनीं उच्चारलेले शब्द, वर,

८. चक्रधरोक्त सूत्रपाठ, विचार २८२.

९. चक्रधरोक्त सूत्रपाठ, विचार २८३.

१०. चक्रधरोक्त सूत्रपाठ, विचार २८४.

आशीर्वाद वगैरे सगळे यथार्थपणें फलद्रूप होतात. दत्तात्रेय प्रभूंची वाणी अमृताचा वर्षाव करणारी आहे; त्यांनी ' शंब्रोली शंब्रोली ' म्हणून अलर्कांचे तिन्ही ताप दूर केले."[११]

महानुभाव संप्रदायाचें ' आदिकारण ' दत्तात्रेय बनला, याचें कारण चक्रधरांचे परात्परगुरु चांगदेव राऊळ यांना लाभलेलें दत्तदर्शन हें होय. पुण्याजवळील फलटण या गांवीं जनकनायक नांवाचा एक कऱ्हाडा ब्राह्मण राहत होता. त्याच्या पत्नीचें नांव जनकाइसा. पुण्याजवळच्या प्रदेशांत व्यापार करून हा ब्राह्मण आपली उपजीविका करीत असे. परंतु त्याला पुत्र नव्हता. पुत्रप्राप्तीसाठीं त्यानें दुसरें लग्न केलें, परंतु तरीहि त्याला मुलगा झाला नाहीं. अखेर जनकनायकानें दैवी कृपेचा आश्रय घेतला. त्यानें 'चांगदेव' नांवाच्या देवतेस नवस केला. जनकाइसेचें माहेर होतें चाकण येथें. तेथील ' चक्रपाणि ' या देवतेला माहेरच्या मंडळींनीं नवस केला. एके दिवशीं चांगदेवानें जनकनायकाला स्वप्नांत दर्शन देऊन सांगितलें कीं, ' तुला पुत्र होईल. ' चांगदेवाच्या कृपेनें जनकाइसेला पुत्र झाला. जनकनायकानें आपल्या श्रद्धेनुसार त्याचें नांव ' चांगदेव ' असेंच ठेवलें. मुलाला घेऊन जनकाइसा जेव्हां माहेरीं गेली, तेव्हां माहेरच्या लोकांनीं चक्रपाणीचा नवस फेडला आणि त्यांच्या श्रद्धेनुसार चांगदेवाला ' चक्रपाणि ' हें दुसरें नांव प्राप्त झालें.

विवाहयोग्य वयांत चांगदेवांचा विवाह झाला. त्यांच्या पत्नीचें नांव कमळाइसा अथवा कमळवदना. चांगदेवांनीं वाडिलांचाच व्यवसाय पत्करला आणि तो चांगल्या रीतीनें चालू ठेवला. परंतु प्रथमपासूनच त्यांची वृत्ति वैराग्यप्रवण होती. कमळाइसा ऋतुस्नात झाल्यावर तिला माहेराहून आणण्यासाठीं निघालेल्या आपल्या पित्याला चांगदेवांनीं मोडता घातला. शेवटीं माता-पित्यांच्या आग्रहामुळें ते संसार करूं लागले. कांहीं काळानंतर जनकाइसा आणि जनकनायक क्रमानें मृत्यु पावले. पित्याच्या वर्षश्राद्धाच्या दिवशींच कमळाइसेनें त्यांच्याकडे रतिसुखाचा हट्ट धरला. या प्रकारानें आधींच विरक्त असलेलें चांगदेवांचें मन अधिकच उदास बनूं लागलें. पुढें आणखी एकदां एकादशीच्या दिवशीं कमळाइसेनें आपली कामेच्छा पूर्ण

११. श्रीचक्रधर-चरित्र : डॉ. वि. भि. कोलते, पृ. ३१.

करण्याचा आग्रह चांगदेवांजवळ धरला. तिच्या अनुरोधामुळें व्रतभंग झाल्यामुळें त्यांनीं गृहत्याग करायचें ठरवलें. कांहीं दिवसांनंतर माहूरच्या यात्रेला जाण्यासाठीं फलटणहून अनेक लोक निघाले. पत्नीचा निरोप घेऊन चांगदेव त्या झुंडीबरोबर घराबाहेर पडले आणि माहूरला पोंचले. तेथील मेरुवाळा तलावाच्या पाळीवर यात्रा उतरली होती. त्या यात्रेंतच चांगदेवहि होते. मेरुवाळ्यांत स्नान करून श्रीदत्तात्रेयाच्या शयनस्थानाकडे दर्शनासाठीं जात असतांना एका जाळीखालून श्रीदत्तात्रेयप्रभु व्याघ्रवेषानें डरकाळ्या फोडीत आले. त्या डरकाळ्यांनी भिऊन सारे लोक पळून गेले. चांगदेवांना मात्र भीति वाटली नाहीं. ते स्तब्धपणें त्या व्याघ्ररूप दत्तात्रेयाकडे पाहत उभे राहिले. त्या व्याघ्रानें एक पंजा चांगदेवांच्या मस्तकावर ठेवला आणि चांगदेवांना पर आणि अवर शक्ति प्रदान केल्या. अशा प्रकारें चांगदेवांना प्रत्यक्ष दत्तात्रेयानें बोध दिल्यामुळें दत्तात्रेयप्रभु हे 'महानुभाव संप्रदायाचें आदिकारण' बनले.

चांगदेवांच्या नांवापुढें 'राऊळ' हें उपपद आहे. 'राऊळ' म्हणजे गुरु वा श्रेष्ठ पुरुष. नाथ संप्रदायांत 'राऊळ' (रावळ) या नांवाचा एक उपपंथ आहे. या उपपंथाचा प्रवर्तक नागनाथ नामक एक सिद्ध समजला जातो. या उपपंथांत मुसलमानांचा भरणाहि बराच आहे. महानुभावांच्या ग्रंथांत क्वचित् मुकुंदराजांच्या नाथ परंपरेशीं अनुबंध जोडणारे जे उल्लेख आढळतात, त्यांचा या 'राऊळ' शाखेशीं कांहीं संबंध असावा, असें वाटतें. या उल्लेखानुसार मुकुंदराजांचे आजेगुरु हरिनाथ यांच्या अनेक शिष्यांत नागनाथ नांवाचा एक शिष्य होता. हा नागनाथच महानुभाव परंपरेच्या गुरुस्थानीं होता, असें या उल्लेखांत नोंदविलें आहे. हा नागनाथच जर राऊळ शाखेचा प्रवर्तक असलेला नागनाथ असेल, तर चांगदेव राऊळ आणि त्यांचे शिष्य गुंडम राऊळ, दंडी राऊळ, नागा राऊळ आदि पुरुषांच्या 'राऊळ' या उपपदाची संगति लागूं शकते. चांगदेव राऊळांच्या जीवनांत गुरुपद भूषविणारा पुरुष हा राऊळपंथ-प्रवर्तक नागनाथ असावा. अर्थात् या अनुमानावर प्रकाश टाकणारी सामग्री आज तरी उपलब्ध नाहीं.

चांगदेव राऊळ बराच काळ माहूर येथें राहिले. तेथें असतांना त्यांनीं अवधूतवेष स्वीकारलेला होता. गांवांत भिक्षा मागून ते पर्वतावर विहरण

करीत. पुढें कांहीं दिवसांनीं ते द्वारावतीला गेले. तेथें गोमतीच्या तीरावर ते गुंफा बांधून राहिले. उजव्या हातांत खराटा आणि डाव्या हातांत सूप घेऊन ते द्वारकेंतील रस्ते झाडीत आणि तो केर सुपांत भरून गोमतींत टाकून देत. हा त्यांचा नित्याचा कार्यक्रम. दर्शनाला येणाऱ्या अधिकारी पुरुषांना हातांतील सूप वा खराटा मारून ते विद्यादान करीत. अशा बावन्न पुरुषांना त्यांनीं विद्यादान केलें. एका तांत्रिक योगिनीच्या रतीच्या आग्रहांतून सुटका करून घेण्यासाठीं त्यांनीं योगमार्गानें देहत्याग केला.

त्यांचे प्रमुख शिष्य ऋद्धिपुरचे गुंडम राऊळ. आणि गुंडम राऊळांचे शिष्य श्रीचक्रधर. चक्रधर हे चांगदेव राऊळांचेच अवतार होत, अशी महानुभावांची श्रद्धा आहे. भडोचच्या एका प्रधानाच्या मृत पुत्राच्या (हरपाळदेव) शवांत श्रीचांगदेव राऊळांनीं प्रवेश केला, अशी कथा या संप्रदायांत रूढ आहे. हा काया-प्रवेशाचा काळ श. ११४२ समजला जातो. याचा अर्थ असा कीं, श. ११४२ च्या सुमारास चांगदेव राऊळांचें निर्याण घडून आलें. त्यांच्या माहूर आणि द्वारावती येथील निवासाचा काळ ४२ वर्षांचा मानला तर सुमारें श. ११०० च्या सुमारास त्यांना दत्तदर्शन झालें, असें म्हणतां येईल. या वेळीं त्यांचें वय पंचवीस-तीस वर्षें असावें. म्हणजे त्यांचा जीवन-काल अंदाजें श. १०७२ ते ११४२ (इ. स. ११५० ते १२२०) असा ७० वर्षांचा ठरतो. ज्याच्या ऐतिहासिक नोंदी आढळतात, असा हा पहिला दत्तभक्त होत. चांगदेव राऊळ माहूरच्या यात्रेनिमित्त फलटणहून निघाले होते, या गोष्टीवरून माहूरच्या दत्तस्थानाचा महिमा त्यांच्याहि पूर्वीं दूरवर पसरलेला होता, हें सिद्ध होतें.

महानुभाव संप्रदायाचे संस्थापक आणि त्यांचा संप्रदाय मराठी संस्कृतीच्या इतिहासांत कांहींसा अभिनव आहे. चक्रधरांच्या व्यक्तिमत्त्वांत अनेकविध विचारांचे संस्कार आहेत. जैन धर्म आणि नाथ संप्रदाय यांच्या विचार-आचारांचा प्रभावी संस्कार त्यांच्या व्यक्तिमत्त्वावर झाला असावा, असें मानण्यास त्यांच्या चरित्रग्रंथांत (लीळाचरित्रांत) भरपूर वाव आहे. परमगुरूचा गुरु म्हणून चक्रधरांनीं दत्तात्रेयाला पूज्य मानलें आणि आपल्या संप्रदायाच्या तत्त्वज्ञानांतहि ईश्वरावतार म्हणून दत्तात्रेयाचें स्थान प्रथम मानलें. (वास्तविक महानुभाव संप्रदायाचें प्रवर्तन चक्रधरांनीं केलें. त्यांचें

गुरु गुंडम राऊळ आणि आजेगुरु चांगदेव राऊळ हे कांहीं खऱ्या अर्थानें महानुभाव सांप्रदायिक नव्हत. ते नाथसिद्ध असावेत, असा माझा साधारण तर्क आहे. परंतु त्यांच्या संप्रदायाचा विचार येथें अप्रस्तुत असल्यामुळें त्याविषयीं मी येथें विस्तार करीत नाहीं.) चक्रधरोक्त सूत्रपाठांत दत्तात्रेयाच्या महिमानाविषयीं चार सूत्रें[१२] आहेत. चक्रधर पांचाळेश्वर या विख्यात दत्तस्थानीं गेले असल्याची नोंद लीळाचरित्रांत[13] आहे. 'हें देखिलें गा: दत्तात्रेय प्रभूचें गुंफास्थान:' असे त्या वेळचे त्यांचे आनंदोद्गार आहेत. आपल्या अनुयायांना उपदेश करतांना निरनिराळ्या निमित्तांनीं चक्रधरांनीं दत्तात्रेयाच्या अवतारकथा सांगितल्या आहेत. या कथा लीळाचरित्रांत 'सैह्याद्रलीळा' म्हणून समाविष्ट झालेल्या आहेत: अलर्क राजाचे त्रिविध ताप नाहींसे करणें; रेणुकेला आपल्या वडिलांच्या सांगण्याप्रमाणें मारून टाकल्यावर परशुरामाचें माहूर येथें आगमन व तपश्चर्या; हैहयवंशी सहस्रार्जुनाला वरप्रदान; इत्यादि त्या लीळा होत. स्वत: चक्रधरांनीं दत्तात्रेयाविषयींचा कमालीचा श्रद्धाभाव व्यक्त केला असल्यामुळें महानुभावीय ग्रंथकारांनीं आपल्या ग्रंथांतून प्रारंभीं दत्तात्रेयाला वंदन केलेलें आहे. महानुभावांच्या आद्य ग्रंथांपैकीं 'साती ग्रंथ' म्हणून प्रसिद्ध असलेल्या सात ग्रंथांतील 'उद्धवगीता' (इ. स. १३०८) या भास्करभट बोरीकराच्या एकादशटीकेंत प्रारंभींच दत्तात्रेयाला नमन केलेलें आहे—

**सैह्याचळाचिये चुळुके: जयाचें प्रभामंडळ फांके**
**तो श्रीदत्तु ल्लाट-फळकें: नमस्करीतु असे ॥**[१४]

महानुभावांच्या 'साती ग्रंथां'त 'सैह्याद्रवर्णन' या नांवाचा ग्रंथ केवळ दत्तमहिमा गाण्यासाठीं लिहिलेला आहे. या ग्रंथाची रचना श. १२५४-मध्यें रवळो व्यास नामक ग्रंथकारानें केली आहे. या ग्रंथाची ओवीसंख्या ५१७ आहे. या ग्रंथाचा विषय दत्तात्रेयाच्या मूर्तीचें व लीलांचें वर्णन करणें हा आहे. ग्रंथाच्या प्रारंभींच ग्रंथकारानें आपला रचनाहेतु स्पष्ट केला आहे:

---

१२. चक्रधरोक्त सूत्रपाठ, विचार, २८२–२८५.
१३. लीळाचरित्र. भा. ४ (पूर्वार्ध खंड ३), पृ. २८.
१४. उद्धवगीता, १.

जो नित्य तेजें अधिष्ठाता : स्वयंप्रकाश आनंसदाविता
तो उदैला चैतन्याचळमाथा : तया नमुं श्रीचक्रपाणी
जो मोहांधकाराची अवधि तोडी : देवतानंद निर्माल्यगंध फेडी
जीवपशुवांचे बंध सोडी : प्रकट प्रबोधें
जयाचेनि ज्ञानतेजांशें : सकळही पदार्थत्व दीसे
तो उपासिलिया असे : परलाभ थोर
तो अवतारांतु गुरुवाः दैवी सुंदर्य बरवा
तया वेधला सुहावा : गुरुदेव देखा
तया श्रीचक्रपाणीचेन : वर प्रसादें मी करीन
मुर्तलीळावर्णन : श्रीदत्तात्रयाचें [१५]

या ५१७ ओव्यांच्या ग्रंथांत ५१–१८६ या ओव्यांत दत्तमूर्तिवर्णन (५१–१२५); अलर्कराजा, कार्तवीर्य (१२६–१५०); परशुरामाचें माहूर येथें जाणें व तपश्चर्या (१५१–१७५); सैहाद्रिपर्वत व एकवीरा यांचें वर्णन (१७६–१८०) आणि विज्ञानेश्वर, आत्मतीर्थ व पांचाळेश्वर (१८१–१८६) एवढा दत्तात्रेयविषयक भाग आहे. पुढें महानुभाव परंपरेंतील गुंडम राऊळ, चक्रधर आणि ग्रंथकाराच्या गुरुपरंपरेंतील अन्य व्यक्ति यांच्या गौरवाचा भाग आहे.

रवळो व्यासानें आपला दत्तात्रेयाविषयींचा श्रद्धाभाव उत्कटतेनें आणि अत्यंत काव्यमधुर शब्दांनीं व्यक्तविला आहे :

कीं चैतन्यकनकाचा लांवणदीवा : आत्रीवंशआनंदकुळेवा
कीं स्वयंप्रकाश आखंड लाखैवा : जीवोद्धरणाचा
कीं सर्वशक्तींचा मेळीं : परज्ञानचक्रगोंदळीं :
आनंद प्रकटला भूतळीं : जीवा उदो करीतु
कीं अनुसयागर्भगगनीं तापनाशक : उदैला आनंदमृगांक :
त्रीभुवन धवळिता एकु : तृप्त जीवचकोरा
कीं सर्वागमाचार्यो अत्रिपत्रीं : ब्रह्मविद्याबीमंत्र पवित्रीं
उद्धारिलें शांभवयेंत्रीं : जीवा सिद्धपुज्य

१५. सैहाद्रवर्णन, १–५.

कीं मायाशक्त हवनकुंडीं : कृपामंत्राहुतीचीया प्रौढी :
चीदानंद मूर्ति प्रकटली चोखडी : वरद स्थावर जंगमा
ते श्रीमूर्त चांपेगौर : कवणा वर्णवे सुंदर :
जीयचें नांवचि उदार : ते सगुण बोलों कैसी
जेथ पुराणा विवाद : षड्दर्शना उरोध :
आगमा नव्हेचि अनुवाद : निगमें नेति भणीतलें [१६]

या पराकोटीच्या भक्तिभावामुळें रवळो व्यासानें आपल्या परम उपास्याच्या मूर्तीचें वर्णन करतांना सारें प्रतिभासामर्थ्य शब्दांत ओतलें आहे. दत्तमूर्तीच्या सौंदर्याला आणि तेजाला या चराचरांत कशाचीहि उपमा शोभूं शकत नाहीं, हें सांगतांना रवळो व्यास म्हणतो :

जऱ्ही संध्यारागाचे सदा : काले दीजाति जांबुनदा
तऱ्ही तीय आंगकांतीसीं कदा : उपमुं नये
कनकगीरीचा गाभा सोलुनि : वर सूर्यप्रकाश संचरौनि
ओपा सारिजैल घोंटाळुनि : तऱ्ही उपमा नव्हे
घेउनि पद्मरागाचें तत्त्व : काढुनि सोनैचांपेयाचें सत्त्व
कनककेतकीचीया द्दति एकत्व : कीजैल जऱ्ही
परि हे उपमा पावळी : करणीयाचे नुरे पारखाळी
श्रीदत्ताची अंगकांति आगळी : सहज म्हणौनि
पाणी करूनि बीजुची खोटी : परतौनि संध्याराग एकवटी
पूर्णचंद्र वळघैल उटी : तऱ्ही सरी न पवे
तया आति कळातुटी : आस्ता जाय सेवटीं
चकोरा उपवासपाठीं : होय अंधकारु
म्हणौनि दत्ताचिय चंद्रांगकांति : उपमा नाहीं त्रिजगतीं
जीवचकोरा नित्यतृप्ती : मोहांधकारा ठाव नाहीं [१७]

आनंदाच्या आमोदानें भक्तभृंगांचे डोहाळे पुरविणारीं दत्तप्रभूचीं चरण-कमळें ग्रंथकाराला रंगाळ कुंकुमाच्या ठशांहूनहि अधिक सुरंग सुकोमळ

१६. सैह्याद्रवर्णन २३–२९.
१७. सैह्याद्रवर्णन, ३१–३७.

भासतात. आनंदाश्रूंच्या जळानें नयनांच्या चिरकांडींतून तो या श्रीचरणाचें अभिषेचन करतो. त्या चरणांना कंपादि भावाचा विजनवारा घालतो आणि मुखचंद्राची शोभा तन्मयतेनें न्याहाळत राहतो. त्याला सैह्याचळावरील वृक्षलतांचा, पशुपक्ष्यांचा आणि येथील लहानशा परमाणूंचाहि हेवा वाटतो. जेथील अणुरेणूवर श्रीदत्तात्रेयाच्या कृपेचा वर्षाव होत असतो, त्या सैह्याद्राचें हृदयंगम वर्णन रवळो व्यासानें केलें आहे :

तंव तो देखिला पर्वतु : जो कुळाचळांमाजि विख्यातु :
तेथ असे क्रिडतु : अत्रीनंदनु
कायि सांगो तेथिचीं झाडें : तीये पाहुनि सुरतरु बापुडे :
तयां फळभोग जोडे : श्रीदत्तदर्शन
कल्पतरूसीं स्पर्धा करीतु : तैसे दीसती गगनचुंबीतु :
ते द्विजकुळीं सेवीजत : साय म्हणौनि
मयुराचिया केका : षट्पदांचे झंकार आयिका :
पंचमाळाप शुकसारिका : कोकिळाचे
जेथ सरोवरीं बहुवस : चक्रवाक राजहंस :
तयांचे कळरव सुरस : कायि सांगो
ऐसें पंचमाळापीं नीरंतर : गाजताय अंबर
ते जै स्तुति करिते द्विजवर : श्रीदत्तात्रेयाची
ऋषींचिया प्राणकुटिका : वेदशास्त्राचे निर्धोक :
निरूपताति एकमेकां : उपनीषदर्थ
तीय सैह्याचळीं आयिक : असे सकळनिधीचा नायक :
तयाचा आश्रो धरूनि साधक : साधनीं रिगाले
तेथिचीया परमाणुची थोरी : ब्रह्मादिकां न बोलवे परी :
कृपाकटाक्ष झटके जयावरि : श्रीदत्तात्रयाचा[१८]

अशी आहे महानुभावांची दत्तभक्ति. महानुभाव संप्रदायाच्या प्रसाराबरोबर दत्तप्रभूचा जयजयकार पंजाब-पेशावरपर्यंत संप्रदायाच्या मठांतून घुमत राहिला. नाथ संप्रदायानंतर अखिल भारतांत दत्तोपासना

---

१८. सैह्याद्रवर्णन, १५२–१६३.

आपल्या परीनें वाढविण्याचा प्रयत्न करणारा संप्रदाय केवळ हाच आहे. प्राचीन काळांत नाथ संप्रदाय आणि महानुभाव संप्रदाय या दोन संप्रदायां-शिवाय इतर कोणताहि मराठी भक्तिसंप्रदाय महाराष्ट्र-कर्नाटकाच्या सीमांपलीकडे दत्तोपासनेचा डंका झडवूं शकला नाहीं.

## दत्तात्रेय आणि वारकरी संप्रदाय :

वारकरी संप्रदाय हा मराठी भक्तिपरंपरेंतील एक उदार आणि उदात्त प्रवाह असल्यामुळें समन्वयाचें प्रतीक असलेला दत्तात्रेय वारकऱ्यांनाहि पूज्य ठरल्यास आश्चर्य नाहीं. नाथपंथाचा महनीय वारसा घेऊन वारकरी संप्रदायाचें संजीवन करणारे श्रीज्ञानदेव यांच्या साहित्यांत दत्तविषयक उल्लेख अभावानेंच आढळतात. ज्ञानेश्वरी व अमृतानुभव यांत दत्तविषयक उल्लेख नाहीं, परंतु ज्ञानदेवांच्या अभंगगाथ्यांत जो एक दत्तविषयक अभंग आहे, त्यांत ज्ञानदेवांनीं दत्तगुरुविषयींचा असीम श्रद्धाभाव उत्कटपणें व्यक्त केला आहे :

**पैल मेरूच्या शिखरीं । एक योगी निराकारी ।**
**मुद्रा लावूनि खेचरी । ब्रह्मपदीं बैसला ॥ १ ॥**
**तेणें सांडियेली माया । त्यजियेली कंथाकाया ।**
**मन गेलें विलया । ब्रह्मानंदा माझारीं ॥ २ ॥**
**अनुहतध्वनि नाद । तो पावला परमपद ।**
**उन्मनी तुर्या विनोदें । छंदें छंदें डोलतुसे ॥ ३ ॥**
**ज्ञान गोदावरीच्या तीरीं । स्नान केलें पांचाळेश्वरीं ।**
**ज्ञानदेवाच्या अंतरीं । दत्तात्रेय योगिया ॥ ४ ॥**[१९]

या ज्ञानदेवांच्या अभंगांत व्यक्त झालेलें दत्तस्वरूप पौराणिक दत्तदेवते-सारखें जाणवत नसून नाथ संप्रदायांत आदरणीय ठरलेलें, एखाद्या महा-सिद्धासारखें वाटतें. येथें योगसाधनेच्या मार्गानें सिद्धावस्था प्राप्त करून घेतलेला एक महायोगी असा ‘ दत्तात्रेय योगिया ’ अभिप्रेत आहे. ज्ञानदेवांच्या समग्र साहित्यांतील हा दत्तगौरवाचा एकच अभंग ज्ञानदेवांचा दत्तात्रेया-विषयींचा श्रद्धाभाव समर्थपणें व्यक्त करणारा असून, त्या अभंगांत दत्तात्रेयाचें मूलस्वरूपहि सूचित झालें आहे, असें मला वाटतें. या अभंगांतील ‘ पैल

१९. श्रीज्ञानेश्वरमहाराजांची गाथा, अ. ४०३, पृ. १२१.

मेरूच्या शिखरीं ' हा स्थलनिर्देश माहूरक्षेत्रासंबंधींचा आहे. मेरुवाळा नामक तलावाजवळ डोंगरावर जें दत्तस्थान आहे, त्याला ' शिखर ' असें नांव आहे. या अभंगाच्या अखेरच्या कडव्यांत गोदावरी-तीरावरचें ' आत्मतीर्थ ' आणि पांचाळेश्वर या दोन दत्तस्थानांचा उल्लेख आहे. ' ज्ञानदेवाच्या अंतरीं । दत्तात्रेय योगिया ॥ ' एवढ्या मोजक्याच शब्दांत ज्ञानदेवांनीं आपली भाव-सघनता व्यक्त केली आहे.

ज्ञानदेवांच्या कालखंडानंतर वारकरी संप्रदायाचें भरण-पोषण ज्या महामानवानें केलें, ते श्रीएकनाथ एक श्रेष्ठ दत्तोपासक होते. नाथांना मिळालेला गुरुबोध दत्तोपासनेच्या परंपरेंतील असल्यामुळें गुरुपरंपरेच्या दृष्टीनें त्यांचा समावेश दत्तसंप्रदायांतील साधुसंतांतच करावा लागेल. नाथांच्या दत्तोपासनेचा आणि दत्तविषयक रचनेचा परामर्श आपण पुढें ' दत्तसंप्रदायांतील साधुसंत ' या प्रकरणांत घेणार आहोंत. ' दत्तप्रबोध ' हा दत्तसंप्रदायांतील सन्मान्य ग्रंथ लिहिणारे कावडीबोवा हे नाथांच्या परंपरेंतील सुविख्यात वारकरी संत श्रीनिंबराज दैठणकर यांच्या शिष्यशाखेंतील होत.

' तीन शिरें सहा हात ' अशा त्रिमूर्तीला दंडवत घालणारे तुकोबा दत्तात्रेयाविषयीं भक्तिभाव व्यक्त करतांना म्हणतात :

**नमन माझें गुरुराया । महाराजा दत्तात्रेया ॥ १ ॥**
**तुझी अवधूत मूर्ति । माझ्या जीवाची विश्रांति ॥ २ ॥**
**जीवींचें सांकडें । कोण उगवील कोडें ॥ ३ ॥**
**अनसूयासुता । तुका म्हणे पाव आतां ॥ ४ ॥**

जीवींचें सांकडें फेडणाऱ्या आणि भवभ्रमाचें कोडें उलगडणाऱ्या अवधूत दत्तात्रेयाची मूर्ति तुकारामांच्या हृदयाची विश्रांति बनलेली आहे.

स्वतःला ज्ञानेश्वरकन्या मानणारे विदर्भांतील प्रज्ञाचक्षु संत श्रीगुलाबराव-महाराज यांच्या ' प्रियलीलामहोत्सव ' नामक ग्रंथांत दत्तमहिमान यथार्थपणें गायिलें आहे :

**सद्भावा सुंदरु सर्व विश्वा गुरु । अत्रीचा कुमरु दत्तात्रेय ॥**
**अनसूयातपें जाहला जो प्राप्त । जीवा उद्धरीत एकसरा ॥**

न होय जयाचें मोघ दरुशन । कृपावंत पूर्ण दीनानाथु ॥
नाना अवतार होऊनियां गेले । दत्तत्व संचलें जैसें तैसें ॥
अनंत कालाचा अनंत भावाचा । अनंत जीवांचा कनवाळू ॥
अलर्क राजाला दिलें आत्मज्ञान । प्रल्हादही जाण शिष्य ज्याचा ॥
यदु, हयहय, मत्स्येंद्र, गोरक्ष । संप्रदाय साक्ष जेथूनियां ॥
महाराज तोचि सहावा अवतार । कार्तवीर्या वर ज्याचा हाता ॥

**दत्तात्रेय आणि समर्थ संप्रदाय :**

एकनाथांप्रमाणेंच समर्थांनाहि दत्तात्रेयानें मलंगवेशानें दर्शन दिल्याची एक अद्भुत कथा समर्थांच्या सांप्रदायिक चरित्रांतून आढळते. दासबोध-रचनेसाठीं वापरलेल्या संदर्भग्रंथांची जी यादी दासबोधाच्या पहिल्या दशकांतील पहिल्याच समासांत समर्थांनीं दिली आहे, तींत दत्तप्रणीत अवधूत-गीतेचा आणि गुरुगीतेचा समावेश आहे.[२०] ज्ञानदेवांप्रमाणेंच समर्थ दत्तात्रेयाला उपास्य देवता न मानतां गुरुस्वरूप सिद्धपुरुष मानतात आणि त्याचा गोरक्षाबरोबर उल्लेख करतात :

दत्त गोरक्ष आदि करूनी । सिद्ध भिक्षा मागती जनीं ।
निःस्पृहता भिक्षेपासुनी । प्रगट होये ॥[२१]

'अवधूतगीता' हा ग्रंथ दत्तात्रेयानें गोरक्षनाथास निरूपिला आहे, अशी समर्थांची साक्ष आहे.

अवधूतगीता केली । गोरक्षीस निरोपिली ॥
ते अवधूतगीता बोलिली । ज्ञानमार्गं ॥[२२]

समर्थांचे एक स्वानुभवी शिष्य दिनकरस्वामी तिसगांवकर यांनीं आपल्या 'स्वानुभवदिनकर' या ग्रंथांत संमतिग्रंथ म्हणून अवधूतगीतेचा आदर केला आहे.[२३] दिनकरस्वामीहि समर्थांप्रमाणेंच दत्तात्रेयाचा समावेश सिद्ध-मालिकेंत करतात :

---

२०. दासबोध, १.१.१८.
२१. दासबोध, १४.२.५.
२२. दासबोध, ७.७.३४.
२३. स्वानुभवदिनकर, १.१.८८–८९.

दत्त दुर्वासादि वशिष्ठ हनुमंत ।
कपिल मत्स्येंद्रादि गोरक्ष अवधूत ।
नवनाथ चौऱ्यासी सिद्ध युक्त । योगासिद्धि थोरावले ॥
दत्त गोरक्ष हनुमंत । आदिनाथ मीन गैनि अवधूत ।
चौऱ्यासी सिद्ध आणि योगी समस्त । नवही नाथ ॥
संत महंत मुनेश्वर । सिद्ध साधु योगेश्वर ।
दत्त गोरक्ष दिगंबर । जये स्वरूपीं निमग्न ॥[२४]

## दत्तात्रेय आणि आनंद संप्रदाय :

महाराष्ट्राचे लोकप्रिय आख्यानकवि श्रीधरस्वामी नाझरेकर आणि हरिवरदा-कार श्रीकृष्णदयार्णव हे दोन वेगवेगळ्या परंपरांतील सत्पुरुष आनंद संप्रदायी होते. या दोघांच्याहि गुरुपरंपरा दत्तात्रेयादि आहेत. श्रीधरांची गुरुपरंपरा दत्तात्रेय–सदानंद–रामानंद–अमलानंद–गंभीरानंद–ब्रह्मानंद – सहजानंद – पूर्णानंद – दत्तानंद – ब्रह्मानंद – श्रीधर अशी आहे. पूर्णानंदांचे नातशिष्य रंगनाथस्वामी हे श्रीधरांचे चुलत चुलते होत. श्रीधरांचे गुरु श्रीब्रह्मानंद यांनीं ‘ आत्मप्रकाश ’ नामक ग्रंथ लिहिलेला आहे. श्रीधरांच्या प्रचंड ग्रंथसंभारांत दत्तभक्तीचा धागा अनुस्यूत आहे. आपल्या या परम-गुरूच्या माहात्म्यवर्णनासाठीं ‘ श्रीदत्तात्रयमाहात्म्य ’ या नांवानें एक स्वतंत्र प्रकरण ( ओव्या २६ ) श्रीधरांनीं लिहिलें आहे आणि अन्य ग्रंथांत प्रसंग-विशेषीं त्यांचें मन दत्तचरणांचा वेध घेत राहिलें आहे.

श्रीधरांनीं एकनाथांप्रमाणेंच दत्तात्रेयभक्तीमुळें आपल्या रामविजयांत एक नवा प्रसंग कल्पिला आहे : वनवासाच्या प्रारंभकाळीं अनेक ऋषींच्या आश्रमांना भेटी देत देत जेव्हां राम अत्रीच्या आश्रमांत येतो, तेव्हां त्याला दत्तात्रेयाचें दर्शन होतें. हा राम-दत्त-भेटीचा प्रसंग श्रीधरानें दत्तमाहात्म्यानें रंगवून टाकला आहे :

मग अत्रीचिया आश्रमाप्रति । येता झाला जनकजापति ।
तों देखिली दत्तात्रेयमूर्ति । अविनाशस्थिति जयाची ॥

२४. स्वानुभवदिनकर, १.१.१.७५; ९.२.३२; १२.५.६.

सह्याद्रीवरी श्रीराम । अज अजित मेघश्याम ।
श्रीदत्तात्रेय पूर्णब्रह्म । देत क्षेम तयातें ॥
क्षीरसागरींच्या लहरिया । कीं जान्हवी आणि मित्रतनया ।
परस्परें समरसोनिया । एक ठायीं मिळताती ॥
कीं नाना वर्ण गाई । परि दुग्धास दुजा वर्ण नाहीं ।
तैसा जनकाचा जांवई । आणि अत्रितनय मिसळले ॥
अवतारही उदंड होती । सर्वेचि मागुती विलया जाती ।
तैसी नव्हे दत्तात्रेयमूर्ति । नाश कल्पांतीं असेना ।
पूर्ण ब्रह्म मुसावलें । तें हें दत्तात्रेयरूप ओतिलें ।
ज्याचे विलोकनमात्रें तरले । जीव अपार त्रिभुवनीं ॥
सकळ सिद्ध ऋषी निर्जर । विधि वाचस्पति शचीवर ।
दत्तात्रेयदर्शना साचार । त्रिकाळ येती निजभावें ॥
अद्यापि सह्याद्रिपर्वतीं । देवांचे भार उतरती ।
सर्व ब्रह्मांडींचीं दैवतें धांवतीं । अवधूतमूर्ति पहावया ॥
घेतां दत्तात्रेयदर्शन । देवांसी सामर्थ्य चढे पूर्ण ।
मग ते इतरांसी होती प्रसन्न । वरदान द्यावयातें ॥
ज्यासी प्रयागीं प्रातःस्नान । पांचाळेश्वरीं अनुष्ठान ।
करवीरपुरांत येऊन । भिक्षाटण माध्यान्हीं ॥
अस्तां जातां वासरमणि । सह्याद्रीस जाती परतोनी ।
तों देवांचे भार कर जोडोनी । वाट पहाती अगोदर ॥
दृष्टीं देखतां दिगंबर । एकचि होय जयजयकार ।
असंख्य वाद्यांचे गजर । अद्यापि भक्त ऐकती ।
दत्तात्रेयभक्त देखतां दृष्टीं । सकळ दैवतें जीं जीं सृष्टीं ।
त्याचे पायीं घालिती मिठी । पुढें ठाकती कर जोडूनि ॥
करितां दत्तात्रेयस्मरण । भूत प्रेतें पळतीं उठोन ।
मग उपासकांशीं विघ्न । कवण करूं शकेल ॥
असो ऐसा स्वामी अवधूत । जो अत्रीचा महापुण्यपर्वत ।
तयास वंदोनि रघुनाथ । अत्रिदर्शन घेतसे ॥ [२५]

---

२५. रामविजय, १३. १७–३१.

. वरील उताऱ्यांत श्रीधरानीं दत्तात्रेयाचें अमोघ दर्शन, त्याचा निवास व विहार, त्याची परमपूजनीयता, त्याच्या अवताराची चिरंतनता आणि त्याच्या भक्तांचें सामर्थ्य इत्यादि गोष्टी स्पष्टपणें सांगितल्या आहेत. श्रीधरांच्या स्फुट कवितेंतहि त्यांची दत्तभक्ति प्रकटली आहे. श्रीधरस्वामी दत्तचरणांजवळ एकच मागणें मागतात :

दत्तात्रया श्रीगुरुदेवा । श्रीब्रह्ममूर्ति तव पादसेवा ।
अभंग हें तूं मजलागि देईं । ठेवीं तुझ्या श्रीधर नित्य पायीं ॥

श्रीकृष्णदयार्णव यांनी लिहिलेल्या 'हरिवरदा' या प्रचंड (४२००० ओव्या) दशम-टीकेंत गुरुपरंपरेच्या वंदनाच्या निमित्तानें दत्तगौरव सर्व अध्यायांच्या उपसंहारांत आलेला आहे. दयार्णवांचे प्रधान शिष्य उत्तम-श्लोक यांनीं 'दत्तजननोत्साहवर्णन' या नांवाचें एक लहानसें प्रकरण (ओव्या १२६) लिहिलें आहे.

## दत्तात्रेय आणि चैतन्य संप्रदाय :

वारकरी परंपरेच्या महामंदिरावर सुवर्णकळस चढविणारे तुकोबा हे गुरुपरंपरेच्या दृष्टीनें चैतन्य संप्रदायांत मोडतात. दत्तात्रेय आणि वारकरी संप्रदाय यांच्या संबंधाविषयीं लिहितांना त्यांचा उल्लेख आला आहेच. राघव चैतन्य–केशव चैतन्य–बाबाजी चैतन्य–तुकाराम अशी त्यांची मानवी गुरु-परंपरा आहे. या परंपरेंतील राघव चैतन्यांनीं दत्ताची उपासना केली होती. दत्तात्रेयानें त्यांना व्यासांची कास धरावयास सांगितलें. दत्तात्रेयानें प्रवर्तिलेल्या चैतन्य संप्रदायाच्या एका निराळ्या शाखेंत भैरव अवधूत ज्ञान-सागर (समाधि : श. १७६५) या नांवाचा एक थोर दत्तोपासक होऊन गेला. भैरव अवधूतांची परंपरा शिव–दत्तात्रेय–शिव चैतन्य–गोपाळ चैतन्य-आत्माराम चैतन्य–कृष्ण चैतन्य–अद्वय चैतन्य–चिद्घन चैतन्य–नागेश चैतन्य–शिव चैतन्य–भैरव अवधूत ज्ञानसागर अशी आहे. आपल्या 'ज्ञानसागर' या ग्रंथांत भैरव अवधूतांनीं स्वतःच्या वंशाची आणि गुरुपरंपरेची माहिती दिलेली आहे.

भैरव अवधूत हे विटें (ता. खानापूर, जि. सातारा) या गांवचे आश्वलायनशाखीय विश्वामित्रगोत्री ब्राह्मण. चिद्घनस्वामींच्या बहिणीच्या

वंशांत त्यांचा जन्म झाला होता. अप्पाजीबुवा हें त्यांचें लौकिक नांव होतें. त्यांच्या घराण्यांत त्यांच्या आजोबापासून सत्पुरुषांची परंपरा चालू होती. ते आपले चुलते शिवाजीपंत यांना दत्तक गेले होते. शिवाजीपंत ( शिव-चैतन्य ) हेच त्यांचे दीक्षागुरुहि होते. पैठण येथें राहणारे लक्ष्मीनाथ या नांवाचे नाथपंथी साधु भैरव अवधूतांचे मित्र होते. त्यांच्या प्रेरणेनें भैरवांनीं पैठणास दत्तोपासना आचरली. या उपासनेचें आत्मिक फळ प्राप्त झाल्यावर पैठणहून दत्तमूर्ति घेऊन ते स्वग्रामीं परत आले. विश्वास मूर्ति आणल्या-नंतर ( श. १७३३ ) त्यांनीं दत्तमंदिर बांधलें आणि श. १७४५ पासून दत्तजयंतीचा महोत्सव सुरू केला. त्यांनीं कांहीं काळ आळंदीस ज्ञानेश्वरांच्या चरणांशीं निवास केला होता. श. १७६२ मध्यें अगदीं उतारवयांत त्यांनीं संन्यास स्वीकारला आणि त्यानंतर तीनच वर्षांनीं ( श. १७६५ मार्गशीर्ष कृ. १३ ) ते समाधिस्थ झाले. विटें येथें अद्याप त्यांचा वंश नांदत आहे. त्यांचे चिरंजीव दिगंबर चैतन्य यांनीं त्यांचें आर्यात्मक चारित्र लिहिलें आहे.

भैरव अवधूतांचा आध्यात्मिक अधिकार मोठा होता. ‘ वेदान्तवक्ते ’ व ‘ परब्रह्मनिष्ठ ’ अशी त्यांची ख्याति होती. त्यांची रचना हजाराच्या आंतच आहे, परंतु तेवढ्या अल्परचनेंतहि त्यांच्या वाणीचें नि प्रज्ञेचें सामर्थ्य प्रत्ययास येतें. त्यांच्या वाणीवर पैठण आणि आळंदी येथील निवासामुळें शिवदीन-केसरी आणि ज्ञानेश्वर यांचा प्रभाव दृग्गोचर होतो. त्यांचा ‘ ज्ञानसागर ’ हा लघुग्रंथ ( ओव्या ३१५ ) आणि सुमारें तीनशें पदें व अभंग आज उपलब्ध आहेत. हिंदींतहि त्यांनीं कांहीं स्फुट रचना केली आहे. त्यांच्या सर्व रचनेंत उत्कट दत्तभक्ति ओसंडत आहे. दत्तात्रेयाचें रूप-वर्णन करतांना भैरव अवधूत अध्यात्माची बैठक ढळूं देत नाहींत :

**दत्त परब्रह्म केवळ । नित्य पवित्र निर्मळ ॥**
**अरूप रूप हें चांगलें । ध्यानीं मानस रंगलें ॥**
**भव्य प्रसन्न वदन । पाहतां निवाले लोचन ॥**
**जटा मुकुट आणि गंगा । भस्म लावियेलें अंगा ॥**
**अनुहात निगम ध्वनी । श्रुति कुंडलें श्रवणीं ॥**
**रुळे वैजयंती कंठीं । केशर कस्तुरी ललाटीं ॥**

कासे पीतांबर पिवळा । उभा षड्भुज सांवळा ॥
चरणीं पादुका शोभती । सुरनर त्रिकाळीं वंदिती ॥
ज्ञानसागर शिवगुरु स्मरणीं । अवधूत प्रकटे अंतःकरणीं ॥

भैरव अवधूतांचें हें दत्तध्यान वैशिष्ट्यपूर्ण आहे : दत्तात्रेयाच्या माथ्यावर जटा आहेत आणि मुकुटहि आहे, अंगाला भस्म फासलें आहे, पायीं खडावा शोभत आहेत आणि गळ्यांत वैजयंती माळा, कपाळीं केशरकस्तुरी व कासेला पीतांबर–हें संमिश्र रूप भक्तांच्या 'वेड्या' आवडींतून निर्माण झालें आहे. भैरव अवधूतांचा हा 'षड्भुज सांवळा' त्यांच्या नित्य चिंतनाचा विषय बनला होता. दत्तात्रेयाचें विश्वाकार रूप चितारतांना भैरव अवधूत म्हणतात :

विश्वपट परिधान । करी अनसूयानंदन ॥
दिगंबराचें अंबर । बरवें शोभे चराचर ॥
नाना रत्नें वसुंधरा । घेउनि आली अलंकारा ॥
लेवविले अंगोअंगीं । रंग रंगले निजरंगीं ॥
ज्ञानसागराची शोभा । शिवगुरु अवधूत उभा ॥

हा विश्वाकार दत्तात्रेय 'निरंजन श्याम' बनून 'होरी' खेळत असल्याचें मनोहर दृश्यहि भैरव अवधूतांच्या भावविश्वांत रंगलेलें होतें :

खेले होरी दत्त निरंजन श्याम ॥
ब्रह्म'परात्पर आपहि आपमों ।
प्रकृति पुरुष अभिराम ॥
अनुहत बाजत नाचत गावत ।
सप्त सूर तिन ग्राम ॥
रोम रोम सब उडत फवारे ।
नयन भरे जलप्रेम ॥
ज्ञानसागर शिवगुरु अवधूत ।
नामहि निजसुखधाम ॥

भैरव अवधूतांना दत्तोपासनेची प्रेरणा एका नाथपंथी साधूकडून मिळाली आहे आणि त्यांच्या गुरुपरंपरेंत दत्तात्रेयाचें गुरुत्व शिवाकडे आहे, हे दोन दुवे विशेष चिंतनीय आहेत.

या संप्रदाय-दीक्षितांशिवाय आणखी किती तरी संतांनीं आणि कवींनीं उत्कट भक्तिभावानें दत्त-गौरव गायिला आहे. महाराष्ट्रांतील अनेक खासगी आणि सार्वजनिक हस्तलिखितांच्या संग्रहांत किती तरी अज्ञात कवींची दत्तविषयक स्फुट रचना संकलित आहे. धुळ्याच्या समर्थ वाग्देवता-मंदिरांत विठ्ठलकृत 'दत्तात्रयजन्म' (बाड क्र. १५४२) : श्लोक ५६ ; राघवकृत 'दत्तात्रयजन्मकथा' (बाड क्र. ५६०) : श्लोक १८; दत्तो-पासनामंत्र (बाड क्र. १४८८); 'दत्तजन्मकाळ' (बाड क्र. १६०) अशीं लहान लहान प्रकरणें संग्रहित झालेलीं आहेत.

## महाराष्ट्राबाहेरील दत्तोपासना :

दत्तावताराची लीलाभूमि प्राधान्यानें महाराष्ट्र हीच असल्यानें दत्तो-पासनेचें प्राबल्य महाराष्ट्रांतच नांदणें स्वाभाविक आहे. आज 'तीन शिरें सहा हात' या स्वरूपाची दत्त देवता अखिल भारतांत प्रसृत झाली असली, तरी दत्तभक्तीचा संप्रदाय इतिहासकाळांत वा आजहि महाराष्ट्र-कर्नाटकाबाहेर नांदलेला नाहीं. श्रीनरसिंह सरस्वतींच्या गाणगापूर-निवासामुळें दत्तोपासनेचा प्रसार महाराष्ट्राप्रमाणें कर्नाटकांतहि विपुल झाला. गुरुचरित्राचा कर्ता सरस्वती गंगाधर हा कानडी होता. आजहि कानडी दत्तभक्तांची संख्या मोठी आहे. नाथ संप्रदायांत दत्तदेवतेला महत्त्व मिळालें होतें आणि नाथ संप्रदाय अखिल भारतांत प्रसार पावला होता; त्यामुळें त्या संप्रदायाच्या केंद्रस्थानीं कदाचित् कांहीं दत्तमूर्तींची वा पादुकांची प्रतिष्ठापना झालीहि असेल. परंतु नाथ संप्रदायांत देवतांच्या उपासनेच्या विधिविधानाला गौणस्थान असल्यामुळें तशी शक्यता कमी आहे. नेपाळांतील एकमुखी दत्तात्रेयाचें स्थान आणि दक्षिणेंतील बाबा बुडन हें दत्तस्थान याच संप्रदायाच्या वातावरणांतील असावें, असें वाटतें. नाथ संप्रदायाप्रमाणेंच महानुभाव संप्रदायहि उत्तरेंत पेशावरच्या पलीकडे प्रसार पावला होता. या संप्रदायाचें आदिकारण दत्तात्रेय असल्यानें महानुभाव

मठांच्या वातावरणांत दत्तोपासना महाराष्ट्राबाहेर नांदत असावी. अर्थात् या महानुभावीय दत्तोपासनेचें मूलकेंद्र महाराष्ट्र हेंच आहे. गिरनार हें सुविख्यात दत्तस्थान तर नाथ संप्रदायाचेंच एक महत्त्वपूर्ण केंद्र आहे. भडोचच्या प्रधानाच्या घरीं जन्मलेल्या चक्रधरांच्या जन्माला ज्या एका अवधूत जोग्याचा आशीर्वाद कारणीभूत झाला, तो जोगी या गिरनारच्या दत्तोपासकांपैकींच असावा, अशी माझी कल्पना आहे.

डॉ. रामकुमार वर्मा यांनीं ‘ हिन्दी साहित्यका आलोचनात्मक इतिहास ’ या ग्रंथांत ( पृ. ६०५ ) कृष्णकाव्याच्या विवेचनाचा उपसंहार करतांना दत्तात्रेय संप्रदायाविषयीं असें म्हटलें आहे कीं, “ या संप्रदायाची उन्नति विक्रम संवताच्या चौदाव्या शतकांत पुष्कळ झाली आणि त्याचें मुख्य केंद्र महाराष्ट्र हेंच राहिलें.” याचा अर्थ असा कीं, महाराष्ट्राबाहेर दत्तोपासनेचा खास संप्रदाय नांदला नाहीं.

दत्त संप्रदायाच्या पुनरुत्थानाच्या काळांतील पहिले दत्तावतार श्रीपाद श्रीवल्लभ हे महाराष्ट्रीय नव्हत. ते गोदावरीच्या मुखाजवळील पीठापूरचे ( जिल्हा गोदावरी, मद्रास प्रांत ). त्यांच्यापूर्वीं त्या प्रदेशांत दत्तोपासनेचा प्रसार असवा, असें वाटण्यास आधार आहे. अतिथिरूपानें घरीं आलेल्या दत्तात्रेयानेंच त्यांच्या आईला आशीर्वाद दिल्याची कथा गुरुचरित्रांत आहे. हा दारीं आलेला जोगी दत्तोपासनेच्या परंपरेंतील असावा, असें वाटतें. श्रीपाद श्रीवल्लभांनंतर दुसरे दत्तावतार श्रीनरसिंह सरस्वती यांच्या शिष्यांपैकीं पहिला शिष्य प्रयागचा माधव सरस्वती. त्यांच्या शिष्यांत महाराष्ट्राबाहेरील अनेक शिष्य होते. या शिष्यसमूहाला त्यांनीं तीर्थयात्रेचा आदेश देऊन आपल्यापासून दूर धाडलें होतें. या तीर्थभ्रमण करणाऱ्या शिष्यमंडळानें दत्तभक्तीचा प्रसार केला असणारच. अर्थात् त्या प्रसाराचा परिणाम आज इतिहासाला ज्ञात नाहीं. परंतु स्वतः नरसिंह सरस्वतींनीं दत्तोपासना उपदेशिल्याचा एकहि उल्लेख गुरुचरित्रांत नसल्यामुळें वरील अनुमानाला पुष्टि मिळणें कठीणच आहे.

गिरनार येथें दत्तोपासनेची प्रेरणा घेतलेला एक सत्पुरुष अठराव्या शतकाच्या प्रारंभीं उत्तर-भारतांत होऊन गेला. त्याचा दत्तात्रेयप्रधान संप्रदाय आजहि तिकडे अस्तित्वांत आहे. या सत्पुरुषाचें नांव बाबा किनाराम अघोरी.

सध्यांच्या बनारस जिल्ह्यांत चंदौली तहशिलीमध्यें बाणगंगेच्या किनाऱ्यावर जें रामगड नांवाचें गांव आहे, तेंच किनारामचें जन्मस्थान. तेथें रघुवंशी क्षत्रिय कुलांत त्याचा जन्म झाला. लहानपणापासून किनाराम श्रद्धाळू आणि चिन्तनशील होता. बाराव्या वर्षीं त्याचें लग्न झालें, परंतु लग्नानंतर तीन वर्षांनीं पत्नी निवर्तली. या घटनेनें त्याच्या सहजात वैराग्याचें पोषणच झालें. एक दिवस कुणालाहि न कळवितां त्यानें घर सोडलें आणि कारो नांवाच्या गांवीं ( बलिया जिल्हा ) राहत असलेल्या बाबा शिवराम नामक वैष्णव महात्म्याचा आश्रय घेतला. परंतु बाबा शिवरामांनीं पुनर्विवाह केल्याचें पाहून किनारामला त्यांच्या सान्निध्याचा उबग झाला. अखेर त्यांचा सहवास सोडून तो पुनः घरीं आला. घरच्या लोकांना त्याची विरक्ति साहवेना. त्यांनीं त्याच्यामागें पुनर्विवाहाचा सतत लकडा लावला. या त्रासांतून सुटण्यासाटीं किनाराम पुनः बाहेर पडला. चारी धामांची यात्रा करून आणि आणखीहि अनेक प्रधान तीर्थें पाहून तो परत आपल्या गांवी आला. या वेळी घरीं न जातां, घरापासून दूर एक झोपडी बांधून तो राहूं लागला. लोकसेवा आणि प्रभुसंकीर्तन करीत त्याची कालक्रमणा सुरू झाली. लोकांच्या उपयोगासाठीं ' रामसागर ' नांवाचा तलाव त्यानें खोदला. या समाजसेवेच्या वृत्तीमुळें त्याच्या कुटीत भाविकांची दाटी होऊं लागली. म्हणून पुनः त्यानें तिसऱ्या यात्रेचें प्रस्थान ठेवलें. गांवांतील एक तरुण मुलगा बरोबर घेऊन तो जुनागड येथें आला. जुनागडच्या नबाबानें या गुरु-शिष्यांना कांही कारणानें कैद केलें. या कारावासांत किनारामानें अनेक चमत्कार दाखविल्यामुळें त्याची मुक्तता झाली, असें सांगतात.

सुटकेनंतर पुनः त्याची भ्रमन्ती सुरू झाली. सत्संगाचा आनंद लुटीत तीर्थभ्रमण चालू असतांना गिरनार येथें त्याला दत्तात्रेयाचा साक्षात्कार झाला आणि त्यामुळें त्याचें आंतरजीवन आनंदानें भारून गेलें. नंतर पुरी, द्वारका, गोमती व गंगासागर येथेंहि त्याला दत्तदर्शनें झालीं :

**" पुरी, द्वारिका, गोमती, गंगासागर तीर ।**
**दत्तात्रेय मो कहँ मिले, हरन महाभवपीर ॥**
**अतिदयाल, मम सीसपर कर परस्यो मुनिराय ।**
**ज्ञान, विज्ञान, भक्ति दृढ दीन्हो हृदय लखाय ॥**

[ मला पुरी, द्वारका, गोमती व गंगासागरतीर या ठिकाणीं दत्तात्रेय भेटले. त्यांनीं दयाळूपणें माझ्या शिराला स्पर्श केला आणि माझ्या हृदयांत त्या मुनिरायानें ज्ञान-विज्ञान आणि दृढभक्ति जागृत केली. ] असें स्वत: किनारामानें आपल्या ' विवेकसार ' ( पृ. २ ) नामक ग्रंथांत वर्णिलें आहे. किनारामानें दत्तात्रेयाला आपला परमगुरु व पथप्रदर्शक मानलें आहे आणि आपल्या मतप्रणालीला ' अवधूत मत ' असें दत्तसूचक नांव दिलें आहे. या दत्तसाक्षात्कारानंतर सं. १७५४ च्या सुमारास काशी येथें कालूराम अघोरी नामक अघोरी पंथी सिद्धाची दीक्षा त्यानें स्वीकारली. हा कालूराम अघोरीहि दत्तसाक्षात्कारी असून, त्यालाहि गिरनारवरच दत्तादर्शन झालें होतें.

या कालूराम अघोरीविषयीं अधिक माहिती मिळत नाहीं. ज्या अघोरी पंथाचा तो अनुयायी होता, तो अघोरी पंथ मात्र एक भीषण आणि घृणास्पद आचारांचा पंथ आहे. शवमांसाचें भक्षण करणें, नरकपालांतून सुरापान करणें, नरबलि देणें असे भयंकर आचार अघोरी पंथांत रूढ आहेत. या पंथांत दत्तात्रेयाला स्थान आहे. हा पंथ पुढें नाथ संप्रदायाच्या उपपंथांत समाविष्ट झाला. किनाराम किंवा त्याचा गुरु कालूराम यांच्या जीवनांत मात्र या अघोरी परंपरेंतील घोर आचारांना स्थान नव्हतें. कालूरामाची दीक्षा स्वीकारल्यावर किनाराम काशींतच कृमिकुंडावर राहूं लागला. गुरूच्या देहान्तानंतर अघोरी पंथाच्या प्रचारासाठीं त्यानें खूप कष्ट घेतले. कृमिकुंडावरील मठाचें उत्तराधिकारित्वहि त्याच्याकडेच आलें. त्यानें आपल्या पूर्वगुरूच्या संस्कारांमुळें वैष्णव परंपरेचेंहि भान ठेवलें होतें. आपल्या मताच्या स्पष्टीकरणासाठीं त्यानें 'विवेकसार' नामक ग्रंथ रचला (सं. १८१२). त्याशिवाय 'गीतावली', 'रामरमाल', ' राममंगल ' इत्यादि वैष्णवमतप्रधान रचनाहि त्यानें केली आहे. मारुफपूर, नयीडीह, परानापूर व महुवर येथें त्यानें वैष्णवमताचे मठ स्थापन केले आणि देवल, हरिहरपूर, कृमिकुंड येथें अघोरी मताचे मठ स्थापन केले. या मठांच्या परंपरा आजहि रूढ आहेत. कृमिकुंड (काशी) येथील ' रामशाला मठ ' हाच त्याचा प्रधान मठ होय. तेथेंच कालूराम आणि किनाराम या गुरुशिष्यांच्या समाध्या आहेत. किनारामच्या प्रभावानें भारावलेला काशी प्रांताचा राजा बलवंतसिंह यानें त्याच्या मठाला

कांहीं देणग्याहि दिल्या होत्या. त्याच्या अनुयायीवर्गांत प्रायः सर्व जातींचा समावेश असून त्यांत मुसलमानहि अनेक आहेत.

'विवेकसार' हा ग्रंथ सं. १८१२ मध्यें शिप्रा नदीच्या तीरावर उज्जयिनी येथें रचला गेला. हा ग्रंथ किनारामानें गुरुकृपेच्या बळानें आत्मानुभवाच्या प्रकाशांत लिहिला आहे. ग्रंथारंभीं कवीनें आत्मारामाला वंदना केली आहे. "संसार असार आहे. तो केवळ पंचमहाभूतांचा पसारा आहे. जीव त्रितापानें पोळलेले आहेत. तेव्हां शांति प्राप्त करण्यासाठीं आत्मप्रकाश प्रकट केला पाहिजे." अशी या ग्रंथाची बैठक आहे. या ग्रंथांतील विचार आणि परिभाषा उत्तर भारतांतील निर्गुण परंपरेशीं मिळती-जुळती आहे. "सारें विश्व आत्ममय आहे अशी प्रतीति आली पाहिजे आणि आत्मोपम्यावस्थेच्या प्राप्तीसाठीं जीवनाचें मंदिर दया, विवेक, विचार व सत्संग या चतुःस्तंभांवर उभें केलें पाहिजे" असा या दत्तोपासकाचा संदेश आहे. सं. १८२६ मध्यें काशी येथें कृमिकुंडावरील 'रामशाला' मठांत हा दत्तसाक्षात्कारी पुरुष समाधिस्थ झाला.[२६] उत्तर भारतांतील दत्तोपासनेचा हा अपवादभूत संप्रदाय आणि त्याचा प्रभावी प्रवर्तक किनाराम यांच्याविषयीं अधिक अभ्यास होण्याची आवश्यकता आहे.

* * *

---

२६. उत्तरी भारतकी सन्तपरंपरा : परशुराम चतुर्वेदी, पृ. ६१८–६२१.

# ३. श्रीनरसिंह सरस्वती : जीवन आणि कार्य

## दत्तोपासनेचे संजीवक :

खिस्त सनाच्या प्रारंभापासून शैव, वैष्णव आणि शाक्त या साधनांच्या प्रवाहांत विहार करणारा दत्तात्रेय पुढें इ. स. १००० नंतर महाराष्ट्रांतील सर्व भक्तिसंप्रदायांतील साधकांच्या श्रद्धेचा विषय बनला आणि दत्तोपासनेनें मराठी लोकधर्मांत मानाचें स्थान मिळविलें. हा दत्तोपासनेच्या उदय-विकासाचा स्थूल इतिहास आपण गेल्या प्रकरणांत पाहिला. आतां दत्तोपासनेचे एक महान् संजीवक आणि दत्तसंप्रदायाचे अप्रत्यक्ष प्रवर्तक श्रीनरसिंह सरस्वती यांच्या जीवनाचा आणि कार्याचा परामर्श आपणांस घ्यावयाचा आहे. तेराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत दत्तोपासनेचा जो पुराण-प्रवाह वाहत आला होता, त्यांत जीवन ओतण्याचें कार्य श्रीनरसिंह सरस्वतींनीं केलें. त्यांचें जीवन-कार्य केवळ दत्तोपासनेच्या क्षेत्रांतच नव्हे, तर समग्र महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनांत दीपस्तंभासारखें मार्गदर्शी ठरलें आहे. त्यांच्या जीवन-काळांत जी संघर्षमय परिस्थिति निर्माण झाली होती त्या परिस्थितीच्या गर्भांतूनच महापुरुषाच्या उदयाचा हुंकार ऐकूं येत होता, त्या काळांत एका आक्रमणशील संस्कृतीनें हिंदु परंपरेचा ग्रास घेण्यासाठीं महाराष्ट्रांत सर्वत्र संचार चालविला होता. त्या संकटांतून महाराष्ट्राला मुक्त करण्याचें महान् कार्य श्रीनरसिंह सरस्वतींनीं केला. त्यांच्या या कार्याचा अन्वयार्थ समजावून घेण्यासाठीं आपणांस काळाचा कानोसा घ्यावयास हवा.

## काळाचा कानोसा :

श्रीनरसिंह सरस्वतींचा अवतार-काल श. १३०० ते १३८० ( इ. स. १३७८–१४५८ ) असा आहे. हा काळ महाराष्ट्राच्या दृष्टीनें संघर्षाचा आणि संकटांचा होता. अल्लाउद्दीनाची दक्षिणेंतील पहिली स्वारी इ. स. १२९४ मध्यें झाली. मुसलमानांचें आक्रमण भारतांत सुरू होऊन या वेळीं तीन शतकें होत आलीं होतीं. परंतु दक्षिण भारत तेराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत या संकटाशीं परिचित नव्हता. पुढें अल्लाउद्दीनातर्फे मलिक

काफूरनें तेलंगण व द्वारसमुद्र येथील राजांना मांडलिक बनवून मदुरेपर्यंत मुलूख जिंकला आणि आपल्या आक्रमणामागचा 'धार्मिक' हेतु सिद्ध करण्यासाठीं कारोमांडलच्या किनाऱ्यावर मशीद उभारली. अल्लाउद्दीनाच्या स्वाऱ्यांनीं देवगिरीच्या यादवांचें राज्य नष्ट झालें आणि महाराष्ट्रांतील स्वराज्याचा प्रकाश लुप्त झाला. देवगिरीच्या यादवांचा अंतिम ग्रास घेण्यासाठीं मलिक काफूर इ. स. १३१२ मध्यें गोदावरीच्या तीरावर सेनेसह संचार करीत असतांना त्यानें राजकीय आक्रमणाबरोबरच धर्मच्छळाचें सत्रहि सुरू केलें होतें.[1] इ. स. १३१२ मध्यें यादवांचें राज्य नष्ट झाल्यानंतर स्वराज्य-संरक्षणासाठीं सांघिक प्रयत्न झाला नाहीं. परंतु मुसलमान आक्रमकांना वैयक्तिक रीत्या प्रतिकार करण्याचा प्रयत्न अनेकांनीं केला. इ. स. १३१२ पासून १३७५ पर्यंतच्या पन्नास-साठ वर्षांत खेळण्याचा राजा, रायरी-सोनखेडचे स्वतंत्र राणे, वरंगळचे होयसळ राजे, द्वारसमुद्रचे बल्लाळ राजे, शिर्के राजे, सुर्वे राजे, खानदेश-अशिरगड-बागलाणचे राजे वगैरे अनेक लहानमोठ्या राज्यकर्त्यांनीं मुसलमानांना रोधण्याचा प्रयत्न केला. अर्थात् या प्रयत्नांत सांघिकता आणि योजकता नसल्यामुळें प्रतिकारकांची लांडगेतोड होण्याशिवाय अन्य कसलाच परिणाम झाला नाहीं. खिलजी घराण्यानंतर दिल्लीचें तक्त तघलक घराण्यानें घेतलें. तघलक घराण्यांतील पहिला पुरुष ग्यासुद्दीन याचा मुलगा महंमद तघलक हा दक्षिणेचा सुभेदार होता. या सुभेदारीच्या काळांत दक्षिण-विजयाचा मोह त्याच्या मनांत घर करून राहिला. इ. स. १३२३ च्या सुमारास त्यानें वरंगळवर स्वारी केली. इ. स. १३२५ मध्यें ग्यासुद्दीन मेल्यावर दिल्लीचें तक्त महंमदास मिळालें. त्यानंतर इ. स. १३३३ मध्यें या वेड्या महंमदानें राजधानीचें स्थलांतर करावयाचें ठरवून सर्व लवाजम्यासह तो दौलताबादला आला. अर्थातच त्याचा हा खुळा प्रयोग फसला. या प्रयोगाच्या अपयशानंतर महंमदानें हसन गंगू बहामनीस दक्षिणचा सुभेदार नेमलें. या हसननें १३४७ मध्यें स्वातंत्र्य पुकारलें आणि राजधानी गुलबर्ग्यास नेली. हसननें स्थापन केलेलें हें बहामनी राज्यच दक्षिणेंत मुसलमानांचें आसन स्थिर करण्यास कारणीभूत झालें.

१. ज्ञानेश्वरकालनिर्णय : श्रीपतीबुवा भिंगारकर, पृ. १०३.

परंतु इस्लामच्या प्रतिष्ठापनेचा हा प्रयत्न सर्वस्वीं निर्बाध नव्हता. दाक्षिणेंतील प्रजेच्या मनांत स्वातंत्र्याचे स्फुलिंग धुमसतच होते आणि त्यांच्या ज्वालामय उद्रेकांनीं इस्लामी राज्यकर्त्यांचीं आसनें होरपळत होतीं. बहामनी राज्याच्या स्थापनेपूर्वी तेरा वर्षे ( इ. स. १३३५ ) विजयनगर येथें एका स्वतंत्र हिंदु राज्याची नव्यानें स्थापना झाली होती. इस्लामच्या विध्वंसकारी आणि धर्म-संहारक वृत्तीचा प्रत्यय आलेल्या दोन कर्तृत्वसंपन्न अशा पुरुषांनीं ( हरिहर व बुक्क ) या राज्याची प्रस्थापना केली होती आणि त्यांच्या या पुरुषार्थामागें शृंगेरी पीठांतील श्रीविद्यारण्यस्वामींची उत्कट प्रेरणा नांदत होती. आक्रमण आणि प्रत्याक्रमण या परस्परविरोधी वृत्तींनीं नांदणाऱ्या राज्यांचा संघर्ष येथून पुढें सतत झडत राहिला, तर त्यांत आश्चर्य नाहीं.

बहामनी घराण्यांतील नववा पुरुष अहंमदशहा १ ला ( १४२२–१४३५) आणि दहावा पुरुष अल्लाउद्दीन २ रा ( १४३५–१४५८ ) या दोन बादशहांच्या राज्यकाळांत श्रीनरसिंह सरस्वती हे महापुरुष होऊन गेले असावे, असा इतिहासज्ञांचा साधार तर्क आहे. अल्लाउद्दीनाच्या पहिल्या स्वारीनंतर शंभर-सवाशें वर्षांच्या कालखंडांत इस्लामच्या प्रवृत्तीचें प्रत्यंतर हिंदु प्रजेला अनेक प्रकारांनीं आलें होतें. निरपराधी हिंदूंची कत्तल, सक्तीचें धर्मान्तर, स्त्रियांवरील अत्याचार, मूर्ति-मंदिरांचा, विध्वंस, इत्यादि आसुरी अत्याचारांनीं हिंदु प्रजा संत्रस्त झाली होती.

या आततायी आक्रमकांच्या राज्यशासनांत एक न्यून होतें : या गिरि-गुहरांच्या नि गिरिशिखरांच्या भूमींत एतद्देशीय कर्तबगार व्यक्तींच्या सहाय्याविना त्यांना आपलें आसन टिकविणें अशक्य होतें आणि धर्मान्तरित प्रजेचे पूर्वसंस्कार समूळ पुसले जाणें अशक्य असल्यामुळें धर्म-समन्वयाचे प्रयत्नहि अधून मधून प्रामाणिकपणें केले जात होते.

## सूफी साधूंचा संचार :

इस्लामच्या शस्त्रधारी आक्रमकांप्रमाणेंच 'हृदयपरिवर्तना'च्या मार्गानें धर्मप्रसार करूं पाहणारे इस्लामचे प्रचारकहि भारतांत शेंकड्यांनीं पसरले होते. या 'सौम्य' मार्गाचा अवलंब करणारे सर्व प्रचारक सूफी संप्रदायाचे अनुयायी होते. या संप्रदायाचा उदय इसवी सनाच्या आठव्या शतकांत

इस्लामच्या जन्मभूमींतच झाला. प्रथम देहदंडनावर भर देणारा हा संप्रदाय पुढें भारतीय धर्मप्रसारकांच्या प्रभावामुळें मानसिक उन्नयनावर भर देऊं लागला. परमेश्वराच्या एकमेवाद्वितीय स्वरूपाबद्दल चिंतन करून, त्याच्या साक्षात्कारासाठीं भक्तिमार्गाचा अवलंब करणें आणि अखेर त्या विराट् तत्त्वांत–परमात्म्यांत आत्मविलोप करणें, हें सूफी साधकांचें जीवनध्येय बनलें. राबिया ( ८ वें शतक ), मन्सूर ( ८५८–९२२ ), गझाली ( ११ वें शतक ), फरिदोद्दीन अत्तार ( जन्म : १११९ ), जलालुद्दीन रूमी ( जन्म : १२०५ ), शेख सादी ( जन्म : ११८४ ), हाफीझ ( १३८९ ) आणि जामी ( जन्म : १४१४ ) हे श्रेष्ठ सूफी सन्त विश्वसाधनेच्या मंदिरांतील तेजस्वी रत्नदीप आहेत. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं, आत्मप्राप्तीसाठीं प्रामाणिक प्रयत्न करणाऱ्या या भक्तिमार्गी सूफी साधकांचा इस्लामनें अत्यन्त छळ केला. 'अनलहक़' ( अहं ब्रह्मास्मि। ) अशा साक्षात्काराचा उद्घोष करणाऱ्या मन्सूरला इस्लामनें फांसावर चढविलें ! सेवा ( मुमुक्षता ), प्रेम ( परमात्म्याविषयींची ओढ ), निवृत्ति, ज्ञान, उन्मनावस्था, परमेश्वर-स्वरूपाचा पूर्ण प्रकाश आणि मीलन या सप्तसोपानानें सिद्धीचें गौरीशंकर गांठण्याचा उपदेश या संप्रदायांत केलेला आहे

इस्लामच्या राजकीय आक्रमकांबरोबर या सूफी संप्रदायांतील कांहीं प्रचारकहि भारतांत येत राहिले. परंतु वर सांगितलेल्या महान् संतांप्रमाणें या प्रचारकांची स्थिति नव्हती. त्यांच्यापैकीं बहुतेकांची मुसलमान राज्य-कर्त्यांशीं हातमिळवणी झालेली होती. अत्याचारी आक्रमकांच्या हातांतील शस्त्रांची धार यांच्या प्रभावानें बोथटण्याऐवजीं राज्यकर्त्यांच्या हेतुसिद्धीसाठीं यांनींच हातीं शस्त्र घेऊन अत्याचार केल्याच्या नोंदी इतिहासाच्या पानोपानीं आहेत. अर्थातच कांहीं प्रामाणिक आणि समन्वयशील साधकांचीहि उपस्थिति इतिहासांत आहे, हें कबूल करावें लागेल. जायसीसारख्या अव्वल दर्जाच्या कांही सूफी कवींनी हिंदीला समृद्ध केलें आहे.

भारतांत आलेल्या सूफींचे चार उपपंथ होते : ( १ ) चिश्ती, ( २ ) कादरी, ( ३ ) सुहरावर्दी आणि ( ४ ) नक्शबंदी. भारतांत या संप्रदायाचा प्रचार करणारे पहिले प्रचारक अनुक्रमें ख्वाजा मोईनोद्दीन चिश्ती ( ११४२–१२३६ ), सैयद महंमद गौस कादरी ( मृत्यु : १५१७ ),

बहाओद्दीन झकारिया ( ११८२-१२६७ ) आणि ख्वाजा बाकी बिल्ला बेरंग ( १६ वें शतक ) हे होत.

उत्तर भारतांत महंमद गझनीच्या काळापासून सूफींची आवक सुरू झाली. अली-उल्-हुजवेरी ( १०००-१०६३ ) हा भारतांतलि पहिला सूफी प्रचारक होय. ख्वाजा मोईनोद्दीन चिश्तीनें हजारों हिंदूंना इस्लामची दीक्षा दिली. त्यानंतर ख्वाजा कुतुबुद्दीन बख्तियार काकी ( ११८६-१२३४ ), फरीदोद्दीन गंज शक्कर ( ११७२-१२६५ ), निजामोद्दीन अवलिया ( १२३६-१३२५ ) इत्यादि बिनीच्या सूफी प्रचारकांनीं उत्तर-भारतांत धुमाकूळ घातला होता. त्यांनी हजारों हिंदूंचें धर्मान्तर घडविलें, शेंकडो शिष्य तयार केले, हिंदु सरदारांच्या मुलींशीं लग्नें केलीं आणि मुसलमान राजकर्त्यांच्या हातांत हात घालून इस्लामचा 'हरा झेंडा' भारतांत फडकविण्याचा प्रयत्न केला. "मंदिरें आणि मठांवर जबरदस्तीनें ताबा घेणें, मूर्तींचा विध्वंस करणें, मंदिरांच्या जागांवर मशिदी उभारणें किंवा मंदिरांचे दगड वा मूर्ति मशिदीच्या बांधकामांत घालणें या सगळ्या प्रकारांत सूफींनीं भाग घेतलेला दिसून येतो. त्यापाठीमागें राज्यसत्तेचें पाठबळ आपल्याला आहे, हा आत्मविश्वास या लोकांना होता."[२]

दक्षिणेंत मुसलमानांच्या राजकीय आक्रमणापूर्वींच सूफींचा संचार सुरू झालेला होता. इ. स. १३०० पर्यंत ( यादवांच्या राज्यकालांत ) दक्षिणेंत आठ-दहा सूफी प्रचारक होऊन गेले. तेराव्या शतकाच्या पूर्वार्धांत जलालुद्दीन गंजरवां आणि मोमिन आरिफ या दोन सूफींनीं यादवांच्या राजधानीच्या परिसरांतच ( देवगिरि-दौलताबाद व खुल्ताबाद ) ठाण मांडलें होतें. खुल्ताबाद येथें असलेल्या जलालुद्दीनच्या भव्य कबरींत प्राचीन शिव-मंदिराचे अवशेष दिसून येतात. याच काळांत सूफी सरमस्त ( मृत्यु : १२८० ) यानें गुलबर्गा जिल्ह्यांत शेंकडों फकीर-शिष्यांसह कार्य आरंभिलें होतें. इ. स. १२९४ मध्यें अल्लाउद्दीन खिलजीनें यादवांचें राज्य खिळखिळें केल्यावर दिल्ली येथें निजामोद्दीन अवलियाच्या नेतृत्वाखालीं दक्षिणेंतील धर्मप्रचाराची योजना तयार झाली आणि त्या योजनेनुसार मुंतजबोद्दीन

२. सूफी संप्रदाय : सेतु माधवराव पगडी, पृ. १०३.

जर्जरीबक्ष हा सातशें सहकाऱ्यांना बरोबर घेऊन इ. स. १३०० मध्यें दक्षिणेंत खुल्ताबाद येथें आला. याच्या धर्मप्रसारकार्याला परतंत्र यादव-राजाकडून द्रव्यसहाय्य मिळण्याची 'व्यवस्था' दिल्लीहून झाली होती, असें श्री. पगडी यांचें अनुमान आहे. मुंतजबोद्दीननें आपल्या शिष्य-सहकाऱ्यांना दक्षिणेंत निरनिराळ्या ठिकाणीं पाठविलें. दक्षिणेंतील मुस्लिम-संपर्काच्या इतिहासांत याची कामगिरी मोठी आहे. सर्व महाराष्ट्रभर याच्या सहकाऱ्यांनीं केलेल्या 'धर्म-विक्रमाच्या खुणा' आजहि शाबूत आहेत. मुंतजबोद्दीनचा एक बडा सहकारी मोईजोद्दीन ऊर्फ मौलानासाहेब यानें पैठणच्या भव्य महालक्ष्मी-मंदिराचा ताबा घेऊन त्या जागीं दर्गा उभारला. आजहि तो मौलाना-साहेबाचा दर्गा पाहतांना त्या पुरातन मंदिराचे पाषाण आढळून येतात. नाथांनीं आणि समर्थांनीं ज्या दावलमलिकाचा उल्लेख केला आहे आणि ज्याची पूजा महाराष्ट्रांत भोळ्या-भाबड्या जनांत प्रचलित झाली होती, त्याचा निवास गुजराथेंत असे. या पंधराव्या शतकांतील सूफी प्रचारकाचे छल्ले महाराष्ट्रांत ठिकठिकाणां आहेत. पैठणपासून चार मैलांवर पिंपळवाडी येथें याचा मोठा दर्गा आहे. नाथांच्या काळीं हजारों हिंदु या दावलमलिकाला नवस करीत आणि त्याचा 'मलिदा' भक्षण करीत. सर्व महाराष्ट्रभर धुमाकूळ घालणाऱ्या या सूफींचीं केंद्रें प्रामुख्यानें मराठवाड्यांत दौलताबाद, औरंगाबाद, खुल्ताबाद, हैदराबाद इत्यादि ठिकाणीं होतीं.

## पूर्वावतार श्रीपाद श्रीवल्लभ :

अशा संघर्षमय आणि संक्रमणशील काळांत श्रीपाद श्रीवल्लभ आणि श्रीनरसिंह सरस्वती या दोन महापुरुषांचा क्रमानें अवतार झाला. यांपैकीं श्रीपाद श्रीवल्लभ हे श्रीनरसिंह सरस्वतींचे पूर्वावतार आणि दत्तात्रेयाचे इतिहासकाळांतील पहिले अवतार समजले जातात. गुरुचरित्राच्या ५ ते १० अशा सहा अध्यायांत यांची अवतार-कथा वर्णिली आहे. परंतु या सहा अध्यायांपैकीं अ. ६–७ मध्यें गोकर्णमहिमा, अ. ८ मध्यें शनिप्रदोषव्रत-माहात्म्य आणि अ. १० मध्यें कुरवपूर-महिमा वर्णिला आहे. म्हणजे अ. ५ व ९ अशा दोनच अध्यायांत त्यांच्या अवताराविषयींचें वृत्त आहे. गुरु-चरित्रकारांना त्यांच्याविषयी विशेष माहिती उपलब्ध झाली नाहीं, असें या

दोन अध्यायांवरून दिसून येतें. अर्थात् त्यांच्या अवतार-चरित्रावर प्रकाश टाकण्यास गुरुचरित्राशिवाय अन्य साधन आज उपलब्ध नसल्यानें गुरु-चरित्रांतील अल्प वृत्तावरच आपणांस समाधान मानून घेणें प्राप्त आहे.

श्रीपाद श्रीवल्लभांचा काळ इ. स. १३२०–१३५० असा असावा. त्यांचें जन्मस्थान पीठापूर. गुरुचरित्रांत या पीठापूरचा उल्लेख 'पीठापूर पूर्वदेशीं' (५·१०) एवढाच केला आहे. पुढें १५ व्या अध्यायांत 'पीठापुरीं दत्तात्रेय देव । वास असे सनातन ॥' (१५·८७) असा या स्थानाविषयींचा उल्लेख आहे. हें पीठापूर मद्रास प्रांतांत गोदावरी जिल्ह्यांतील पीठापूर तहशिलीचें प्रमुख ठिकाण होय. हें राजमहेंद्रीच्या उत्तरेस गोदावरीच्या मुखप्रदेशाजवळ आहे. हें स्थान दक्षिणेच्या प्राचीन इतिहासांत महनीयता पावलें होतें. समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद लेखांत या स्थानाचा उल्लेख आहे. इ. स. ५८४ मध्यें पश्चिम चालुक्य वंशांतील सत्याश्रय नामक राजानें हें ठिकाण जिंकलें होतें. हैहय आणि पूर्व चालुक्य या कुलांतील राजांचाहि पीठापूरशीं संबंध होता. कलिंगराज वासिष्ठीपुत्र शक्तिवर्मन् यानें या ठिकाणीं ब्राह्मणांना अग्रहार दिल्याचा उल्लेख एका शिलालेखांत आहे. येथें 'कुंतीमाधव' नांवाचें प्राचीन मंदिर असून त्याच्यासमोर 'पदगया' नांवाचें तीर्थकुंड आहे. प्रतिवर्षी या ठिकाणीं मोठी यात्रा भरते. या मंदिराच्या आवारांत असलेल्या स्तंभावर अनेक शिलालेख आहेत.[३] सध्यां हें स्थान पीटापुरम् या नांवानें ओळखलें जातें. प्राचीन शिलालेखांतून याचीं नांवें पीठापुरी, पिष्टपुरम् अशीं आढळतात.

अशा प्रकारें राजकीय आणि सांस्कृतिक दृष्ट्या इ. सनाच्या सहाव्या शतकापासून प्रसिद्ध असलेल्या पीठापुरांत श्रीपाद श्रीवल्लभांचा जन्म झाला. त्यांच्या पित्याचें नांव आपळराज आणि मातेचें नांव सुमता. आपळराज हा आपस्तंब-शाखीय ब्राह्मण होता. त्याची पत्नी सुमता ही पतिसेवेंत सदैव रत असलेली आणि अतिथि-अभ्यागतांची भक्तिभावानें पूजा करणारी होती. या ब्राह्मणाच्या घरीं अमावास्येच्या दिवशीं श्राद्धविधि असतांना, ब्राह्मणभोजनापूर्वीं दारीं आलेल्या एका अवधूताला सुमतेनें भिक्षा घातली. प्रसन्न झालेल्या अवधूतानें

३. Inscriptions of the Madras Presidency : Ed. by V. Rangacharya (Govt. Publication).

सुमतला सांगितलें : ' माते, तुझ्या मनांत जी इच्छा असेल ती प्रकट कर. तुझी इच्छा सफल होईल. ' ( हा अवधूत म्हणजे प्रत्यक्ष दत्तात्रेयच होय, असें गुरुचरित्रांत वर्णिलें आहे. ) दत्तात्रेयस्वरूप अवधूताला सुमतेनें साष्टांग प्रणिपात केला आणि त्याची मनोभावें प्रार्थना करून ती म्हणाली :

मज पुत्र झाले बहुत। नव्हती स्थिरजीवित।
जे राहिले असती आतां सजीवित। अक्षहीन पादहीन ॥
योग्य झाला नाहीं कोणी। काय करावे मूर्ख प्राणी।
असोनि नसती येणे गुणीं। पुत्रावीण काय जन्म ॥
व्हावा पुत्र आम्हां ऐसा। ज्ञानवंत परम पुरुषा।
जगद्वंद्य देवसदृशा। तुम्हांसारिखा मज आतां ॥[४]

तिची ही प्रार्थना अवधूतानें मान्य केली. " तापसी, वंशाचा उद्धार करणारा, कलियुगांत ख्यातिवंत होणारा, दैन्यहारक आणि ' ज्ञानमार्गें अतुर्बळी ' असा पुत्र तुला होईल " असा अवधूतानें तिला आशीर्वाद दिला आणि तो अदृश्य झाला. विस्मित आणि आनंदभरित झालेल्या विप्रस्त्रीनें पतीला हा सर्व वृत्तान्त निवेदन केला. त्या आशीर्वादावरील श्रद्धेनें काल-क्रमणा करीत असतांना सुमतेला गर्भ राहिला आणि यथाकाल तिच्या घरीं पुत्रजन्माचा सोहळा साजरा झाला. ब्राह्मणांनीं जातक वर्तविलें कीं, " हा महान् तपस्वी आणि दीक्षाकर्ता जगद्गुरु होईल." दत्तात्रेयाच्या आशीर्वादानें जन्म झाला, म्हणून मुलाचें नांव ' श्रीपाद ' असें ठेवलें. श्रीपाद सात वर्षांचे झाल्यावर पित्यानें त्यांचें मौंजीबंधन केलें. मौंजीबंधनाच्या वेळेपर्यंत त्यांचें वेदाध्ययन पूर्ण झालें होतें. सोळावें वर्ष लागल्यावर मातापिता त्यांच्या विवाहाचा विचार करूं लागलीं. परंतु प्रथमपासूनच मनीं विरक्त असलेले श्रीपाद म्हणाले :

आपण तापसी ब्रह्मचारी। योगश्रियावांचोनि नारी।
न लगती, हा बोल निर्धारीं। श्रियावल्लभ नाम माझें ॥[५]

---

४. गुरुचरित्र, ५. २६-२८.

५. गुरुचरित्र. ५.५५.

या घटनेनंतर श्रीपाद श्रीवल्लभांनीं घर सोडण्याचा निश्चय केला आणि उत्तर-यात्रेला जाण्याची अनुज्ञा त्यांनीं मातांपित्यांजवळ मागितली. अवधूताच्या आशीर्वादानें झालेला हा पुत्र वृत्तीनें विरक्तच राहणार, याची जाणीव झाल्यावर हताश होऊन तीं दोघं अश्रु ढाळूं लागलीं. श्रीपाद त्यांचें सांत्वन करूं लागल्यावर आई त्यांना कळवळून म्हणाली :

" बाळ, आमचा जीव तुझ्यावरच विसंबून होता. आतां आम्ही म्हातारपणीं कुणाच्या आधारानें दिवस कंठावें ? हे तुझे दोन लंगडे-पांगळे आणि आंधळे भाऊ—त्यांना आतां कुणीं पोसावें ? "

आईचें हें बोलणें ऐकल्यावर श्रीपादांनीं आपल्या दोघां अपंग भावांकडे अमृतदृष्टीनें पाहिलें आणि चमत्कार असा झाला कीं, ते दोघे अव्यंग बनले. श्रीपादांच्या कृपादृष्टीच्या वर्षावानें त्यांना शारीरिक अव्यंगतेबरोबरच प्रज्ञादि प्राप्त झाली आणि त्यामुळें माता-पित्यांची चिंता दूर झाली.

या चमत्कारानंतर माता-पित्यांचा निरोप घेऊन श्रीपादांनीं पीठापूर सोडलें आणि उत्तरयात्रा सुरू केली. या यात्रेंत त्यांनीं जगन्नाथपुरी, काशी आणि बद्रीकेदार या तीर्थक्षेत्रांत भ्रमण केलें. उत्तरयात्रा पूर्ण झाल्यावर ते दक्षिणेंत गोकर्ण महाबळेश्वर या ठिकाणीं आले. महाबळेश्वरीं तीन वर्षें गुप्त रीतीनें निवास केल्यावर ते श्रीशैलावर गेले आणि तेथें चार महिने राहून पुढें निवृत्तिसंगमावर कृष्णेच्या काठीं कुरवपूर[६] नांवाच्या [illegible] आले. गुरुचरित्र-कार या कुरवपुराविषयीं लिहितात—

**कुरवपूर महाक्षेत्र । कृष्णागंगा वाहे नीर ।**
**महिमा सांगतां असे अपार । भूमंडलांत दुर्लभ ॥**
**श्रीपाद राहिले कुरवपुरीं । ख्याति जाहली भूमीवरी ॥**
**प्रगट महिमा अपरांपरीं । सांगतां विस्तार असे देखा ॥[७]**

श्रीपाद श्रीवल्लभ यांचा निवास कुरवपूरला असतांना ज्या दोन घटना घडल्या, त्यांचा संबंध श्रीपादांच्या उत्तरावताराशीं—श्रीनरसिंह सरस्वतींच्या जीवनाशीं—असल्यामुळें त्या दोन घटनांचें सविस्तर वृत्त पाहिलें पाहिजे.

---

६. हें कुरवपूर ( कुरगुड्डी ) पुणें-रायचूर मध्यविभाग लोहमार्गावरील कृष्णा स्टेशनवरून पुढें गेल्यावर कृष्णा नदीच्या खोऱ्यांत दाट अरण्यांत १२-१३ मैल आंत आहे.

७. गुरुचरित्र, ८८,१०.

पहिली घटना : कुरवपूर येथें राहणाऱ्या एका वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मणाची अंबिका नामक पत्नी होती. या पतिसेवापरायण सुशील स्त्रीला अपत्यसुख नव्हतें. तिचीं मुलें अकालीं मरत. या पीडेंतून सुटण्यासाठीं तिनें अनेक तीर्थव्रतें आचरलीं. शेवटीं तिचा एक मुलगा वांचला. परंतु तो मंदमति निघाला. एकुलत्या एक पुत्राच्या जडमूढ अवस्थेकडे पाहून ब्राह्मण हताश झाला आणि अखेर त्याच मनोव्यथेनें त्यानें इहलोक सोडला. त्या ब्राह्मणाच्या मृत्यूनंतर अंबिका आणि तिचा मूढ पुत्र यांची स्थिति अधिकच शोचनीय झाली. तो मूढ जसजसा वाढूं लागला, तसतसा समाजांत अधिकच निंदास्पद ठरूं लागला. शेवटीं लोकनिंदेनें त्रासून जाऊन त्या मायलेकरांनीं कृष्णेच्या कुशींत चिरविश्रांति घ्यायचा निश्चय केला. तीं दोघें कृष्णा-प्रवाहांत प्रवेश करूं लागतात, तों त्यांना श्रीपादयति स्नान करतांना आढळले. त्या माऊलीनें लगबगीनें पुत्रासह श्रीपादयतींना वंदन केलें आणि आत्महत्येच्या महादोषांतून मुक्त होण्यासाठीं आशीर्वाद मागितला. अंबिकेच्या या मागणीनें विश्वानुकंपी असे श्रीपाद श्रीवल्लभ करुणेनें ओसंडूं लागले आणि तिला म्हणाले : " तूं शनिप्रदोषव्रताचें आचरण कर, म्हणजे तुझीं मनोवांछितें पूर्ण होतील. " अंबिकेचें मनोवांछित दुहेरी होतें : एक तर तिच्या मूढ पुत्राला प्रज्ञासंपन्नता लाभावयास हवी होती, आणि—

**देवा, आतां ऐसें करणें । पुढील जन्मीं मनुष्यपणें ।**
**पूज्यमान पुत्र पावणें । जैसा तूं पूज्य जगत्त्रयासी ॥**
**वासना असे माझ्या मनीं । पुत्र व्हावा ब्रह्मज्ञानी ।**
**बाळपणींच पाहे नयनीं । पूज्यमान समस्तांसी ॥**[८]

अंबिकेची श्रद्धा दृढ करण्यासाठीं श्रीपादांनीं तिला शनिप्रदोषव्रताचें माहात्म्य विवरून सांगितलें आणि तिच्या मूढ पुत्राच्या मस्तकावर कृपाकर ठेवून त्याला ज्ञानसंपन्न बनविलें.

ही अंबिका म्हणजेच उत्तरजन्मांतील लाड कारंजाची अंबाभवानी आणि श्रीपादकृपेनें तिला उत्तरजन्मांत लाभलेला पुत्र म्हणजेच श्रीनरसिंह सरस्वती, अशी गुरुचारित्रकारांची श्रद्धा आहे.

---

८. गुरुचरित्र, ८.४९,५२.

दुसरी घटना : कुरवपूर येथील निवासांत श्रीपादगुरु नित्य गंगास्नानाला जात, तेव्हां तेथें धुणें धूत असलेला एक रजक त्यांना भक्तिभावानें वंदन करीत असे. पुढें पुढें त्याला श्रीपादगुरूंच्या सेवेचें वेड लागलें. तो त्यांच्या मठाची झाड-लोट करी आणि त्यांच्या चरणसेवेंत दिवस काढी. एके दिवशीं वसन्तक्रीडा करण्यासाठीं म्लेंछ राजा राजपरिवारासह गंगाप्रवाहांत नावेंतून विहार करीत होता. नित्याप्रमाणें धुणें धूत असलेल्या रजकानें त्या म्लेंछ राजाचें वैभव साभिलाष पाहिलें आणि त्याच्या मनांत स्वस्थिती-विषयीं विषाद निर्माण झाला. श्रीपादगुरूंनीं त्याची मनःकामना मनोमन जाणली, आणि—

श्रीपाद म्हणती रजकासी । जन्मादारभ्य कष्टलासी ।
वांछा असे भोगावयासी । राज्यपद तमोवृत्ती ॥
निववावीं इंद्रियें सकळ । नातरी नव्हे मन निर्मळ ।
बाधा करिती पुढें केवळ । जन्मांतरीं परियेसी ॥
तुष्टवावया इंद्रियांसी । तुवां जन्मावें म्लेंछवंशीं ॥
आवडी जाहली तुझे मानसीं । राज्य भोगी जाय त्वरित ॥[९]

श्रीपादगुरूंचें हें वचन ऐकून रजकाच्या मनांत आनंद आणि दुःख यांचें संमिश्रण निर्माण झालें. राज्यभोगाचा आनंद आणि गुरुविरहाचें दुःख यांचा संघर्ष त्याचा मनांत सुरू झाला. त्यावर श्रीपादगुरूंनीं त्याला आश्वासन दिलें :

श्रीगुरु म्हणती तयासी । वैदुरानगरीं जन्म घेसी ।
भेटी देऊं अंतकाळासी । कारण असे आम्हां येणें ॥
आणिक कार्याकारणेसी । अवतार होऊं परियेसी ।
वेष धरूनि संन्यासी । नाम नृसिंह सरस्वती ॥[१०]

या घटनेंतून गुरुचरित्रकारांना असें सूचित करावयाचें आहे कीं, श्रीपाद श्रीवल्लभांचाच उत्तरावतार श्रीनरसिंह सरस्वतींच्या रूपानें झाला

९. गुरुचरित्र, ९·२८-३०.
१०. गुरुचरित्र, ९·३३,३५.

आणि त्यांनीं ज्या रजकाला राज्यपदप्राप्तीचा वर दिला, तोच पुढें श्रीनरसिंह सरस्वतींचा उपासक बनलेला बेदरचा मुसलमान बादशहा झाला.

अशा कांहीं चमत्कारांनंतर, सर्वांना पूज्य वाटणारे श्रीपादगुरु यांनीं कुरवपुरींच आश्विन वद्य १२ या दिवशीं (मघा नक्षत्र, सिंहराशि) निजानंदीं गमन केलें. हा त्यांच्या निजानंद-गमनाचा दिवस आजहि 'गुरुद्वादशी' म्हणून अतीव श्रद्धेनें पाळला जातो.

गुरुचरित्रांत वर्णिलेलें श्रीपाद-चरित्र इतकेंच आहे. 'भक्तजन तारावया' आणि 'दुष्टनिग्रह करावया' श्रीपादगुरूंचा अवतार झाला, असें गुरुचरित्रकार सांगतात. या अवतारहेतूचें अधिक स्पष्टीकरण करतांना गुरुचरित्रकारांनीं म्हटलें आहे :

**द्वापर जाउनी जाहला कली । अज्ञान लोक ब्राह्मणकुळीं ।**
**आचारहीन होऊनि प्रबळीं । वर्तती, महिमा कलियुगीं ॥**
**भक्तरक्षणार्थ । अवतरला श्रीगुरुनाथ ।**
**सगरांकारणें भगीरथ । आणी गंगा भूमंडळीं ॥**[११]

श्रीपादगुरूंनीं संन्यास घेतला नव्हता. ते बहुशः अवधूतवेषानें राहत असावे. गोकर्ण महाबळेश्वर आणि श्रीशैल येथील त्यांच्या निवासावरून असें वाटतें कीं, शिवस्थानांविषयीं त्यांना विशेष जिव्हाळा वाटत असावा. पीठापूर येथें त्यांच्या जन्मापूर्वीपासूनच दत्तोपासनेचा प्रचार असावा, असें वाटतें. 'पीठापुरीं दत्तात्रेय देव । वास असे सनातन ॥" (गु. च. १५·८७) हा उल्लेख या अनुमानाला पुष्टि देतो. शिवाय, ज्या अवधूताचा आशीर्वाद श्रीपादांच्या जन्मास कारणीभूत झाला, तो अवधूत दत्तोपासनेच्या तेथील अस्तित्वाचा पुरावाच आहे. सुमतेनें अवधूताची वार्ता पतीला निवेदिल्यावर आपळराजानें काढलेले उद्गार या दृष्टीनें चिंतनीय आहेत :

**दत्तात्रेयाचें स्थान जाण । माहूर करवीर क्षेत्र खूण ।**
**सदा वास याचि ग्रामा । पांचाळेश्वर नगरांत ॥**
**नाना रूपें भिक्षुक वेषें । दत्तात्रेय येताति हरुषें ।**
**न पुसतां माझ्या निरोपास । भिक्षा मात्र घालिजे ॥**[१२]

---

११. गुरुचरित्र, ५·७–८ १२. गुरुचरित्र, ५.३५–३६.

आज पीठापूर येथें दत्तोपासनेचें अस्तित्व आहे कीं काय, याचा शोध घेतला पाहिजे. श्रीपादांच्या दोन बंधूंचा वंश पुढें चालू राहिला आहे काय, पीठापूरच्या नागरिकांना या महापुरुषाचें जीवनवृत्त तरी ज्ञात आहे काय, या प्रश्नांचीं उत्तरेंहि शोधलीं पाहिजेत. श्रीवासुदेवानंद सरस्वती पीठापूर येथें श. १८३० मध्यें गेले होते. " श्रीपाद श्रीवल्लभांचें जन्मस्थान महाराजांनींच तेथें गेल्यावर लोकांना दाखवून दिलें. तोंपर्यंत त्या स्थानाची तेथील लोकांनाहि माहिती नव्हती. त्या जन्मस्थानीं महाराजांनीं पादुकांची स्थापना केली. त्या गांवांत कांहीं ब्राह्मण ' श्रीपाद ' या आडनांवाचेच आहेत."[१३]

श्रीपादगुरूंचा अवतार-काल ठरविणें अत्यंत कठीण आहे. त्यांचा समकालीन वैदूर नगरीचा म्लेंछ राजा कोणता, याचा निर्णय घेतां आला, तरच त्यांचा काळ ठरविणें शक्य होईल. श्रीपादगुरूंचे उत्तरावतार श्रीनरसिंह सरस्वती यांचा अवतार-काल श. १३००–१३८० हा आहे. (याच प्रकरणांत पुढें याविषयींची विस्तृत चर्चा केली आहे.) या कालखंडांत सहा बहामनी सुलतानांच्या कारकीर्दी लोटल्या. या सहा सुलतानांपैकीं महंमूद (इ. स. १३७८–१३९७), ग्यासुद्दीन (इ. स. १३९७), शमसुद्दीन (इ. स. १३९७), फेरोजशहा (इ. स. १३९७–१४२२) या चार सुलतानांची राजधानी गुलबर्ग्यास होती. या सहांपैकीं पांचवा अहंमद १ ला (इ. स. १४२२–१४३५) यानें राजधानी गुलबर्ग्याहून बेदर येथें नेली. (इ. स. १४३२). त्याच्यानंतर गादीवर आलेला अल्लाउद्दीन २ रा (इ. स. १४३५–१४५८) हा फोडानें मृत्यु पावल्याची नोंद इतिहासांत मिळते. म्हणजेच श्रीनरसिंह सरस्वतींशीं अखेरीस ज्याचा संबंध आला, तोच हा म्लेंछ राजा होय.

वरील खुलाशावरून वाचकांच्या ध्यानांत येईल कीं, श्रीपाद श्रीवल्लभांचा समकालीन सुलतान या सहाहि सुलतानांपूर्वीचा असला पाहिजे. श्रीपाद श्रीवल्लभ आणि श्रीनरसिंह सरस्वती यांच्या अवतार-कालांतील अंतर समजण्यास कांहींच आधार नसल्यामुळें तो सुलतान निश्चित कोणता असावा, याचा अंदाज बांधणें अशक्य आहे. आजवरच्या रूढ समजाप्रमाणें तो अहंमद १ ला मानलेला आहे. परंतु तें कसें शक्य नाहीं, हें वाचकांच्या

---

१३. श्रीगुरुदेव-चरित्र; द. धु. कवीश्वर, पृ. २५९-२६०.

ध्यानीं आलें असेलच. त्यांच्या आणि श्रीनरसिंह सरस्वतींच्या अवतारकालांत २५ वर्षांचें अंतर मानलें आणि त्यांचा जीवनकाल ३० वर्षांचा मानला, तर त्यांच्या काळाविषयीं आपणांस असें विधान करतां येईल कीं, श. १२४५–१२७५ या काळांत श्रीपाद श्रीवल्लभांचें अवतार-चरित्र घडलें. हा काळ गृहीत धरला तर त्यांच्या अवतारकाळांतच ( इ. स. १३४७ ) बहामनी राज्याची स्थापना झाली, असें ठरेल. अर्थात् वैदूरनगरींत म्लेंछ राजकुळांत जन्म घेण्याचा आशीर्वाद त्यांनीं ज्या रजकाला दिला होता, त्या रजकानें बऱ्याच उशिरां पुनर्जन्म धारण केला, असेंहि यामुळें सहजच निष्पन्न होईल. ते नामदेवाचे समकालीन असावे.

या संदिग्ध अनुमानांना बळकटी आणणारीं साधनें शोधान्तींहि उपलब्ध होणें कठीण आहे. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासांत महनीय स्थान भूषविणारा हा द्रविडदेशीय महापुरुष अज्ञाताच्या जवनिकेआड दडला आहे. त्याचें समग्र अवतार-चरित्र कधीं काळीं प्रकाशांत आलें, तर भारतीय साधनेच्या इतिहासांतील महत्त्वाचे दुवे स्पष्ट होतील.

## श्रीनरसिंह सरस्वती : जन्म व बालपण :

येथवर श्रीनरसिंह सरस्वतींच्या जन्माची पार्श्वभूमि आपण पाहिली. दत्तात्रेयाचे दुसरे अवतार आणि श्रीपाद श्रीवल्लभांचे उत्तरावतार म्हणून दत्त-संप्रदायांत त्यांची ख्याति आहे. ‘ गुरुचरित्र ’ या प्रसिद्ध ग्रंथाचे चरित्र-नायक तेच आहेत. या ग्रंथाच्या ११ ते ५१ या अध्यायांत त्यांचें चरित्र वर्णिलेलें आहे.

कुरवपूर येथील ज्या अंबिका नामक विप्रस्त्रीला श्रीपाद श्रीवल्लभांनीं आशीर्वाद दिला होता, तीच अंबिका ‘ अंबा भवानी ’ या नांवानें करंजनगर[१४] या गांवीं वाजसनेयी शाखेच्या ब्राह्मण कुळांत जन्म पावली. ती विवाहयोग्य झाल्यावर त्याच गांवांतील माधव नामक शिवव्रती ब्राह्मणाशीं तिचा विवाह झाला. विवाहानंतर पूर्वसंस्कारांनुसार ती शनिप्रदोषव्रताचें आचरण करीत राहिली. या व्रताचरणाला सोळा वर्षे झाल्यावर जणुं प्रसन्न झालेल्या

१४. लाड कारंजा ( जि. अकोला, विदर्भ प्रांत ) : हें स्थान ‘ उत्तरेकडील गाणगापूर ’ समजलें जातें.

शिवाच्या कृपेनें श. १३०० च्या सुमारास तिच्या उदरीं एक तेजस्वी बालक जन्मास आलें. हें बालक म्हणजेच श्रीनरसिंह सरस्वती होत.[१५] जन्मतःच हें तेजस्वी बालक ॐकाराचा उच्चार करूं लागलें. जातक वर्तविण्यास आलेले ब्राह्मण या बालकाकडे पाहून म्हणाले :

कुमर होईल कारणिक पुरुषी । गुरु होईल सकळिकां ॥
याचा अनुग्रह होईल ज्यासी । तो वंद्य होईल विश्वासी ।
याचें वाक्य होईल परिस । चिंतामणि याचे चरण ॥
अष्ट सिद्धि याचे द्वारीं । वोळगत राहातील निरंतरीं ।
नव निधि याच्या घरीं । राहती ऐक द्विजोत्तमा ॥
न होती यासी गृहिणी-सुत । पूज्य होईल त्रिभुवनांत ।
याचे दर्शनमात्रें पतित । पुनीत होतील परियेसीं ॥
होईल हा अवतार पुरुषी । आम्हां दिसतसे भरंवसीं ।
संदेह न धरावा मानसीं । म्हणोनी करिती नमस्कार ॥ [१६]

या बालकाचें जन्मनाम ‘ शालग्रामदेव ’ असें ठेवण्यांत आलें, परंतु लौकिक नांव ‘ नरहरि ’ असें रूढ झालें. नरहरि माता-पित्यांच्या प्रेमळ छत्राखालीं शुक्लेन्दूप्रमाणें वाढूं लागला. परंतु तो सात वर्षांचा झाला तरी त्याला कांहींच बोलतां येत नसे. आपला मुलगा मुका निघणार, या भीतीनें माता-पित्यांना अत्यंत दुःख होऊं लागलें. अखेर व्रतबंधनाचा उपाय करून पाहण्याचें ठरलें. सांग विधिविधानासह थाटामाटानें मुंज पार पडली. नरहरीला गायत्री मंत्राची दीक्षा मिळाली आणि तो मातेकडे भिक्षा मागावयास गेला. ही भिक्षा मागतांना त्यानें—आजवर मौनस्थितींत असलेल्या नरहरीनें—आपल्या मुखांतून वेदवाणी प्रकटविली. या चमत्कारानें माता-पित्यांसह सर्व लोक आनंद आणि विस्मय या भावनांनीं भारावून गेले. परंतु ही भावनेची भरती ओसरते न ओसरते, तोंच नरहरि मातेला म्हणाला :

तुवां उपदेश केला एक । भिक्षा माग म्हणोनि ॥

१५. कुरवपूरचें अंबिकेचें घराणें आणि कारंजाचें अंबाभवानीचें घराणें यांचा पूर्वानुबंध होता काय, याचा शोध घेतला पाहिजे.

१६. गुरुचरित्र, ११. १६–२०.

**नव्हती बोल तुझे मिथ्या । निर्धार राहिला माझिया चित्ता ।**
**निरोप द्यावा आम्हां त्वरिता । जाऊं तीर्थं आचरावया ॥**
**आम्हां आचार ब्रह्मचारी । भिक्षा करावी घरोघरीं ॥**
**वेदाभ्यास मनोहरी । करणें असे परियेसा ॥**[१७]

नरहरीच्या या वचनानें मातेच्या हृदयावर वज्राघात झाला. क्षणैक ती मूर्च्छित झाली. या मूर्च्छेनंतून सावध झाल्यावर डोळ्यांतून आसवांचा महापूर सांडीत ती नरहरीला म्हणाली : " बाळ, सोळा वर्षे शिवाची आराधना केल्यावर तूं प्राप्त झालास. तुझ्याकडे मी किती आशेनें पाहत होतें ! सात वर्षे तूं बोलला नाहींस. आणि आतां बोलूं लागल्याबरोबर मला सोडून निघालास ! "

आईचें सांत्वन करीत नरहरीनें तिला पूर्वजन्माचें स्मरण दिलें. या स्मरणानें आईला नरहरीच्या जागीं श्रीपादयतींची मूर्ति दिसूं लागली. परंतु तिचें माया-वेडें मन ताटातुटीची कल्पना सहन करावयास तयार होईना. तिनें नरहरीला धर्मविहित आश्रम-पालनाची जाणीव दिली आणि तिन्ही पूर्वाश्रमांचें सुयोग्य आचरण पार पाडल्यावरच संन्यास पत्करणें योग्य ठरेल, असें सुचवलें.

वेडया मायेंतून निर्माण झालेलें हें आईचें समर्थन नरहरीला पटलें नाहीं. मानवी जीविताची शाश्वती नसल्यामुळें, सोपानमार्गाचा अवलंब न करतां मृत्यूला चुकवून मुक्तीची तत्काळ कास धरली पाहिजे, असें नरहरीचें मत. परंतु आईची समजूत काढणें अशक्य झाल्यामुळें त्यानें--

**संवत्सर एक तुझ्या घरीं । राहूं माते, निर्धारीं ।**
**वासना पुरतील तुझ्या जरी । मग निरोप दे मज ॥**[१८]

असें आईजवळ कबूल करून तत्काळ घराबाहेर पडण्याचें रहीत केलें. या एक वर्षभराच्या गृह-निवासांत नरहरीनें आपल्या प्रज्ञाविलासानें करंजनगरांतील जनमानसाला मंत्रमुग्ध बनविलें. या काळाच्या अखेरीस नरहरीच्या आईला दोन जुळे पुत्र प्राप्त झाले. तीं दोन बाळें तीन महिन्यांचीं झाल्यावर नरहरींनें माता-पित्यांचा निरोप घेण्याचें ठरविलें :

---

१७. गुरुचरित्र, ११. ८२–८४.
१८. गुरुचरित्र, १२·३१.

**तुवां आराधिला शंकर । आम्हां करविला अवतार ।**
**वासना पुरेल तुझा भार । आम्हां निरोप दे आतां ॥**
**पुनर्दर्शन तुम्हांसी । होईल ऐका वर्षें तीसीं ।**
**जावोनि बदरीवनासी । म्हणोनि निघती तये वेळीं ॥**[१९]

## संन्यास-ग्रहण आणि उत्तर-यात्रा :

अशा प्रकारें मातेचा निरोप घेऊन आणि मात्या-पित्यांच्या व ग्रामस्थांच्या डोळ्यांतून ओसंडणाऱ्या वियोगजळांत स्मृतींचीं प्रतिबिंबें सोडून, केवळ आठ वर्षांच्या नरहरीनें बदरीकेदाराच्या यात्रेचें प्रस्थान ठेवलें. कारंजापासून काशीपर्यंतची प्रदीर्घ वाटचाल करून नरहरि विश्वनाथाच्या चरणीं कांहीं काळ विसांवला. काशीच्या निवासांत मणिकर्णिकेच्या घाटावर त्रिकाळ स्नान करणें, विश्वेश्वराची मनोभावें पूजाअर्चा करणें आणि साधुसंतांच्या नि तपस्वीजनांच्या सहवासांत ब्रह्मचर्योचित पद्धतीनें काळ काढणें हा नरहरीचा नित्यक्रम होता. केवळ आठ-नऊ वर्षांचें हें तेजस्वी बालक आपल्या प्रज्ञेनें व तपानें काशीनिवासी संन्यासी जनांच्या कुतूहलाचा विषय बनलें. मणि-मर्णिकेच्या घाटावर त्रिकाळ स्नानाला येणाऱ्या नरहरीकडे पाहून कृष्ण-सरस्वती नामक एका वृद्ध संन्याशाच्या हृदयांत त्याच्याविषयीं सादर वात्सल्याची भावना उदित झाली. हे कृष्ण-सरस्वती शृंगेरी मठांतील विद्या-रण्यस्वामींच्या परंपरेंतील होते. नरहरीसारखा स्वयंप्रज्ञ आणि निग्रही बालक जर संन्यासधर्माचें अनुसरण करण्यास तयार झाला, तर आपल्या परंपरेची प्रतिष्ठा निश्चित वाढेल, असे विचार कृष्णसरस्वतींच्या मनांत घोळूं लागले. आपल्या मनांतील हे विचार-तरंग त्यांनीं अन्य संन्यासी जनांजवळ व्यक्त केले आणि सर्वांच्या संगनमतानें, केवळ संन्यासधर्माच्या प्रतिष्ठेसाठीं, दंभ-रहित विनयानें त्यांनीं नरहरीला विचारणा केली :

**लोकाग्रहानुकारणें । तुम्ही आतां संन्यास घेणें ।**
**आम्हां समस्तां उद्धरणें । पूजा घेणें आम्हांकरवीं ॥**
**या कलियुगीं संन्यास म्हणोन । निंदा करती सकळै जन ।**
**स्थापना करणार कवण । न दिसती भूमीवरी ॥**[२०]

१९. गुरुचरित्र, १२·५७–५८.
२०. गुरुचरित्र, १२·९१–९२.

कृष्णसरस्वतींच्या या अनुरोधाचा प्रभाव नरहरीच्या वैराग्यप्रवण हृदयावर तात्काळ उमटला आणि त्यानें कृष्णसरस्वतींच्या कडून संन्यास-दीक्षा स्वीकारली. गुरुदेवांनीं नरहरीचें दीक्षान्त नांव 'नरसिंह सरस्वती' असें ठेवलें. या क्षणापासून नरहरि 'श्रीनरसिंह सरस्वती' या लोकविख्यात नांवानें ओळखला जाऊं लागला. अभिजात तेज वयाची वाट पाहत नाहीं, हेंच खरें आहे.

संन्यास-ग्रहणानंतर नरसिंह सरस्वतींनीं काशींत कांहीं काळ ज्ञानदानाचें कार्य केलें आणि अनेक जिज्ञासूंना व मुमुक्षूंना परमार्थाची वाट दाखविली. त्यानंतर बरोबर मुनिजनांचा मेळा घेऊन ते बदरीकेदारकडे गेले. तेथें बदरीनाथाचें दर्शन घेऊन आणि नंतर सुमेरूला सव्य प्रदक्षिणा घालून ते गंगासागरीं आले. तेथून गंगातटाकयात्रा करीत करीत ते प्रयाग येथें आले. या प्रयागनिवासांत माधव नामक एका ब्राह्मणानें त्यांच्याकडून संन्यासदीक्षा घेतली. त्यांनीं त्याचें नांव माधवसरस्वती असें ठेवलें. या माधवसरस्वतीवर श्रीगुरूंची असीम प्रीति जडली. या ठिकाणीं माधवसरस्वतीशिवाय बाळकृष्ण सरस्वती, कृष्ण सरस्वती, उपेंद्र सरस्वती, सदानंद सरस्वती, ज्ञानज्योति सरस्वती आणि सिद्ध सरस्वती असे आणखी सहा शिष्य त्यांना लाभले. या सात शिष्यांसह तीर्थयात्रा करीत ते दक्षिणेकडे वळले.

## करंजनगर ते वाडी :

प्रयागपासून दक्षिणेकडची वाट आक्रमीत श्रीगुरु शिष्यवृंदासह करंजनगरास परत आले. वयाच्या आठव्या-नवव्या वर्षी त्यांनीं घर सोडलें होतें आणि आतां तीस वर्षांनंतर ते घरीं परत आले होते. त्यांच्या पुनर्दर्शनानें मात्या-पित्यांचा आनंद गगनांत मावेना. त्यांचें तें संन्यस्त स्थितींतील तेजस्वी व्यक्तिमत्त्व पाहून ग्रामस्थांना त्यांच्याविषयीं अपार श्रद्धाभाव निर्माण झाला. त्यांनीं जेव्हां घर सोडलें, तेव्हां त्यांना दोन जुळे बंधु होते. त्यानंतरच्या प्रदीर्घ काळांत अंबाभवानीला आणखी दोन पुत्र आणि एक कन्या (रत्नाई) झाली होती. हीं पांचहि भांवडें आतां मोठीं झालेलीं होतीं. आपले ज्येष्ठ बंधु इतके परमज्ञानी आणि तेजःसंपन्न असलेले पाहून त्या अपरिचित भावंडांच्या मनांत श्रीगुरूविषयीं समादराची भावना दाटून

राहिली. घरांतील आणि गांवांतील सर्व प्रियजनांना आपला अल्प सहवास देऊन श्रीगुरूंनीं करंजनगर सोडलें आणि ते त्र्यंबकेश्वरास आले.

त्र्यंबकेश्वर येथें गोदावरीचें उगमस्थान पाहून आणि नाशिक क्षेत्रांतील सर्व तीर्थस्थानें वंदून त्यांनीं गोदावरीची तटाकयात्रा आरंभली. गोदाप्रदक्षिणेच्या वाटचालींत ते मंजरिका नांवाच्या गांवीं आले. तेथें माधवारण्य या नांवाचे एक मुनि राहत असत. ते नरसिंहाचे उपासक होते. त्यांच्या हृदयांत नरसिंहाचें जें मनोमय ध्यान वावरत असे, तेंच त्यांना नरसिंह सरस्वतींच्या दर्शनांत जाणवलें. आपलें परमोपास्य आपल्यासमोर प्रकट झालें आहे, अशी त्यांची भावना झाली. ते श्रीगुरूंना सर्वस्वानें शरण गेले. त्यांचा हा उत्कट भाव पाहून श्रीगुरूंनीं त्यांना आत्मबोध केला आणि त्यांना परमसिद्धीचा आशीर्वाद देऊन ते पुढें वासर ब्रह्मेश्वर[२१] येथें गेले.

वासर ब्रह्मेश्वर या ठिकाणीं गोदावरीच्या पात्रांत स्नान करीत असतांना श्रीगुरूंना एक करुण दृश्य दिसलें : एक ब्राह्मण पोटदुखीच्या आणि अन्नद्वेषाच्या विकारानें त्रासून गोदावरीच्या प्रवाहांत आत्महत्या करूं पहात होता. श्रीगुरूंनीं त्याला शिष्यांकरवीं बोलावून घेतलें आणि त्याला रोगमुक्तीचें आश्वासन दिलें. इतक्यांत गंगास्नानासाठीं एक ब्राह्मण ग्रामाधिकारी तेथें आला. श्रीगुरूंचा संन्याशवेश पाहून त्यानें श्रीगुरूंना प्रणिपात केला. श्रीगुरूंनीं त्याला नांव-गांव विचारलें. त्याचें नांव सायंदेव. आपस्तंब शाखा. गोत्र कौंडिण्य. तो मूळ कडगंचीचा[२२] राहणारा; परंतु त्यानें 'उदरपूर्तीस्तव यवनसेवा' पत्करलेली असल्यामुळें ग्रामाधिकारी म्हणून एक वर्षापूर्वीं त्याची वासर ब्रह्मेश्वरीं नेमणूक झाली होती. श्रीगुरूंनीं पोटदुखीची व्यथा असलेल्या ब्राह्मणास सायंदेवांजवळ निरविलें आणि विशिष्ट औषधयोजना व अन्नपथ्य करावयास सांगितलें. श्रीगुरूंच्या तेजःप्रभावानें सायंदेव भारावून गेला होता. त्यानें त्यांना आपल्या घरीं भिक्षा स्वीकारण्याची विनंती केली. त्याच्या विनंतीनुसार ते शिष्यांसह त्याच्या घरीं गेले आणि तेथें जठरव्यथा झालेल्या ब्राह्मणास पंक्तीस बसवून त्यांनीं भोजन स्वीकारलें. ब्राह्मणाची जठरव्यथा शमली; परंतु सायंदेवाची हृदयव्यथा श्रीगुरु-कृपेचें व्रणविरोपण शोधूं लागली :

---

२१. हें स्थान माहूरच्या दक्षिणेस गोदावरीच्या कांठीं नांदेड जिल्ह्यांत आहे.

२२. हें गांव गाणगापूरपासून १२ मैल अंतरावर आहे.

माझे वंशपारंपरीं । भक्ति द्यावी निर्धारीं ।
इहसौख्य पुत्रपौत्रीं । उपरी द्यावी सद्‌गति ॥
ऐसी विनंति करुनी । पुनरपि विनवी करुणावचनीं ।
सेवा करितों द्वारयवनीं । महाशूर क्रूर असे ॥
प्रतिसंवत्सरीं ब्राह्मणांसी । घात करितो जीवेसीं ।
याचि कारणें आम्हांसी । बोलावीतसे मज आजि ॥
जातां तया जवळीं आपण । निश्चयें घेईल माझा प्राण ।
भेटी जाहली तुमचे चरण । मरण कैंचें आपणांसी ॥[२३]

सायंदेवाची ही व्यथा प्रकट होतांच श्रीगुरुंनीं त्याच्या मस्तकावर आपला अभयकर ठेवला आणि त्याला सांगितलें : "तूं निर्भयपणें बादशहाकडे जाऊन ये. तूं परत येईपर्यंत मी येथेंच थांबतों." त्यांच्या आदेशानुसार सायंदेव बादशहाकडे गेला; परंतु चमत्कार असा कीं, त्याला कांहीं पीडा करण्याऐवजीं त्यास वस्त्रभूषणें देऊन बादशहानें त्याची रवानगी केली. या घटनेमुळें सायंदेवाच्या हृदयांत श्रीगुरुंचे चरणकमळ कायमचे स्थिरावले. श्रीगुरु त्याचा निरोप घेऊं लागतांच गुरुवियोगाच्या कल्पनेनें तो अत्यंत व्यथित झाला. श्रीगुरुंनीं त्याला आश्वासन दिलें कीं :

कारण असे आम्हां जाणे । तीर्थें असती दक्षिणे ।
पुनरपि तुम्हां दर्शन देणें । संवत्सरीं पंचदशीं ॥
आम्ही तुमचें गांवासमीपत । वास करूं हें निश्चित ।
कलत्र पुत्र इष्ट भ्रात । मिळोनि भेटा तुम्हीं आम्हां ॥[२४]

अशा प्रकारें सायंदेवाचा निरोप घेऊन श्रीगुरु परळी वैजनाथ येथें आले. या वेळेपर्यंत त्यांचा महिमा पुष्कळच वाढला होता. सकाम शिष्यांचा समूह त्यांच्याभोंवतीं जमूं लागला होता. या वातावरणाची त्यांना तीव्र जाणीव झाली आणि सर्व शिष्यांना तीर्थभ्रमण करण्याचा आदेश देऊन ते वैजनाथास अज्ञातपणें एक वर्षभर राहिले. या वर्षभराच्या काळांत त्यांच्या सेवेला सिद्ध सरस्वती हा एकच शिष्य होता. परळी वैजनाथ येथें असतांना

२३. गुरुचरित्र, १४. १२–१५.
२४. गुरुचरित्र, १४·४२–४३.

एका गुरुद्रोही ब्राह्मणास त्यांनीं गुरुमाहात्म्य सांगितलें आणि त्याचें मन विकल्परहित बनविलें.

तेथील एक वर्षाच्या अज्ञात निवासानंतर ते भिलवडी[२५] या गांवीं आले ( सुमारें श. १३४४ ) आणि कृष्णेच्या पश्चिम तीरावर औदुंबरांच्या घनदाट छायेंत चातुर्मास काढण्याचें त्यांनीं ठरविलें. भिलवडीचा परिसर अत्यंत निसर्गरम्य असल्यामुळें अनेक साधकांनीं त्याला तपोभूमि बनविलें होतें. तेथें भुवनेश्वरी या शक्तिदेवतेचें स्थान असल्यामुळें एक सिद्धस्थान म्हणून त्या क्षेत्राचें महिमान मोठें होतें. श्रीगुरूंच्या चातुर्मास-निवासामुळें भिलवडीचें पूर्वमहिमान शतगुणित झालें.

करवीर ( कोल्हापूर ) क्षेत्रांतील एका मंद बुद्धीच्या ब्राह्मणानें विद्याप्राप्तीसाठीं भुवनेश्वरीपुढें धरणें धरलें. बुद्धीच्या दारिद्र्यामुळें घरींदारीं त्याची हेटाळणी होत असे. जननिंदेचा त्रास असह्य होऊन तो देवीच्या चरणीं प्रार्थना करूं लागला : " माते, मला बुद्धीचा प्रसाद दे. " देवीच्या कृपेची वाट पाहण्याइतका त्याला धीर नव्हता. त्यानें वैतागानें हातीं शस्त्र घेतलें आणि देवीच्या समोर तो स्वतःची जीभ कापूं लागला. त्याच्या या अतातायीपणाला प्रतिबंध करण्यासाठीं देवी प्रगट झाली आणि तिनें सांगितलें कीं, " असें कांहीं करूं नकोस. पैलतीरावर जा. तिथें औदुंबरातळीं एक तपोनिधि आहे. तो तुला बुद्धीचें देणें देईल. " देवीचा संदेश शिरीं धारण करून तो ब्राह्मण श्रीनरसिंह सरस्वतींकडे आला आणि त्याचें मनोवांछित सफल झालें.

चातुर्मास संपल्यानंतर श्रीगुरूंनीं भिलवडीच्या औदुंबरांचा सहवास सोडला आणि ते कृष्णा-पंचगंगा या नद्यांच्या संगमावरील अमरापूर[२६] या गांवीं आले.

---

२५. हें गांव पुण्याहून हुबळीकडे जाणाऱ्या लोहमार्गावर मिरजेच्या अलीकडे कृष्णेच्या कांठीं आहे.

२६. कृष्णेच्या कांठीं अलीकडच्या तीरावर नरसोबाची वाडी आणि पलीकडच्या तीरावर हें अमरापूर ( औरवाड ) आहे.

**कृष्णा-पंचगंगेच्या संगमावर :**

या निसर्गरम्य ठिकाणीं आल्यावर श्रीगुरूंचें मन त्या संगम-जळावरील तरंगांवर आंदोळूं लागलें :

शिवा भद्रा भोगावती । कुंभी नदी सरस्वती ॥
पंचगंगा ऐसी ख्याति । महापातक संहारी ॥
ऐसी प्रख्यात पंचगंगा । आली कृष्णेचिया संगा ॥
प्रयागाहूनि असे चांगा । संगमस्थान मनोहर ॥
अमरापुर म्हणिजे ग्राम । स्थान असे अनुपम्य ।
जैसा प्रयाग-संगम । तैसें स्थान मनोहर ॥
वृक्ष असे औदुंबरु । प्रत्यक्ष जाणा कल्पतरु ॥
देव असे अमरेश्वरु । तया संगमा षट्कूळीं ॥[२७]

श्रीगुरूंच्या आगमनापूर्वींच या स्थानाला तीर्थरूपता प्राप्त झालेली होती. अशी ही सृष्टिसुंदरीची क्रीडाभूमि आणि साधुसंतांची तपोभूमि पाहून श्रीगुरूंचें तपःप्रिय हृदय तिथें विसांवलें—बारा वर्षें ते या स्थानाच्या सान्निध्यांत राहिले. त्यांच्या एक तपाएवढ्या सान्निध्यामुळें हें स्थान त्यांच्याच नांवानें 'नरसोबाची वाडी' म्हणून ओळखलें जाऊं लागलें.

भिलवडीप्रमाणेंच येथेंहि गांव एका तीरावर आणि श्रीगुरूंचा निवास दुसऱ्या तीरावर अशीच परिस्थिति होती. समोर कृष्णेचा वेगवान् प्रवाह, जवळच तिनें पंचगंगेशीं केलेली प्रीतीची मिळणी, तीरावरची प्रसन्न तरुराजि, तिच्यांतून वाहणारा गंधवाही वारा आणि पर्णांच्या संभारांत दडी घेऊन चाललेलें विहगांचें कूजन—हें सारेंच वातावरण विलोभनीय होतें. श्रीगुरु अशा वातारणांत चिंतन-मनन करीत आणि पैलतीरावरच्या अमरापुरांत नित्य भिक्षेसाठीं जात. या एक तपाएवढ्या संगम-निवासांत श्रीगुरूंनीं अनेक आर्तांचीं सांकडीं फेडलीं.

अमरापुरांत एक वेदाभ्यासक ब्राह्मण आपल्या पत्नीसह राहत होता. केवळ ब्राह्मणांच्या घरीं कोरडी भिक्षा मागून उभयतांचा निर्वाह करायचा, असें त्याचें व्रत होतें. अर्थातच या व्रतामुळें अनेकदां त्या दांपत्याला उपवास

२७. गुरुचरित्र, १८. १६-१९.

पडण्याची पाळी येई. अशा वेळीं अंगणांत पसरलेल्या घेवड्याच्या वेलाच्या शेंगांची भाजी करून तीं दोघें दिवस कंठीत. श्रीगुरूंच्या कानीं ही हकीकत आल्यावर ते त्या ब्राह्मणाच्या घरीं भिक्षेसाठीं गेले. ब्राह्मणानें सादर पुढें केलेली घेवड्याच्या शेंगांची भाजी आनंदानें स्वीकारून श्रीगुरूंनीं त्याला आशीर्वाद दिला आणि ते बाहेर पडले. आणि आश्चर्य असें कीं, ज्या घेवड्याच्या वेलावर विश्वसून त्या ब्राह्मणानें अकर्मण्यता बाणवली होती, तो वेलच त्यांनीं मुळासकट उपटून टाकला. हा प्रकार पाहून त्या ब्राह्मणाला अत्यंत विषाद वाटला, परंतु परिणामीं त्या वेलाच्या उन्मूलनांतच त्याला ऐश्वर्याचें निधान गवसलें!

अमरापूर येथें योगेश्वरासारखें सिद्धजीवन व्यतीत करून, एक तपानंतर श्रीगुरु अमरापुराहून गाणगापूर येथें आले. त्यांचा अमरापुरांतील निवास-काळ श. १३४४ ते श. १३५६ हा असावा.

### भीमा-अमरजेच्या संगमावर :

दोन सरितांच्या जीवन-संगमाविषयीं श्रीगुरूंच्या हृदयांत विशेष प्रीति असावी, असें वाटतें. कदाचित् त्यांना आचार्यांच्या अद्वैत सिद्धान्ताचा उत्कट प्रत्यय या संगम-दर्शनांत येत असेल. कृष्णा-पंचगंगा-संगमावर एक तप काढल्यावर ते भीमा-अमरजा-संगमावर आले आणि तेथें त्यांनीं दोन तपांएवढा काळ व्यतीत केला :

ऐसा संगम मनोहरु । तेथें वसती श्रीगुरु ।
त्रिमूर्तीचा अवतारु । गौप्य होय कवणेपरी ॥
सहस्र किरणें सूर्यासी । केवीं राहे गौप्येसीं ।
आपोआप प्रकाशी । होय सहज गुण तयाचा ॥[१८]

गाणगापूर हा गांव ब्राह्मणांना अग्रहार मिळालेला होता. तेथें ब्राह्मणांचीं घरें शंभरावर होतीं. या ब्राह्मण-समाजांत अनेक वेदपाठक 'श्रौती' होते. परंतु श्रीगुरु एका गरीब ब्राह्मणाकडे भिक्षेसाठीं जात. शब्दज्ञानाच्या फुंजानें चढलेल्या आणि धर्माच्या आवरणाखालीं दंभाचरण करणाऱ्या तथाकथित वेदज्ञांविषयीं त्यांना घृणा वाटत असे. तो गुरुकृपासंपन्न गरीब ब्राह्मण एका

१८. गुरुचरित्र, २२.१८–१९.

वांझ म्हशीवरून लोकांच्या मळ्यांसाठीं खारी माती वाहण्याचें काम करून आपल्या कुटुंबाचा निर्वाह करीत असे. गुरुदेवांच्या कृपासंजीवनीनें त्याच्या घरीं दुभत्याचा सुकाळ झाला. श्रीगुरूंच्या कृपाप्रभावाच्या वार्ता वाऱ्याबरोबर प्रसृत होऊं लागल्या. त्या वार्तांनीं आश्चर्यचकित झालेला ग्रामाधिपति संगमावर आला आणि श्रीगुरूंना प्रणिपात करून म्हणाला :

गाणगापूर महास्थान । स्वामी करावें पावन ।
नित्य येथें अनुष्ठान । वास करणें ग्रामांत ॥
मठ करुनि तये स्थानीं । असावें आम्हां उद्धारोनि ।
म्हणोनि लागे श्रीगुरुचरणीं । भक्तिपूर्वक नरेश्वर ॥ [२९]

श्रीगुरूंनीं त्याच्या भावनांची बूज राखली. त्यांचा मठ गांवांत केंद्रस्थानीं उभारला गेला आणि त्यांच्या नित्यक्रमामागें ग्रामाधिकाऱ्याच्या नियंत्रणाखालील सर्व यंत्रणा उभी राहिली. ते नित्य प्रातःकाळीं संगमावर अनुष्ठानासाठीं जात आणि मध्यान्हीं परत मठांत येत. या त्यांच्या ऐश्वर्यशाली दिनक्रमाविषयीं कांहींच्या मनांत विकल्प तरळूं लागला. या कांहींत गाणगापूरजवळील कुमसी गांवचे त्रिविक्रमभारती हे त्रिवेदी संन्यासी पुढें होते. हे संन्यासी नृसिंहाची मानसपूजा करीत असत. त्रिविक्रमभारती आपणांस 'दांभिक संन्यासी' समजत आहेत, हें श्रीगुरूंना समजल्यावर ते ग्रामाधिकाऱ्यास बरोबर घेऊन परिवारासह कुमसी गांवीं निघाले. इकडे त्रिविक्रमभारतींच्या मानसपूजेंत व्यत्यय येऊं लागला. निंदा मत्सरानें ग्रासलेल्या त्यांच्या हृदयांत नृसिंहाऐवजीं एका दंडधारी यतीचें—नृसिंह सरस्वतींचें ध्यान संचारूं लागलें. या मानसिक त्रासानें अस्वस्थ झाल्यामुळें त्यांनीं आत्मसंशोधन केलें, आणि ते पश्चात्तापपूर्वक श्रीगुरूंना लोटांगणीं गेले. श्रीगुरूंनीं ज्ञानामृताच्या सिंचनानें त्यांचा मनोमल धुऊन काढला आणि त्यांना प्रकाशाची वाढ दाखविली.

मागें सायंदेवाच्या निमित्तानें ज्या 'महाक्रूर' आणि ब्रह्मद्वेषी म्लेंछ राजाचा उल्लेख आला आहे, त्या राजाच्या वर्तनावर प्रकाश पाडणारी आणि हिंदु समाजाच्या दृष्टीनें चिंतनीय ठरणारी घटना यानंतर घडून आली :

२९. गुरुचरित्र, १३.५५-२६.

विदुरा नाम नगर एक । होता राजा यवनवंशीं ॥
महाक्रूर ब्रह्मद्वेषी । सदा करी जीवहिंसी ।
चर्चा करवी ब्राह्मणांसी । वेद म्हणवी आपणांपुढें ॥
विप्रांसी म्हणे तो यवन । जे कां असती विद्वज्जन ।
आपुल्या सभेसी येऊन । वेद सर्व म्हणावे ॥
त्यांतें येईन द्रव्य बहुत । सर्वांमध्यें ते मान्यवंत ।
जे कोण सांगतील वेदार्थ । विशेष त्यांसी पूजा करूं ॥
ऐसें ऐकूनि ज्ञानी जन । नेणों म्हणती मतिहीन ।
जे कोण असती ज्ञानहीन । कांक्षा करिती द्रव्यावरी ॥
जाऊनि तया म्लेंछापुढें । वेदशास्त्रें वाचिती गाढें ।
म्लेंछामनीं असें कुडें । ऐके अर्थ-यज्ञकांड ॥
म्हणे विप्र यज्ञ करिती । पशुहत्या करणें रीती ।
आम्हां म्लेंछातें निंदिती । पशुवधी म्हणोनियां ॥[३०]

द्रव्यलालसेपायीं स्वधर्म आणि स्वप्रतिष्ठा यांचा विकरा करावयास अनेक ब्राह्मण तयार होत. अशा ब्राह्मणांच्या करवीं स्वमतप्रतिष्ठापन आणि हिंदु-धर्मखंडन करण्याचा एक विलक्षण डाव या यवन राजानें टाकला होता. या त्यांच्या डावाला बळी न पडणाऱ्यांच्या मानेवर दहशतीची तलवार नेहमीं टांगती असे. त्यामुळें स्वधर्मच्युतीच्या मार्गानें चर्मरक्षण करण्याचा प्रयत्न करणाऱ्या ब्राह्मणांची संख्या त्या काळीं कमी नव्हती. याच जातीच्या वेदविदांपैकीं दोन ब्राह्मण यवन राजाकडे आले. राजाशीं संबंधित असलेल्या अन्य ब्राह्मणांनीं त्यांच्या विद्वत्तेचा बहुमान केल्यावर राजानें त्यांचा बहुमान केला आणि त्यांच्या इच्छेनुसार त्यांना शास्त्रचर्चेचीं जयपत्रें मिळविण्यासाठीं राजानें निरोप दिला. द्रव्यपुरस्काराच्या मोहानें धुंद झालेले आणि शाब्दिकतेचा अभिमान मिरविणारे ते दोन पंडित हिंडत हिंडत कुमसी येथें आले. तेथें त्रिविक्रमभारतींना त्यांनीं वादासाठीं आव्हान दिलें. श्रीगुरूंचा बोध प्राप्त झाल्यानंतर त्रिविक्रमभारतींचें हृदय संपूर्णपणें दंभ-मानरहित बनलें होतें. ' नायमात्मा बलहीनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ' अशी त्यांची

३०. गुरुचरित्र, २५.६-१२.

प्रवृत्ति बनली होती. त्यामुळें जय-पराजयाच्या लटक्या अभिमानाला बळी पडण्याची त्यांची तयारी नव्हती. परंतु त्या उन्मत्तांची मनःस्थिति ही भूमिका समजावून घेण्यास अनुकूल नव्हती. शेवटीं निरुपाय होऊन, त्या पंडितवरांना बरोबर घेऊन त्रिविक्रमभारती गाणगापुरीं श्रीगुरूंकडे आले. श्रीगुरूंनीं त्यांना प्रारंभींच वेदांच्या अध्ययनाचा अगम्य व अपार व्याप समजावून सांगून वादाची व्यर्थता पटवून देण्याचा प्रयत्न केला आणि त्या पंडितांच्या मर्मावरच बोट ठेवलें :

या भरतखंडांत । पूर्वीं होतें पुण्य बहुत ।
वर्णाश्रमीं आचरत । होते लोक परियेसा ॥
या कलियुगाभीतरीं । कर्म सांडिलें द्विजवरीं ।
लोपले वेद निर्धारीं । गौप्य जाहले क्षितीसी ॥
कर्मभ्रष्ट झाले द्विज । म्लेंछापुढें बोलती वेदबीज ।
सत्त्व गेलें याचि काज । मंदमती झाले जाण ॥
पूर्वीं होतें महत्त्व । ब्राह्मणांसी देवत्व ।
वेदबळें नित्यत्व । भूसुर म्हणती याचि काज ॥
पूर्वीं राजे याचि कारण । पूजा करिती विप्रचरण ।
सर्वस्व देतां दक्षिणा । अंगीकार नच करिती ॥
ऐसें महत्त्व ब्राह्मणांसी । पूर्वीं होतें परियेसी ।
वेदमार्ग त्यजोनि सुरसी । अन्यमार्गें रहाटती ॥
तेणें सत्त्व भंगलें । हीन यातीतें सेवा करूं लागले ।
अध्यापन करिती मोलें । वेदविक्रय परियेसा ॥[31]

त्या मदांधांच्या मनावर याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. तेव्हां त्यांना ताळ्यावर आणण्यासाठीं श्रीगुरूंनीं एका मांगाला विप्रत्व देऊन त्याच्याकरवीं त्या पंडितब्रुवांचा मद उतरविला.

यानंतर गाणगापूरच्या निवासांत अनेक घटना घडल्या ; अनेक आर्तांचीं दुःखें दूर झालीं ; श्रीगुरूंच्या प्रभावाचा प्रत्यय आलेले अनेक जण त्यांच्या चरणसेवेंत चूर झाले. परंतु श्रीगुरूंचें अंतःकरण एका विशेष विचारानें

---

३१. गुरुचरित्र, २६.२२२-२२६, २३१-२३२.

ग्रस्त होऊन गेलें होतें. वरील मदोन्मत्त पंडितांच्या विचारानें त्यांच्या मनांत काहूर उठलें. ब्राह्मणांच्या अधःपतनाचें आणि यवनांच्या सर्वग्रासी आक्रमणाचें उत्कट प्रत्यंतर त्यांना त्या घटनेनें घडलें. वास्तविक यापूर्वींच त्यांना याची जाणीव झालेली होती. सर्व भारतभर चाललेलें इस्लामचें थैमान त्यांनीं उघड्या डोळ्यांनीं पाहिलें होतें. देशांतील पुढारलेले वर्ण यवनसेवेंत रत होऊन स्वजनांची नि स्वधर्माची कशी वंचना करीत होते, हें त्यांनीं अनुभवलें होतें. सायंदेवासारखे कांहीं सत्प्रवृत्त ब्राह्मण यवनसेवेंत कसे कुचंबून गेले होते, याचीहि त्यांना यथार्थ जाणीव होती.

गाणगापूर येथील श्रीगुरूंच्या महिमाची वार्ता ऐकून सायंदेव जेव्हां आपल्या दोन मुलांसह त्यांच्या दर्शनासाठीं आला, तेव्हां ते त्याला म्हणाले :

**श्रीगुरु म्हणती द्विजासी। तुझ्या ज्येष्ठ सुतासी।**
**आयुष्य होईल पूर्णायुषी। संतति याची बहुवस॥**
**हाचि भक्त आम्हांसी। असेल श्रियायुक्तेंसीं।**
**तुवां आतां म्लेंछासी। सेवा वंदन न करावें॥**
**आणिक तूतें असे नारी। पुत्र होतील तीतें चारी।**
**नांदतील श्रियाकरीं। तुवां सुखें असावें॥**
**जया दिवसीं म्लेंछासी। तुवां जाऊनि वंदिसी।**
**हानि असे जीवासी। म्हणोनि सांगती तये वेळीं॥** [३२]

श्रीगुरूंचा उपदेश सायंदेवानें शिरीं धारण केला आणि तो श्रीगुरूंच्या सन्निधानीं राहूं लागला. त्याचा ज्येष्ठ पुत्र नागनाथ हाहि श्रीगुरूंचा अनन्यभक्त बनला. त्यानंतर श्वेतकुष्ठानें पीडलेला, तुळजाभवानीच्या द्वारीं धरणें धरलेला नंदी ब्राह्मण ( कवीश्वर बसवरस ) आणि हिप्परगीच्या कल्लेश्वराचा भक्त नरहरि कवीश्वर हे दोघे श्रीगुरुकृपासंपन्न बनून त्यांच्या सेवेंत येऊन राहिले. उतारवयांत कुष्ठविकारानें ग्रासलेली श्रीगुरूंची बहीण रत्नाबाई हीहि कारंजाहून गाणगापुरीं आली आणि त्यांच्या आदेशानुसार पापविनाशी तीर्थावर जाऊन शारीरिक व मानसिक व्यथांतून मुक्त झाली.

---

३२. गुरुचरित्र, ४१·४३-४६.

श्रीगुरूंच्या जीवनकाळांत सहा बहामनी सुलतान झाले, हें मागें सांगितलेंच आहे. सायंदेवाच्या मनांत ज्याच्याविषयीं भय निर्माण झालें होतें आणि जो ब्राह्मणांची प्रज्ञा विकत घेऊन हिंदुधर्माची नालस्ती करीत होता, तो बेदरचा यवन राजा म्हणजे अहंमदशहा १ ला. त्याची कारकीर्द २४ सप्टेंबर १४२२ ते २७ फेब्रुवारी १४३५ या काळांत होती. हा क्रूर, ब्रह्मद्वेषी आणि जीवहिंसक राजा इ. स. १४३५ (श. १३५७) मध्यें मृत्यु पावल्यावर त्याचा मुलगा अल्लाउद्दीन २ रा हा बेदरच्या गादीवर आला. हा खांदे-पालट श्रीगुरु गाणगापूरला आल्यानंतर पहिल्या वर्षींच घडला असावा. हा अल्लाउद्दीन वृत्तीनें सहिष्णु, उदार आणि सत्त्वसंपन्न होता. हिंदूंच्या धर्मकल्पनांविषयीं, देवतांविषयीं अनादराची भावना त्याच्या मनांत नव्हती. गुरुचरित्रकारांच्या श्रद्धेनुसार हा यवन राजा म्हणजे श्रीपाद श्रीवल्लभांनीं वर दिलेला पूर्वजन्मींचा रजक होय.

अहंमदशहाच्या आसुरी लीलांचा प्रत्यक्षानुभव श्रीगुरूंनीं घेतला होता. त्याच्या काळांत महाराष्ट्रांत सर्वत्र, विशेषतः गोदा-कृष्णेच्या मधल्या भागांत, सूफींचा धर्मप्रचार वेगानें चालू होता, हेंहि श्रीगुरूंनीं उघड्या डोळ्यांनीं पाहिलें होतें. त्यांचा निवास एके काळच्या सुलतानी राजधानीच्या जवळच होता : इ. स. १४३२ पर्यंत बहामनी सुलतानांची राजधानी गुलबर्ग्यास होती आणि गाणगापूर व गुलबर्गा यांतील अंतर केवळ चार योजनांचें होतें. या वातावरणांत श्रीगुरूंच्या जागृत विचारांचा आवेग कोणत्या दिशेनें वाहत असेल, याची कल्पना करणें कठीण नाहीं. त्यांनीं स्वतः आपल्या अनेक शिष्यांना यवनांकित भूमींत राहूनहि निर्भय जिणें जगण्याची ज्वलन्त प्रेरणा दिली होती.

अल्लाउद्दीनाच्या अंतकाळीं त्याचा आणि श्रीगुरूंचा संबंध आला, अशी गुरुचरित्रकारांची माहिती आहे. परंतु माझी अशी कल्पना आहे कीं, अहंमदशहाच्या कारकीर्दींत श्रीगुरूंच्या विद्रोही व्यक्तिमत्त्वाची आणि साधुत्वाची यवन शासकांना जी जाणीव झाली होती, त्या जाणिवेंतच अल्लाउद्दीनाच्या सहिष्णु पिंडाच्या विकासाचें बीज असावें. अहंमदशहाची अप्रिय कारकीर्द संपून, जेव्हां अल्लाउद्दीनाची कारकीर्द सुरू झाली, तेव्हां समाजांतल्या जाणत्या माणसांत निर्माण झालेल्या नव्या जाणिवेचें दर्शन

त्याला झालें असणार आणि त्यानंतर लौकरच त्याचे आणि श्रीगुरूंचे संबंध प्रस्थापित झाले असणार. अल्लाउद्दीनाच्या सहिष्णु व उदार वृत्तीचें अत्यंत वैषम्य त्याच्या दरबारांतील यवन पुरोहितांना वाटत असे :

त्याचे घरचे पुरोहित । तया रायासी शिकवीत ।
आपण होऊन म्लेंछयात । देवद्विजां निंदावें ॥
त्यांतें तुम्ही सेवा करितां । त्याणें अपार दोष प्राप्त ।
यातिधर्म करणें मुख्यता । पुण्य अपार असे जाणा ॥
मंदमति द्विजयाती । देखा पाषाणपूजा करिती ।
समस्तांतें देव म्हणती । काष्ठ वृक्ष पाषाणासी ॥
धेनूसी म्हणती देव । म्हणती देव अग्नि सूर्य ।
तीर्थयात्रा नदी तोय । समस्तां देव म्हणती देखा ।
ऐसे विप्र मंदमती । निराकारा साकार म्हणती ।
त्यांते म्लेंछ जे भजती । अधोगति पावती ते ॥[33]

काझींच्या या उपदेशावर राजाची प्रतिक्रिया अत्यंत तीव्र असे. त्याचें हृदय एखाद्या हिंदु साधकासारखें विश्वाकार अनुभवावर आणि त्यासाठीं प्रतीकाच्या अपरिहार्यतेवर दृढ श्रद्धा बाळगणारें होतें :

राजा म्हणे पुरोहितांसी । तुम्ही निरोपिलें आम्हांसी ।
अणुरेणु तृण काष्ठेंसीं । सर्वेश्वर पूर्ण असे ॥
दीप असतां एक घरीं । लाविती वाती सहस्र जरी ।
समस्त होती दीपापरी । भिन्न भाव कोठें असे ॥
तैशा याति नानापरी । असती जाणा वसुंधरीं ।
समस्तांसी एकचि हरि । भिन्न भाव करूं नये ॥
स्थिर नव्हे अंतःकरण । म्हणोनि करिती प्रतिमा खूण ।
नाम ठेवोनि नारायण । तया नामें पूजिताती ॥
त्यांतें तुम्ही निंदा करितां । तरी सर्वांठायीं परिपूर्ण म्हणतां ।
प्रतिष्ठावया अपुल्या मता । द्वेष आम्हीं कां करावा ॥[34]

---

३३. गुरुचरित्र, ५०.७-११.

३४. गुरुचरित्र, ५०. १३, १९, २१, २४-२५.

बेदरच्या दरबारांत अशा चर्चा नित्य रंगत असत. परंतु दुर्दैवानें अल्लाउद्दीनाला एक जीवघेणा फोडाचा विकार जडला. त्या विकारानें त्याला जीवन असह्य झालें. अनेक औषधोपचार करूनहि गुण येईना. अखेर संबंधित विप्रांच्या उपदेशानुसार त्यानें सत्पुरुषांच्या अमृतदृष्टीचा शोध घ्यावयास प्रारंभ केला. श्रीगुरूंच्या कीर्तीचा बेदरपर्यंत केव्हांच पोंचलेला होता. अल्लाउद्दीन गाणगापुरीं आला आणि श्रीगुरूंची चौकशी करूं लागला. लोक स्वाभाविकच भयभीत झाले. त्या वेळीं श्रीगुरु नदी-तीरावर अनुष्ठानासाठीं गेलेले होते. त्यांना दुरून पाहतांच राजा शिबिकेंतून खालीं उतरला आणि विनीत भावानें त्यांना लोटांगणीं गेला. त्यानें आपली व्यथा श्रीगुरूंना निवेदन केली :

राजा म्हणे श्रीगुरूंसी । राजस्फोट आपणांसी ।
व्यथा होतसे प्रयासी । कृपादृष्टीनें पहावें ॥
ऐसें वचन ऐकोन । श्रीगुरु करिती हास्यवदन ।
स्फोटक नाहीं, दाखवीं म्हणोन । पुसताती यवनासी ॥
राजा पाहे स्फोटकासी । न दिसे स्फोटक अंगासरसी ।
विस्मय करीतसे मानसीं । पुनरपि चरणीं माथां ठेवी ॥ [३५]

श्रीगुरूंच्या अमृतदृष्टींत न्हालेला राजा अंतर्बाह्य निरामय होऊन त्यांच्या चरणीं लीन झाला आणि आपल्या राजधानीला भेट देण्याविषयीं त्यांना विनवूं लागला.

श्रीगुरु म्हणती तयासी । आम्ही तापसी संन्यासी ।
येऊं नये तुझे नगरासी । महापातकें होतीं तेथें ॥
नगरीं नित्य धेनुहत्या । यवनयाति तुम्ही सत्या ।
जीवहिंसा पापकृत्या । वर्जावें आतां निर्धारें ॥ [३६]

राजानें हें सर्व मान्य केलें आणि श्रीगुरूंना पालखींत बसवून तो पायीं चालूं लागला. ज्यांच्या ओझरत्या आलोकानें पाषाणांतून चैतन्याचे कळे फुलावे,

---

३५. गुरुचरित्र, ५०.१८६–१८८.
३६. गुरुचरित्र, ५०.१९२–१९३.

ज्यांच्या करस्पर्शानें लोहाचें सुवर्ण बनावें आणि ज्यांच्या कंठांतून उमलणाऱ्या शब्दांनीं दुरितांचें तिमिर दूर व्हावें, त्या श्रीगुरूंच्या आत्मवैभवापुढें त्याला आपलें राज्यवैभव फिकें वाटूं लागलें. कांहीं काळ त्याच्याबरोबर पालखींतून मार्गक्रमण केल्यावर श्रीगुरूंनीं त्याला निरोप देऊन पुढें पाठविलें आणि पापविनाशी तीर्थावर भेट घेण्यास सांगितलें. त्याप्रमाणें राजा पुढें गेला. श्रीगुरु मध्यंतरीं नागनाथाचें आतिथ्य स्वीकारून पापविनाशी तीर्थावर राजाला भेटले. राजानें अत्यंत थाटामाटानें आणि आदरसत्कारानें त्यांना वेदूर नगरींत नेलें. हें दृश्य पाहून यवन आणि हिंदु समाजांत परस्परविरुद्ध पडसाद कसे उमटले, त्याचें वर्णन गुरुचरित्रकारांनीं असें केलें आहे :

लोक म्हणती म्लेंछयाती। पहा हो विप्रपूजा करिती।
राजा अनाचारी म्हणती। जातिधर्म सांडिला आजि॥
ज्याचें पाहूं नये मुख। त्याची सेवा करितो हरिखें।
राजा नष्ट म्हणोनि सकळिक। म्लेंछयाती बोलती॥
विप्रकुळ समस्त देखा। संतोष करिती अति हरुषा।
राजा झाला विप्रसेवक। आतां बरवें राज्यासी॥
ऐसा राजा असतां बरवें। ज्ञानवंत असे स्वभावें।
ब्रह्मद्वेषी नव्हे पहा वो। पुण्यश्लोक म्हणती तयासी॥ [३७]

आपल्या दर्शनानें संमिश्र पौर जनांच्या डोळ्यांत अशा प्रकारें सुख-दुःखांचा गुलाल उधळीत आणि रेशमी पायघड्यांवर पावलें टाकीत श्रीगुरु राजगृहांत प्रविष्ट झाले. तेथें त्यांना सिंहासनावर बसवून राजानें त्यांची पूजा केली आणि राजगृहांतील सर्व परिवार व स्थावर-जंगम त्यांच्या अमृत-दृष्टींत भिजवून टाकलें. हें सर्व करीत असतांना राजाचें हृदय गुरुभक्तीनें ओतप्रोत होऊन गेलें होतें. त्यांच्या चरणांच्या वियोगाची कल्पनाहि त्याला असह्य झाली. त्यानें त्यांच्याजवळ नित्य चरणसेवेची याचना केली.

ऐसे ऐकोनि श्रीगुरु म्हणती। आमुची भेटी श्रीपर्वतीं।
तुझे पुत्र राज्य करिती। तुवां यावें भेटीसी॥ [३८]

---

३७. गुरुचरित्र, ५०.२२२-२२५.
३८. गुरुचरित्र, ५०.२४९.

असें सांगून त्यांनीं राजाचा निरोप घेतला आणि पूर्वनियोजनानुसार ते सिंहस्थ यात्रेसाठीं ( ईश्वरनाम संवत्सर, श. १३७९ ) नाशिक-त्र्यंबकेश्वरास गेले. या स्थानाला त्यांची ही दुसरी भेट. उत्तर-यात्रेहून परत आल्यावर आणि मातापित्यांची भेट घेतल्यावर श. १३४० च्या सुमारास ते नाशिक-त्र्यंबकेश्वरीं गेले होते. परंतु या वेळची त्यांची मनःस्थिति वेगळी होती. या वेळीं ब्रह्मगिरीच्या रूपानें उभा असलेल्या नीलकण्ठ शिवाकडे पाहून त्यांच्या हृदयांत हालाहल-प्राशनाचा प्रसंग तरंगून गेला असेल—गौतमीच्या कांठीं शिवाला प्रसन्न करून आत्मज्ञ बनलेल्या आदिगुरु दत्तात्रेयाचें रूपहि त्यांच्या तनामनांत संचारलें असेल ! त्यांनीं शिवाला मनोभावें वंदन केलें आणि श्रीशैलाची वाट धरली.

## अमृताची पाऊलवाट :

ते अखेरचा निरोप घेण्यासाठीं गाणगापुरीं आले. त्यांच्या दर्शनानें सर्वांना आनंद झाला. परंतु लोकांच्या आनंदावर लगेच विरजण पडलें :

**कठिण दिवस युगधर्म । म्लेंछराज्य क्रूर कर्म ।**
**प्रगट असतां घडे अधर्म । समस्त म्लेंछ येथें येती ॥**
**राजा आला म्हणोनि । ऐकिलें जातीं यवनीं ।**
**सकळ येतील मनकामनी । म्हणौनि गौप्य राहों आतां ॥**
**पुढें येतील दुर्दिन । कारण राज्य यवन ।**
**समस्त येतील करावया भजन । म्हणोनि गौप्य राहों आतां ॥**
**लौकिकार्थ दाखवावयासी । निघाले आपण श्रीशैल्यासी ।**
**कथा असे अतिविशेषीं । सिद्ध म्हणे नामधारका ॥** [३९]

असें कारण सांगून ते शिष्यांसह श्रीशैलाकडे निघाले. चिरवियोगाच्या कल्पनेनें भक्तगणांची हृदयें विव्हल झालीं. श्रीगुरूंच्या रूपानें जणुं त्यांचे प्राणच त्यांना सोडून निघाले होते. श्रीगुरूंनीं त्यांचें सांत्वन केलें. या भूमीच्या पावलोपावलीं माझें अस्तित्व तुम्हांला जाणवेल, असें त्यांनीं सांगितलें. या कृष्णेच्या कांठीं, या तरुवेलींच्या गडद छायेंत, या नगरवासीयांच्या हृदयांत

३९. गुरुचरित्र ५०.२५८-२५९, २६१.

मी निरंतर नांदत राहील, असें त्यांनीं आश्वासन दिलें. परंतु सगुण साकाराचा लोप सहन करून निर्गुण निराकाराची कास धरणें त्या सामान्य जनांना कसें शक्य होतें? अखेर त्या सर्व गाणगापूरवासीयांच्या अश्रुसिक्त मुखांकडे एकदां कृपार्णवदृष्टीनें पाहून श्रीगुरूंनीं श्रीशैलाची वाट धरली.

इष्ट स्थळीं पोंचल्यावर ते सर्व पाताळगंगेच्या तीरावर उभे राहिले. पलीकडे मल्लिकार्जुन जणुं त्यांना निमंत्रण देत उभा होता. त्यांनीं शिष्यांना पुष्पासन करण्यास सांगितलें. कर्दळीच्या पानांवर शेवंतीचें नि कमळांचें आसन तयार झालें. आणि तो अमृताचा पुत्र कुसुमांच्या कोंवळ्या आसनावर बसून पाताळगंगेच्या तरंगांवर तरंगत पैलतीराकडे जाऊं लागला. तें चिरपरिचित तेजोमय रूप हळूहळू धूसर दिसूं लागलें आणि कांहीं क्षणांनंतर प्रकाशाच्या असीम अर्णवांत लुप्त झालें. शिवाचा महान् उपासक शिवस्वरूपांत एकाकार झाला. अमृताची पाऊलवाट पाताळगंगेनें लाटांच्या हातांनीं उरीं सांठवली.

> कन्यागतीं बृहस्पतीसी । बहुधान्य नाम संवत्सरेसी ।
> सूर्य चाले उत्तर दिगंतेसी । संक्रांति कुंभ परियेसा ॥
> शिशिर ऋतु माघमासीं । असित पक्ष प्रतिपदेसी ।
> शुक्रवारीं पुण्य दिवशीं । श्रीगुरु बैसले निजानंदीं ॥[४०]

ऐलतीरावर सिद्ध सरस्वती, सायंदेव, नंदी कवीश्वर आणि नरहरि कवीश्वर असे चौघे जण जडावलेल्या हृदयांना सांभाळीत उभे होते. थोड्या वेळानें गुरुचरणांचा अंतिम स्पर्श लाभलेलीं तीं शेवंतीचीं फुलें ऐलतीराला वाहत आलीं. तोच श्रीगुरूंचा अंतिम प्रसाद—आणि 'संगीतानें आपलें स्मरण करीत जावें' हा त्यांचा अखेरचा सांगावा. जणुं हृदय फुलासारखें कोंवळें असावें आणि त्यांतून विश्वात्मक भावनेचें संगीत ओसंडत रहावें, असेंच त्यांना सुचवायचें होतें!

## श्रीनरसिंह सरस्वतींचें व्यक्तिमत्त्व आणि कार्य :

आतांपर्यंत संक्षेपानें पाहिलेल्या श्रीगुरूंच्या अवतार-चरित्रावरून त्यांच्या महनीय व्यक्तिमत्त्वाची कल्पना येईल. वयाच्या नवव्या-दहाव्या वर्षीं त्यांनीं

४०. गुरुचरित्र, ५१:३६–३७.

विरागी वृत्तीनें केलेला गृहत्याग, त्यांचें अल्पवयांतील संन्यास-ग्रहण, आपल्या प्रज्ञेनें आणि तपानें त्यांनीं बोधिलेले शिष्यांचे समूह, तीन तपांएवढा प्रदीर्घ काळ त्यांनीं केलेलें भ्रमण, त्या भ्रमणकाळांतील त्यांची जागृत समाजहितैषी दृष्टि या सर्वच गोष्टी त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें महनीयत्व सिद्ध करणाऱ्या आहेत.

श. १३४० पर्यंत त्यांनीं उत्तर भारतांत यात्रा केली आणि त्यानंतर ते महाराष्ट्रांत आले. श. १३४० पासून श. १३८० पर्यंत सतत ४० वर्षे त्यांनीं जागरूकपणें मराठी समाजाच्या हिताचें संरक्षण करण्याचा प्रयत्न केला. उत्तर भारतांतील यात्रेच्या वेळीं त्यांना मुसलमानांच्या सार्वत्रिक पकडीचें आणि विनाशक आक्रमणाचें भयंकर दर्शन झालेंच होतें. या दर्शनानंतर जेव्हां ते दक्षिणेंत परत आले, तेव्हां त्यांना दक्षिणहि त्याच संकटांत लोटली जात असल्याचें खेदजनक दृश्य दिसलें. त्यांच्या गुरुपरंपरेंतील एका महापुरुषानें जोपासलेलें विजयनगरचें राज्य दक्षिणेंत नांदत होतें, तरी त्या राज्याच्या सिंहासनावर यावनी शस्त्रांचे आघात सतत होतच होते. महाराष्ट्रांतील धर्म, संकृति, भाषा आणि एकंदरींत सर्व समाज-जीवनच धोक्यांत आलें आहे, असें दृश्य त्यांना दिसलें. समाजाचें गुरुत्व ज्या वर्णाकडे आहे, त्या ब्राह्मणवर्गांतील लोकांनींच स्वधर्मच्युति पत्करून, केवळ उदरपूर्तीसाठीं वा चर्मसंरक्षणासाठीं यवनाची सेवा पत्करल्याचें संतापकारी दृश्य दिसून आलें. ज्यांच्या हातीं धर्माचें संरक्षण आणि भरणपोषण करण्याचें उत्तरदायित्व होतें, त्यांचेंच हें घोर अधःपतन पाहून श्रीगुरु व्यथित झाले. जे ब्राह्मण यवनसेवेंत नव्हते, त्यांनाहि प्राप्त परिस्थितीची यथार्थ जाणीव नव्हती. हृदयधर्माला नित्य पायांखालीं ठोकरून केवळ शब्दपांडित्य मिरवारे अनेक पंडित दंभाची नि वृथाभिमानाची जपणूक करीत अज्ञानी समाजालाच नाडीत होते. ही सर्व परिस्थिति शोचनीय होती. परंतु केवळ शोक प्रदर्शित करूनहि उपयोग नव्हता. राज्यसत्ता यवनाच्या हातीं असल्यामुळें समाजाच्या सर्वच नाडया आंखडल्या जात होत्या. यावर उपाय एकच होता : समाजांत ज्यांच्या शब्दाला किंमत आहे, समाजपरिवर्तनाची नि मूल्यसंरक्षणाची शक्ति ज्यांच्या मेंदूंत आहे, ज्यांच्याकडे समाजाचें गुरुत्व शतकानुशतकें चालत आलें आहे, त्या ब्राह्मणांना स्वकर्तव्याची जाणीव करून देणें; त्यांची भीरुता, दंभ आणि वृथाभिमान दूर करून त्यांना धर्म-

संरक्षणासाठीं निर्भय बनविण्याचा आणि अज्ञानी समाजाकडे सहानुभवानें, आत्मीयतेनें पहावयास लावण्याचा मोठा प्रयत्न श्रीगुरूंनीं केला. त्याचमुळें त्यांच्या उपदेशांत ब्राह्मणांना प्राधान्य आहे. ब्राह्मणवर्णाच्या अधःपतनाविषयीं त्यांनीं कठोर निषेध व्यक्त केला आहे आणि ब्राह्मणांना शुद्धाचरणाची नि हृदयधर्माची जाणीव दिली आहे :

ब्राह्मणपणाचा आचार । कवण राहाटे द्विजवर ।
तैसे जरी करिती नर । त्यांसी कैचें दैन्य असे ॥
समस्त देव त्यांचे हातीं । अष्ट सिद्ध साधती ।
ब्राह्मण कर्मे जे आचरती । कामधेनु तया घरीं ॥
विप्र मदें बहु व्यापिले । आचार कर्म सांडिले ।
याचि कारण दरिद्री झाले । स्वधर्म नष्ट होऊनिया ॥ [४१]

श्रीगुरूंच्या या दृष्टिकोनाचें आणि कार्याचें साम्य सतराव्या शतकांत होऊन गेलेल्या समर्थ रामदासांशीं विशेषत्वानें दिसून येतें. दोघेहि बालविरागी; दोघांनींहि माता-पित्यांच्या अनुरोधाचा विचार न करतां बालपणींच गृहत्याग केला; दोघांनींहि कठोर अनुष्ठानें आणि प्रदीर्घ तीर्थभ्रमणें केलीं; दोघांच्याहि हृदयावर या भ्रमणकाळांतील समाजदर्शनाचें प्रतिबिंब एकसारखेंच उमटलें आणि त्याची प्रतिक्रियाहि दोघांकडून एकसारखीच घडली.[४२] फरक एवढाच कीं, समर्थांना आपल्या विचारांच्या कार्यवाहीसाठीं, आपल्या संकल्पांच्या परिपूर्तीसाठीं एक महान् क्षत्रिय लाभला आणि श्रीगुरूंना त्या बाबतींत कुणाहि स्वधर्मीय क्षत्रियाची साथ मिळाली नाहीं. परंतु अशाहि प्रतिकूल अवस्थेंत त्यांनीं यवन बादशहालाच प्रभावित करून त्याला ‘ महाराष्ट्रधर्मीं वर्तावयास ’ लाविलें, हें त्यांचें अनन्यसाधारण कार्य आहे. समर्थ या बाबतींत भाग्यशाली ठरले, याचें कारण श्रीगुरूंच्या काळापासून या दिशेनें झालेल्या उन्नयनाच्या प्रयत्नांत आहे. म्हणूनच असें विधान करावेंसें वाटतें कीं, श्रीगुरु हे समर्थांचे पूर्वावतार होते—सतराव्या शतकांत मराठी भूमींत उदयास आलेल्या स्वातंत्र्ययुगाचे ते एक महान् अग्रदूत होते.

---

४१. गुरुचरित्र, ३६.१०४–१०६.

४२. दोघांनाहि ‘ गायनी कळे ’विषयीं प्रीति होती, हा एक विशेष योगायोग आहे.

श्रीगुरूंच्या हृदयांत दुःखित आणि पीडित जनांविषयीं असीम करुणा नांदत होती. सर्वसाधारणांच्या दुःखांशीं आणि व्यथांशीं ते समरस होत आणि त्या व्यथा दूर करण्याचा प्रयत्न ते करीत. दांभिकतेविषयीं त्यांना अत्यंत घृणा होती. ज्या ज्ञानाला हृदयधर्माची जोड नाहीं, तें त्यांना व्यर्थ वाटे. पांडित्य-प्रदर्शनापासून ते संपूर्ण अलिप्त होते. भोंवतीं शिष्यांची मांदियाळी जमवावी आणि गुरुबाजीचें सोंग मिरवावें, हें तर त्यांना मुळींच रुचत नव्हतें. त्यांना जरी एकान्त-चिन्तनाची गोडी होती, तरी लोकांविषयीं त्यांनीं कधीं औदासीन्य व्यक्त केलें नाहीं. एकान्त आणि लोकान्त एकाच वेळीं साधण्याची अपूर्व किमया त्यांच्या व्यक्तिमत्त्वांत वसत होती. ते एक कर्मयोगी संन्यासी होते. स्वतः संन्यस्त बनूनहि त्यांनीं लोकांना जीवनांतून उठण्याचा, विजनवास पत्करण्याचा उपदेश केला नाहीं. स्वतः प्रपंचावर लाथ मारून अनेकांचे प्रपंच 'नेटके' बनविणाऱ्या समर्थांचेच ते पूर्वावतार होत, हें याहि बाबतींत खरें आहे. वर्णाश्रमाचे ते अभिमानी होते. आणि वर्णाश्रमोचित कर्तव्यांचें प्रामाणिक परिपालन केल्यानें जीवनसाफल्याची प्राप्ति निश्चितपणें होईल, हें त्यांनीं लोकांना पटविण्याचा प्रयत्न केला.

सारांश, ज्या काळांत या महाराष्ट्रभूमीची वाटचाल घनांधकारांतून चालू होती, त्या काळांत श्रीनरसिंह सरस्वतींचें जीवनकार्य पथप्रदर्शक प्रखर ज्योती-सारखें कल्याणकारी ठरलें. अत्यंत संकटकाळांत महाराष्ट्रभूमीला मुक्तीचा मार्ग दाखविणारा हा महापुरुष मराठी संस्कृतीच्या इतिहासांत 'युगपुरुष' म्हणून चिरन्तन राहील.

**श्रीनरसिंह सरस्वतींचा कालनिर्णय :**

श्रीनरसिंह सरस्वतींच्या कालनिर्णयाचीं साधनें दोन आहेत : एक त्यांचा निजानंदगमन-काल आणि दुसरें त्यांच्याशीं संबंध असलेल्या यवन राजाचा राज्यकाल. गुरुचरित्राच्या अखेरीस त्यांच्या निजानंद-गमनाचा जो काल-निर्देश आला आहे, तो असा :

**कन्यागतीं बृहस्पतीसी । बहुधान्य नाम संवत्सरेसी ।**
**सूर्य चाले उत्तर दिगंतेसी । संक्रांति कुंभ परियेसा ॥**
**शिशिर ऋतु माघमासीं । असित पक्ष प्रतिपदेसी ।**
**शुक्रवारीं पुण्य दिवशीं । श्रीगुरु बैसले निजानंदीं ॥**



गुरुचरित्रांत उल्लेखिलेलीं
महत्वाचीं स्थळें
बद्रीकेदार
प्रयाग
काशी
नाशिक
पांचाळेश्वर
कारंजा
माहूर
त्र्यंबकेश्वर
जगन्नाथपुरी
वासरब्रह्मेश्वर
आंबेजोगाई
गोदावरी
बेदर
औदुंबर
गाणगापूर
पीठापूर
नरसोबाचीवाडी
कुरगुड्डी
कृष्णा
श्रीशैल
गोकर्ण-
महाबळेश्वर
अ-र-बी
स-मु-द्र
बं-गा-ल-चा
उ-प-सा-ग-र
हिं-दी-म-हा-सा-ग-र
लंका

यांत शकाचा उल्लेख नाहीं. परंतु इतर सर्व खुलाशावरून हा योग श. १३८० मध्यें येतो, असें ज्योतिर्गणितज्ञांनीं ठरविलें आहे.[43] ज्याचा फोड श्रीगुरूंनीं बरा केल्याची कथा गुरुचरित्रांत आहे, तो बेदरचा यवन राजा म्हणजे अल्लाउद्दीन २ रा हा होय. हा पायावर व्रण होऊन मेला, असें वृत्त फेरिस्त्यानें आपल्या प्रवास-ग्रंथांत नोंदविलें आहे. या यवन राजाचा राज्य-काल २७ फेब्रुवारी १४३५ ते १३ फेब्रुवारी १४५८ असा आहे. श. १३८० हा श्रीगुरूंच्या निजानंदगमनाचा शक खरा मानल्यास त्यांच्या निर्याणाची इंग्रजी तारीख गणितानें १९ जानेवारी १४५९ ही येते, असें श्री. त्र्यं. ब. अभ्यंकरशास्त्री यांनीं निश्चित केलें आहे. अर्थात् यावरून हें दिसून येईल की, श. १३८० हाच श्रीगुरूंचा निजानंदाचा काल होय. त्यांच्या गाणगापूर-निवासाच्या कालांत जो दुष्काळ पडला होता (गु. च. अ. ४८) त्या दुष्काळाचें वर्ष, करंदीकर गणिताप्रमाणें, श. १४५६-५७ असें ठरतें.

श्री. अप्रबुद्धांना हें मत मान्य नाहीं. त्यांना असें वाटतें कीं, "श्रीगुरूंचा जन्म श. १३८० बहुधान्य संवत्सरीं कुंभ राशीस चंद्र असतां ( शाळिग्राम जन्मनांव ) झाला. त्यानंतर साठ वर्षें अवतारलीला करून श. १४४० त श्रीशैल्यावर बहुधान्य संवत्सरीं ते गुप्त झाले."[44] या मतानुसार श्रीगुरूंशीं संबंधित यवन राजा हा बेदरच्या बहामनी घराण्यांतील अल्लाउद्दीन २ रा नसून विजापूरच्या आदिलशाहींतील युसुफ आदिलशहा हा असावा. विजापूरच्या पडकोटांत बादशहानें नित्यदर्शनासाठीं बांधलेलें श्रीगुरुपादुका-मंदिर आणि नरसोबाच्या वाडीस आदिलशाहींतून इनाम मिळालेलीं औरवाड व गौरवाड हीं दोन गांवें या बाबी या संदर्भात पुढें केल्या जातात. परंतु यवन राजाला झालेल्या व्रणाचें दुखणें येथें विचारांत घेतलेलें नाहीं. आदिल-शाहींतील कुणाहि सुलतानाला असें दुखणें झाल्याची नोंद नाहीं. उलट बेदरच्या दुसऱ्या अल्लाउद्दीनाविषयीं तशी निर्णायक नोंद फेरिस्त्यानें केलेली आहे. शिवाय श. १३८० हा श्रीगुरूंचा निजानंदगमनशक एका जुन्या

---

४३. भा.इ.सं.मं.त्रै., वर्ष ९-अ. २, श्री. ज. स. करंदीकरांचा लेख : 'गुरुचरित्रांतील ऐतिहासिक माहिती', पृ. ६-१६ ; महाराष्ट्रमहोदयाचा पूर्वरंग : ना. कृ. गद्रे, पृ. ६८.

४४. गुरुचरित्र, पुरस्कार, पृ. ६८.

बाडांत नोंदविलेला असून वाडीच्या परंपरेंत हाच शक गृहीत धरलेला आहे. गुरुचरित्रांत यवन राजाच्या राजधानीचें नांव 'वैदूरनगरी' असें आहे. 'वैदूर' हें संस्कृतीकरण 'बेदर'चेंच संभवतें–विजापूरचें खास नव्हे. जर तो राजा बेदरचाच आहे, तर विजापूरच्या आदिलशाहींत त्याचा शोध करण्याचा प्रश्न उरतोच कुठें ! गुरुचरित्रांत ज्या 'चहूं राष्ट्रां' चा उल्लेख वारंवार येतो, त्यालाहि बेदरच्या राज्यांतच अर्थ आहे. बेदरच्या बहामनी राज्याच्या चार तर्फा पाडलेल्या होत्या, हें इतिहासज्ञांस चांगलें ठाऊक आहे.

सारांश, सर्व बाजूंनीं विचार करतां श. १३८० हाच श्रीगुरूंचा निजानंदगमनकाल संभवतो. परंतु हा झाला त्यांच्या अवतार-चरित्राचा अंतिम बिंदु. आजवर अनेकांनीं त्यांचा अवतारकाल ५० वर्षांचा मानून त्याचा प्रारंभबिंदु श.१३३० असा ठरविला आहे.[४५] हा ५० वर्षांचा अवतार-काल कसा ठरविला गेला कुणास ठाऊक ! प्रत्यक्ष गुरुचरित्राची साक्ष मात्र या गणनेला अनुकूल नाहीं. गुरुचरित्रांत कालगणनेला उपयोगी ठरणाऱ्या उल्लेखांवरून आपण श्रीगुरूंच्या अवतार-कालाचा प्रारंभबिंदु निश्चित करतां येतो काय, तें पाहूं.

१. **सातव्या वर्षी** त्यांची मुंज झाली.

२. मुंजीच्या वेळींच घराबाहेर पडण्याची अनुज्ञा मागितली; परंतु आईच्या इच्छेसाठीं आणखी **एक वर्ष** घरींच राहिले.

३. जातांना, '**तीस वर्षांनीं** पुन्हा भेट होईल' असें सांगून गेले.

४. उत्तर-यात्रेहून परतल्यावर घरच्या लोकांना भेटून नाशिक-त्र्यंबकेश्वरला गेले आणि गौतमीतटाकयात्रा करीत करीत वासर ब्रह्मेश्वरला आले. आपण या प्रवासाचा कालावधि **एक वर्षाचा** धरूं.

५. वासर ब्रह्मेश्वर येथें सायंदेवाचा निरोप घेतांना '**पंधरा वर्षांनीं** तुझ्या गांवाजवळ (गाणगापूरला) रहावयास येणार आहे' असें आश्वासन दिलें. या पंधरा वर्षांतील **एक वर्ष** परळी वैजनाथ येथें, **चार महिने** औदुंबर येथें आणि **बारा वर्षें** वाडी येथें काढलीं. **वर्ष-दीड वर्षांचा काळ** स्थलान्तरांसाठीं लागला असणार.

---

४५. महाराष्ट्रमहोदयाचा पूर्वरंग, पृ. ६८; म. म. पोतदार गौरव ग्रंथ : श्री. प्र. ह. खाडिलकर यांचा लेख : 'नरसिंह सरस्वती : काल आणि कार्य', पृ. १००–१०८.

६. वाडीहून गाणगापूरला गेल्यावर तेथें **तेवीस** वर्षांइतका प्रदीर्घ काळ श्रीगुरूंनीं काढला असावा, असें मानण्यास सबळ पुरावा आहे. वासर ब्रह्मेश्वर येथील सायंदेवास छळणारा यवन राजा आणि नंतर वादजयार्थ मदोन्मत्त ब्राह्मण पंडितांना देशभर हिंडण्यास प्रेरणा देणारा यवन राजा एकच होय. श्रीगुरूंच्या म्हणण्याप्रमाणें वासर ब्रह्मेश्वर सोडल्यापासून गाणगापूरला येईपर्यंतचा काळ पंधरा वर्षांचा आहे. पंधरा वर्षें हा आंकडा आपण अंदाजानेंच मानावयास हवा. यवनप्रेरित मदोन्मत्त पंडितांच्या पराभवाची घटना गाणगापुरीं श्रीगुरु आल्यानंतर घडलेली आहे आणि त्यानंतरच्या काळांत सांयदेवाची नि त्यांची गांठ पडून त्यांनीं त्यास यवन-सेवेंतून दूर होण्यास सांगितलें आहे. सायंदेव ज्या यवन राजाच्या सेवेंत होता, तो अहंमदशहा १ ला २४ सप्टेंबर १४२२ ते २७ फेब्रुवारी १४३५ या काळांत राज्यावर होता. हिंदूंना अनुकूल असलेला आणि शेवटीं श्रीगुरूंचा भक्त बनलेला अल्लाउद्दीन २ रा याचा राज्यकाळ २७ फेब्रुवारी १४३५ ते १३ फेब्रुवारी १४५८ असा २३ वर्षांचा आहे. अर्थात् मदोन्मत्त ब्राह्मणांविषयींची घटना या २३ वर्षांच्या काळाच्या अगोदर केव्हां तरी, अहंमदशहाच्या १३ वर्षांच्या कारकीर्दीच्या अगदीं अखेरीसच घडलेली असावी. म्हणजेच अहंमदशहाच्या कारकीर्दीच्या अखेरीस श्रीगुरु गाणगापुरीं आले आणि अल्लाउद्दीनाच्या मृत्यूनंतर सुमारें एक वर्षानें निजानंदीं विराम पावले.

वरील सर्व कालनिर्देशांचा एकत्र विचार करतां श्रीनरसिंह सरस्वती यांचा अवतार-काल पंचाहत्तर ते ऐशीं वर्षांचा असावा. शकाच्या भाषेंत सांगायचें तर माझ्या मतें त्यांचें चरित्र श. १३०० ते १३८० या काळांत घडलें असावें. बालपण आणि उत्तर-यात्रा मिळून ४० वर्षांचा काळ यांतून वजा करतां त्यांचें महाराष्ट्रांतील कार्य श. १३४० ते १३८० असें ४० वर्षांचें ठरतें. या अनुमानाला अनुसरून त्यांचा जीवन-पट पुढीलप्रमाणें चितारतां येईल :

श. १३०० : जन्म.

श. १३०७ : मौंजीबंधन.

श. १३०८ : गृहत्याग.

श. १३१० : संन्यास-ग्रहण.

श. १३३८ : पुनरागमन.

श. १३४० : गौतमी-तटाक-यात्रा.

श. १३४२ : परळी वैजनाथ येथें निवास.

श. १३४३ : औदुंबर येथें निवास.

श. १३४४–१३५६ : वाडी येथें निवास.

श. १३५७–१३८० : गाणगापूर येथें निवास.

श. १३८० : श्रीशैल येथें निजानंदगमन.

## श्रीनरसिंह सरस्वतींची गुरुपरंपरा :

गुरुचरित्राच्या बाराव्या अध्यायांत ( ओ. १०९–११६ ) श्रीगुरूंची गुरुपरंपरा दिलेला आहे, ती अशी :

( १ ) शंकर–विष्णु–ब्रह्मा–वसिष्ठ–पराशर–व्यास–शुक–गौडपादाचार्य –गोविंदाचार्य–शंकराचार्य–विश्वरूपाचार्य–ज्ञानबोधीगिरि–सिंहगिरि–ईश्वर-तीर्थ–नृसिंहतीर्थ–विद्यातीर्थ–शिवतीर्थ–भारतीतीर्थ–विद्यारण्य–विद्यातीर्थ–मळियानंद–देवतीर्थ सरस्वती–यादवेंद्र सरस्वती–कृष्ण सरस्वती–नरसिंह सरस्वती.

( २ ) श्रीनरसिंह सरस्वतींच्या परंपरेंतील अमृत नांवाच्या एका ग्रंथ-कारानें आपल्या 'स्वरूपनिर्णय'[४६] ग्रंथांत गुरुपरंपरा पुढीलप्रमाणें दिली आहे : उमापती–विष्णु–प्रजापति–वसिष्ठ–पराशर–व्यास–शुकदेव–गौडपाद –शंकराचार्य – विश्वाचार्य–बोधघनाचार्य– ज्ञानघन–ज्ञानोत्तम – ज्ञानगिरि–सिंहगिरि–ईश्वरतीर्थ–नृसिंहतीर्थ–विद्यातीर्थ सरस्वती–विद्यारण्य–विद्यातीर्थ सरस्वती-मलयानंद सरस्वती–देवसरस्वती–कृष्णसरस्वती–नृसिंह सरस्वती इ.

( ३ ) श्री. म. रा. बोडस यांनीं आपल्या शंकराचार्योवरील पुस्तकांत[४७] शृंगेरी मठाची परंपरा पुढीलप्रमाणें दिली आहे : शंकराचार्य–सुरेश्वराचार्य –नित्यबोधघन ऊर्फ सर्वज्ञात्ममुनि–ज्ञानघन–ज्ञानोत्तमशिवाचार्य–ज्ञानगिरि–सिंहगिरि–ईश्वरतीर्थ–नरसिंहतीर्थ–विद्यातीर्थ ऊर्फ विद्याशंकर–भारतीकृष्ण-तीर्थ–विद्यारण्य....इत्यादि. या परंपरेंतील पुढील नांवें शृंगेरीच्या आचार्य-पीठावरील पुरुषांचीं असल्यामुळें त्यांच्याशीं आपल्याला कर्तव्य नाहीं.

---

४६. रामदासी संशोधन, खं. २, पृ. २३२–२३३ ( बा. क्र. १०७१ ).

कारण श्रीगुरूंच्या परंपरेंत विद्यारण्यांनंतरचे पुरुष पीठाधिकारी नव्हते. श्री. बोडस यांनीं आजवर प्रसिद्ध झालेल्या चार अधिकृत याद्यांचा परामर्श घेऊनच सदर परंपरा नोंदविली आहे. त्यांनीं नोंदविलेल्या परंपरेच्या बाबतींत इतर याद्यांवरून कांहीं टीपाहि दिलेल्या आहेत : शंकराचार्यांचे शिष्य सुरेश्वराचार्य यांनाच एका यादींत विश्वरूपाचार्य म्हटलेलें आहे. विद्यातीर्थ ऊर्फ विद्याशंकर यांचें पूर्वाश्रमींचें नांव सर्वज्ञविष्णु असून तेच सायण-माधवांचे गुरु होत.

वरील तीन परंपरांपैकीं तिसऱ्या परंपरेशीं पहिल्या दोन परंपरा ताडून पहावयास हव्या. शंकरापासून शुकापर्यंतचीं पौराणिक नांवें तिसऱ्या परंपरेंत नोंदविलेलींच नाहींत; परंतु पहिल्या दोन परंपरांत तीं एकच आहेत. गौडपादाचार्य–गोविंदाचार्य–शंकराचार्य हा क्रम इतिहासानें सिद्ध झालेला असल्यामुळें दुसऱ्या परंपरेंत गोविंदाचार्यांचें नांव सुटलें आहे, हें उघड आहे. शंकराचार्यांनंतरची व्यक्ति तिन्ही परंपरांत अनुक्रमें विश्वरूपाचार्य, विश्वाचार्य, सुरेश्वराचार्य अशी आहे. सुरेश्वराचार्य म्हणजेच विश्वरूपाचार्य, हें वर सांगितलेंच आहे. म्हणजे दुसऱ्या परंपरेंतील किंचित् ‘रूपभेद’ वगळला तर हें नांव तिन्ही ठिकाणीं एकच आहे, असें दिसतें. विश्वरूपाचार्यांनंतर आणि सिंहगिरीपूर्वी गुरुचरित्रांत ज्ञानबोधीगिरी असें एकच नांव आहे. दुसऱ्या परंपरेंत बोधघनाचार्य, ज्ञानघन, ज्ञानोत्तम, ज्ञानगिरि अशीं चार नांवें आहेत आणि तीं कांहींशा रूपभेदानें तिसऱ्या परंपरेशीं जुळतीं आहेत. याचा अर्थ असा कीं, गुरुचरित्रकारांच्या माहितींतून यांतील तीन नांवें गळलीं आणि एकच नांव त्या तीन नांवांच्या संमिश्रणांतून तयार झालें. सिंहगिरींपासून विद्यातीर्थांपर्यंतचीं नांवें तिन्ही परंपरांत एकरूप आहेत. विद्यातीर्थांपासून विद्यारण्यांपर्यंत मध्यें शिवतीर्थ आणि भारतीतीर्थ हीं दोन नांवें गुरुचरित्र परंपरेंत आढळतात; तिसऱ्या परंपरेंत भारतीकृष्णतीर्थ हें एकच नांव आहे, तर दुसऱ्या परंपरेंत मधें एकहि नांव नाहीं. विद्यातीर्थांचेंच पर्यायनाम विद्याशंकर असल्यामुळें हें शिवतीर्थ नांव गुरुचरित्रकारांच्या माहितींत चुकीनें समाविष्ट झालें असावें. विद्यातीर्थांनंतर भारतीतीर्थ हे पीठावर आले, हें खरें असलें, तरी विद्यारण्य हेहि विद्यातीर्थांचेच शिष्य

४७. श्रीशंकराचार्य व त्यांचा संप्रदाय, पृ. ९१–९४.

होते. त्यामुळें पीठपरंपरेंत जरी विद्यातीर्थ–भारतीतीर्थ–विद्यारण्य असा क्रम बरोबर असला, तरी गुरुपरंपरेच्या दृष्टीनें विद्यातीर्थांनंतर विद्यारण्य हाच क्रम असावयास हवा. म्हणजे या बाबतींत दुसऱ्या परंपरेंतील क्रम बरोबर आहे. विद्यारण्यांनंतरच्या नांवांच्या बाबतींत तिसऱ्या परंपरेचा कांहींच उपयोग नाहीं. गुरुचरित्रांत असलेलें यादवेंद्र सरस्वती हें कृष्ण-सरस्वतींच्या गुरूचें नांव दुसऱ्या यादींत सुटलेलें आहे.

वरील चर्चेवरून श्रीनरसिंहसरस्वती यांची गुरुपरंपरा अशी मांडतां येईल : शंकर–विष्णु–ब्रह्मा–वसिष्ठ–पराशर–व्यास–शुक–गौडपादाचार्य–गोविंदाचार्य–शंकराचार्य–विश्वरूपाचार्य–नित्यबोधघनाचार्य–ज्ञानघनाचार्य–ज्ञानोत्तमाचार्य–ज्ञानगिरि–सिंहागिरि– ईश्वरतीर्थ – नृसिंहतीर्थ – विद्यातीर्थ–विद्यारण्य–विद्यातीर्थसरस्वती–मलयानंदसरस्वती–देवतीर्थसरस्वती–यादवेंद्र-सरस्वती–नृसिंहसरस्वती.

विद्यारण्यांचा काळ इ. स. १२९५–१३८६ (श. १२१७–१३०८) असा आहे. शृंगेरी पीठावर ते जीवनाच्या अखेरीस ( इ. स. १३८०–८६ ) सहा-सात वर्षें होते. याचा अर्थ असा कीं, श्रीनरसिंह सरस्वतींच्या जन्माच्या सुमारास विद्यारण्य शृंगेरी पीठावरील शंकराचार्य बनले होते आणि त्यांचें निर्याण ज्या सुमारास घडलें, त्या वेळीं श्रीनरसिंह सरस्वती संन्यस्त जीवनाच्या ओढीनें घराबाहेर पडले होते. हा योगागोग विशेष आहे : विद्यारण्यांच्या परंपरेंतील हा पुरुष विद्यारण्यांचीच जीवनप्रेरणा तेवती ठेवण्यासाठीं उदयास आला होता आणि एकाचा अस्त व दुसऱ्याचा उदय या घटना अखंडित क्रमानें घडून आल्या होत्या. विद्यारण्यांच्या संगीत-प्रियतेचा वारसाहि श्रीनरसिंह सरस्वतींनीं सांभाळला होता.[४८]

विद्यारण्यांनंतर मलयानंद सरस्वती–देवतीर्थ सरस्वती–यादवेंद्र सरस्वती–कृष्ण सरस्वती अशीं चार नांवें नरसिंह सरस्वतींच्या पूर्वीं येतात. हें कसें शक्य आहे अशी शंका, काळाचा विचार करतांना, मनांत डोकावते. परंतु गुरुपरंपरेंतील पिढयांचा विचार वंशपरंपरेंतील पिढ्यांप्रमाणें करून चालत नाहीं. दीक्षाग्रहण करणारा वयोवृद्ध असूं शकतो आणि दीक्षा देणारा पंधरा-वीस वर्षांचा कोंवळा मुलगाहि असूं शकतो. निवृत्तिनाथ आणि ज्ञानेश्वर या

---

४८. गुरुचरित्र, ५१. ४०–४१.

गुरुशिष्यांच्या वयांत केवळ दोन वर्षांचेंच अंतर होतें, तर ज्ञानेश्वरांच्या शिष्य-मालिकेंत त्यांना पित्याच्या जागीं शोभतील अशा वयाचीहि मंडळी होती. प्रत्यक्ष श्रीनरसिंह सरस्वतींनींहि अगदीं कोंवळ्या वयांत प्रयागच्या परिसरांत सात जणांना संन्यास-दीक्षा दिल्याची साक्ष गुरुचरित्रांतच आहे. सायंदेव आणि त्याचा पुत्र नागनाथ हे एकाच काळांत श्रीनरसिंह सरस्वतींचे शिष्य होते. कालदृष्ट्या विद्यारण्यांच्या कार्याचा आणि कर्तृत्वाचा वांटा श्रीनरसिंह सरस्वतींनींच सांभाळला, असें इतिहास सांगतो.

## श्रीनरसिंह सरस्वतींची शिष्य-परंपरा :

उत्तर-यात्रेच्या काळांतच श्रीगुरूंच्या भोंवतीं शिष्यांची मांदियाळी जमूं लागली होती. प्रयाग येथें माधव सरस्वती नामक शिष्य त्यांना लाभला. या माधव सरस्वतीच्या उल्लेखाच्या वेळींच गुरुचरित्रकारांनीं बाळ सरस्वती, कृष्ण सरस्वती, उपेंद्र सरस्वती, सदानंद सरस्वती, ज्ञानज्योति सरस्वती, सिद्ध सरस्वती असे आणखी सहा शिष्य नोंदविले आहेत. पहिल्या माधव सरस्वतीवर श्रीगुरूंची विशेष प्रीति होती, असें गुरुचरित्रकारांनीं म्हटलें आहे. परंतु परळी वैजनाथाच्या वाटेवर असतांना त्यांनीं सर्व शिष्यांना—एकट्या सिद्ध सरस्वतीला वगळून—तीर्थयात्रेला पाठविलें. सिद्ध सरस्वती त्यांच्या निजानंदगमनापर्यंत त्यांच्या निकट सन्निधानीं होता. शेवटीं पाताळगंगेच्या तीरावर उपस्थित असलेल्या चार शिष्यांत तो एकटाच संन्यस्त शिष्य होता. गुरुचरित्राचा निवेदक तोच आहे 'गुरुचरित्र' या ग्रंथाची मांडणी सिद्ध आणि नामधारक यांच्या संवादाच्या स्वरूपाची आहे. सिद्ध सरस्वतीनें स्वतः पाहिलेलें गुरु-चरित्र संस्कृत भाषेंत ग्रथित केलें असावें. नामधारकाच्या जिज्ञासा-पूर्तीसाठीं त्यानें आपण तयार केलेलें 'गुरुचरित्र' नामधारकास दाखविलें.[४९] परंतु नामधारक म्हणजे गुरुचरित्राचा लेखक सरस्वती गंगाधर होय, असें निश्चयानें म्हणण्यास गुरुचरित्रांत पुष्कळच आधार आहे. सरस्वती गंगाधर हा श्रीगुरुशिष्य सायंदेव याच्या वंशांतील पांचवा पुरुष. जवळ जवळ प्रारंभापासून (कमींत कमी श. १३४० पासून) श्रीगुरूंच्या सहवासांत असलेला सिद्धमुनि सरस्वती गंगाधराला गुरुचरित्राचें निवेदन

४९. गुरुचरित्र, २. ८; १३. ८३, ८५.

करण्याइतका प्रदीर्घ काळ जगला असेल, असें मानतां येत नाहीं. सरस्वती गंगाधराच्या हातीं त्याचें संस्कृत गुरुचरित्र असेल आणि त्या मूळ संस्कृतावर मराठी पोशाख चढवितांना श्रद्धा आणि कल्पकता यांच्या रसायनांतून सरस्वती गंगाधरानें आपल्या ग्रंथाला सिद्ध-नामधारक-संवादाचें स्वरूप दिलें असेल.

संन्यासी शिष्यांपैकीं पहिला शिष्य जो माधव-सरस्वती त्याची परंपरा महाराष्ट्रांत बराच विस्तार पावलेली दिसते. अमृत नामक एका ग्रंथकारानें आपल्या 'स्वरूप-निर्णय' ग्रंथांत नोंदविलेली गुरुपरंपरा मागें अंशतः दिलेली आहे. त्या परंपरेची पुढील नामावळी अशी आहे : नृसिंहसरस्वती–माधवेंद्र सरस्वती–अमृतानंद–गगनेंद्र – माधव सरस्वती–विठ्ठल सरस्वती–अंबिका-सरस्वती–अमृत. आश्चर्य असें कीं, हीच परंपरा विख्यात पदकार अमृत-राय याच्या कवितासंग्रहांत समाविष्ट झालेल्या 'अविनाशसंदेहहरण' या प्रकरणाच्या अखेरीसहि दिलेली आहे :

**आतां असो हा अनुभवप्रकार । परंपरा सांगों जी निर्धार ।**
**शृंगेरी मठ साचार । तेथें अधिष्ठान सरस्वती ॥**
**तोचि संप्रदाय माधव सरस्वती । वास गोदातीर नाभितीर्थीं ।**
**असतां अनुग्रह प्राप्ती । विठ्ठलसरस्वतीसी ॥**
**मग तयाचा उपदेश । प्राप्त अंबिका सरस्वतीस ।**
**तयाचा अभयकर अमृतास । असे सत्य ॥** [५०]

गगनेंद्राचा शिष्य माधव सरस्वती हा नाभीतीर्थांत ( गोदावरीतीरावर ) राहत असे, असें वरील उताऱ्यांत आणि अमृत कवीच्या 'स्वरूपनिर्णय' ( ओव्या ९५ ) या दुसऱ्या प्रकरणांतहि उल्लेखिलें आहे. 'नाभीतीर्थ' म्हणजे गोदाकांठचें प्रसिद्ध नगर नांदेड. नांदेड येथें सिद्धनाथपुरी नांवाच्या ब्राह्मण-वस्तीच्या भागांत शृंगेरी पीठाच्या परंपरेंतील एक मठ होता. तो या माधव सरस्वतीचाच असावा, असे पुरावे नांदेडच्या विख्यात शेष घराण्याच्या दप्तरांत उपलब्ध झाले आहेत.[५१]

---

५०. अमृतरायकृत कवितासंग्रह : वामन दाजी ओक, पुरवणी पृ. ५४.

५१. म. म. पोतदार गौरव ग्रंथ : श्री. वि. अ. कानोले यांचा लेख : '**नांदेडचें शेष घराणें**', पृ. ५६–७३.

अमृत कवीच्या ‘ स्वरूपनिर्णय ’ या प्रकरणाच्या दोन प्रती ( एक पूर्ण व एक अपूर्ण—बाड क्र. १०७१, १०७२ ) धुळ्याच्या समर्थ वाग्देवता मंदिरांत आहेत. ‘ स्वरूपनिर्णयां ’तील आणि अमृतरायकृत कवितासंग्रहापैकीं ‘ अविनाशसंदेहहरण ’ या प्रकरणांतील गुरुपरंपरा एकच आहे, हें आपण पाहिलें. आतां प्रश्न असा उपस्थित होतो कीं, स्वरूपनिर्णय-कार अमृत आणि अमृतराय एकच, कीं अमृत कवीचें ‘ अविनाशसंदेहहरण ’ हें प्रकरण नामसाम्यामुळें चुकून अमृतरायाच्या कविता-संग्रहांत छापलें गेलें ? अमृत-रायाच्या गुरूचा शोध अद्याप नीटसा लागलेला नाहीं—आजवर त्या दिशेनें प्रयत्नहि झालेला नाहीं. एक मत असें आहे कीं, मध्वमुनीश्वरांनीं आपले गुरु अद्वैतानंद यांच्या करवीं अमृतरायास अनुग्रह दिला, तर दुसऱ्या मतानुसार वरील उल्लेखांतील अंबिकासरस्वतीच अमृतरायाचे गुरु होत. अमृतरायाच्या अन्य स्फुट कवितेंत गुरुविषयींचें संदिग्ध सूचन दोन ठिकाणीं आहे. ‘ ध्रुवचरित्र ’ या प्रकरणाच्या शेवटीं—

**माता उमा परम, शंकर तात झाला।**
**अंबाजिता अमृत पावन नाम ज्याला।** [५२]

असा तो स्वतःच्या उल्लेख करतों आणि एका पदांत—

**अमृतमनोरथ फळला, अंबा फळला,**
**निंबाहुनि कडु भवतरु कळला।** [५३]

अशा प्रकारें श्लेषगर्भ रचनेंतून तो अंबिका सरस्वती या आपल्या गुरूच्या नांवाचें सूचन घडवितो. वरील दोन्ही उल्लेखांतून गुरुनाम सूचित करण्या-चाच अमृतरायाचा अभिप्राय असेल, तर स्वरूपनिर्णय-कार अमृत आणि पदकार अमृतराय एकच होत, असें सिद्ध होईल. याविषयीं आज तरी कांहीं निर्याणक मत नोंदवितां येणार नाहीं.

अमृत कवीनें आपल्या दोन प्रकरणांत दिलेल्या वरील गुरुपरंपरेपैकीं अमृतानंद या व्यक्तीविषयींहि अशीच समस्या आहे. श्री. प्रियोळकर यांनीं अमृतानंद-विरचित ‘ योगराजटिळक ’ या नांवाचा एक लघुग्रंथ (ओव्या ३३०)

---

५२. अमृतरायकृत कवितासंग्रह, पृ. १४.

५३. अमृतरायकृत कवितासंग्रह, पृ. १०१.

१९५६ मध्यें प्रसिद्ध केला आहे. हा ग्रंथ १५५० पूर्वींच गोव्यांत 'दत्तात्रेयाचा ग्रंथ' म्हणून प्रसिद्ध होता. या प्रसिद्धीवरून श्री. प्रियोळकरांनींहि त्यास 'श्रीदत्तसांप्रदायिक ग्रंथ' असें म्हटलें आहे. या ग्रंथाच्या तंजावर प्रतीमध्यें सदर समजुतीला पोषक अशी एक ओवी शेवटीं आहे :

गुरुशिष्याचा येकांतु । जो अनुवादला श्रीदत्तु ।
तें अमृतानंद सांगतु । योगराजतिलकु ॥

या ग्रंथांत गुरुनामाचा वा परंपरेचा उल्लेख कुठेंच नाहीं. अमृत कवीच्या 'स्वरूपनिर्णयां'त उल्लेखिलेल्या गुरुपरंपरेंत जें अमृतानंद असें नांव येतें, तोच या ग्रंथाचा कर्ता होय, असें श्री. प्रियोळकरांनीं एकदम गृहीत धरलें आहे, आणि 'योगराजटिळक'-कार अमृतानंद हा श्रीनरसिंह सरस्वतींच्या परंपरेंतील होय, असें मत व्यक्त केलें आहे. या त्यांच्या मताला प्रत्यक्ष ग्रंथाच्या अंतरंगाचेंच पाठबळ नाहीं. या ग्रंथांत अथपासून इतिपर्यंत सर्वत्र नाथ संप्रदायाच्या विचारांचें आणि साधनापद्धतीचें विवरण आहे. श्रीनरसिंह सरस्वतींच्या विचारप्रवाहाचें वा दत्तोपासनेचें अल्पस्वल्पहि दर्शन या ग्रंथांत नाहीं. ग्रंथकार नाथ संप्रदायाच्या परिभाषेंत प्रवीण आहे. त्याच्या या ३३० ओव्यांच्या ग्रंथावर ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवाचीहि गडद छाया आहे. माझ्या मतें, हा अमृतानंद चंद्रात्मज कवीच्या गुरुपरंपरेंतील अमृतानंद असावा. उद्योगपर्वावर मराठींत रचना करणाऱ्या चंद्रात्मज या कवीची गुरुपरंपरा दत्तात्रेय– अद्वैतानंद– परमात्मानंद– योगेश्वरानंद– हंसानंद– अमृतानंद– ब्रह्मानंद– विमळानंद– चिदानंद– प्रसन्नानंद– रामानंद– व्यंकटेश– चंद्रात्मज अशी आहे.[५४] या परंपरेचा प्रवर्तक दत्तात्रेय असल्यामुळें तंजावर प्रतींतील दत्तात्रेयाच्या उल्लेखाचा आणि 'दत्तात्रेयाचा ग्रंथ' या ग्रंथप्रसिद्धीचा आपोआपच उलगडा होतो. याविषयीं अधिक संशोधनाची आवश्यकता आहे.

सात संन्यस्त शिष्यांशिवाय गोदाकांठच्या मंजरिकेचा माधवारण्य आणि कुमसीचा त्रिविक्रम भारती या दोन संन्याशांचाहि श्रीगुरूंच्या शिष्यांतच समावेश करावयास हवा. श्रीगुरूंचें शिष्यत्व पत्करण्यापूर्वींच त्यांनीं संन्यास

---

५४. रामदासी संशोधन, खंड २, पृ. २७०.

स्वीकारलेला होता. श्रीगुरूंचे कांहीं गृहस्थ शिष्यहि होते. सायंदेव, नरहरि कवि, नंदी कवि आणि सायंदेवाचा ज्येष्ठ पुत्र नागनाथ हे त्यांतील प्रमुख होत. या गृहस्थ शिष्यांच्या वर्गात बेदरच्या यवन राजाचाहि समावेश करावा लागेल. गुरुचरित्राचा कर्ता सरस्वती गंगाधर हा सायंदेवाच्या वंशांतील होय. सायंदेव– नागनाथ– देवराव– गंगाधर– सरस्वती गंगाधर अशी त्याची पूर्वजपरंपरा आहे. त्याचें आडनांव साखरे, शाखा आपस्तंब, गोत्र कौंडिण्य आणि निवासस्थान कडगंची. दत्तसंप्रदायांत महनीयता पावलेल्या त्याच्या 'गुरुचरित्र' या ग्रंथाचें स्वरूप आपण शेवटच्या प्रकरणांत पाहूं.

## श्रीनरसिंह सरस्वती आणि मुनिबास कोठी :

महानुभावांच्या कुमाराम्नायांत मुनिव्यास कोठी उर्फ पंडित कमळाकर अयाचित कोठी या नांवाचा एक ग्रंथकार होऊन गेला 'स्थानपोथी' (चक्रधर-संबंधित स्थळांचा विवरणात्मक कोश) या प्रसिद्ध ग्रंथाचें कर्तृत्व त्याच्याकडे दिलें जातें. या ग्रंथाची रचना त्यानें श. १२७५ मध्यें केली, असें डॉ. य. खु. देशपांडे यांनीं अनेक ठिकाणीं लिहिलें आहे.[५५] या ग्रंथाच्या कर्तृत्वाशिवाय आणखी एक विशेष गोष्ट याच्या नावाशीं निगडित आहे : "मुसलमान राजवंशांतील एका राजाकडून या उद्योगी व पाताळयंत्री पुरुषानें एक आज्ञापत्राचें फर्मान मिळविलें आणि या आज्ञापत्राच्या जोरावर त्यानें महाराष्ट्रभर महानुभाव पंथाचे ओटे ऊर्फ पूजास्थानें बांधलीं."[५६] असें कै. वि. ल. भावे यांनीं याच्याविषयीं विधान केलें आहे. या विधानाच्या पुष्टीसाठीं त्यांनीं अन्वयस्थळाच्या एका पाठांतील पुढील उतारा दिला आहे : "कुमरें रेमाइसाचे मुनिव्यास त्याहीं उभयगंगातीरीं स्थानमात्र ओटे घातले : ते रायेचेनि बळें : हा मार्गासी उपयोगु तेयांचा :" मुनिव्यास कोठीनें यवन बादशहाच्या मदतीनें ओटे बांधले, असें मत डॉ. य. खु. देशपांडे यांनींहि व्यक्त केलें आहे.[५७] या मताला पोषक अशी एक दंतकथा महानुभाव

---

५५. महानुभावीय मराठी वाङ्मय, पृ. ४०; मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड १ : पांगारकर, पृ. ७३९; श्रीऋद्धिपुरवर्णन, प्रस्तावना, पृ. ४३.

५६. महाराष्ट्र-सारस्वत, पृ. ८०.

५७. महानुभावीय मराठी वाङ्मय, पृ. ९९

पंथांत आजहि सांगितली जाते : "हे मूळचे तेलंगणांतील लिंगायत महात्मे होते. नंतर यांनीं महानुभावपंथाची दीक्षा स्वीकारली. बेदरचा बादशहा यांच्याशीं संबंधित होता. बादशहा अति भयंकर रोगानें पीडित होता. दुःखानें त्रासून आत्महत्या करण्याकरितां तो एका विहिरीकडे गेला. तेथें मुनिबास एका झाडाखालीं विजनास बसले होते. त्यांना पाहून बादशहा त्यांच्याजवळ गेला. मुनिबासानें विचारलें, 'आपण इकडे कुणीकडे?' बादशहानें उत्तर दिलें, 'माझ्या रुग्णावस्थेमुळें आपणांसारख्या सत्पुरुषाजवळ खरें सांगतों कीं, दुःखानें त्रासून आत्महत्या करण्यासाठीं मी या विहिरीचा आश्रय घेण्यास आलों आहें.' मुनिबासानें विचारलें, 'आपणांला रोग आहे कोठें?' रोगाची जागा दाखविण्यासाठीं बादशहानें आपल्या अंगाकडे पाहिलें, तों त्याला आपला रोग नाहींसा झालेला आढळला. या चमत्कारामुळें बादशहाची मुनिव्यासांवर श्रद्धा बसली. बादशहानें त्यांना डंक, निशाण, पालखी, मोरचेल, परचल इत्यादि सन्मानदर्शक वस्तु अर्पण केल्या. स्थानांचा ताबा घेण्यास व स्थानें बांधण्यास बादशहाकडून त्यांना पैशाचीहि मदत मिळाली, असें म्हणतात."[५८]

वरील कथेंतील बेदरचा बादशहा आणि श्रीगुरूंशीं संबंधित असलेला बेदरचा बादशहा एकच होय, हें उघड आहे. मुनिव्यास हाहि दत्तोपासक संप्रदायांतील होता, हेंहि या संदर्भांत चिंतनीय आहे. डॉ. कोलते यांना हा मुनिव्यासाचा मुस्लिम-संपर्क संशयातीत वाटत नाहीं. यवन बादशहाच्या मदतीनें मुनिव्यासानें महानुभावांचे ओटे बांधले, याच्या पुष्टीसाठीं कै. भावे यांनीं दिलेला उतारा अन्वयस्थळाच्या एकाहि प्रतींत नाहीं, असें डॉ. कोलते म्हणतात.[५९] डॉ. कोलते यांनीं मुनिव्यासाच्या काळासंबंधीं दोन मतें नोंदविलीं आहेत : श. १२९४ वा श. १३३४. पैकीं पहिलें सांप्रदायिक मत त्यांना मान्य आहे. दुसऱ्या मतानुसार नोंदविलेला काळ श्रीगुरुचरित्रांतील घटनेला जवळचा ठरतो, हें उघड आहे.

मुनिव्यास कोठीसंबंधींची वरील कथा आणि गुरुचरित्रांतील कथा यांतील साम्य रहस्यमय आहे, एवढें खरें. कदाचित् रोगसंत्रस्त यवन राजा जसे उपचारांचे अनेक प्रयोग करीत होता, तसेंच अनेक सत्पुरुषांच्या

५८. स्थानपोथी, प्रस्तावना, पृ. ७ (तळटीप).

५९. स्थानपोथी, प्रस्तावना, पृ. ५.

कृपेलाहि आवाहन करीत असावा. किंवा गुरुचरित्रांतील वरील कथेच्या अनुकरणांतून महानुभावीयांनीं संप्रदायमाहात्म्य वाढविण्यासाठीं वरील कथा मुनिव्यासाच्या नांवावर लादली असावी. या बाबतींत निश्चित मत आज तरी नोंदवितां येत नाहीं. इतिहासाच्या गर्भांतील हा रहस्यमय दुवा पुराव्यांच्या प्रकाशांत आला पाहिजे.

## श्रीनरसिंह सरस्वतींची ग्रंथरचना :

श्रीगुरूंनीं ग्रंथरचना केल्याचा निर्देश गुरुचरित्रांत नाहीं. ते ज्या शृंगेरी पीठाच्या परंपरेंतील होते, त्या परंपरेंतील अनेक आचार्यांनीं ग्रंथरचना केलेली आहे. विजयनगरच्या हिंदु राज्याचे संस्थापक आणि मार्गदर्शक श्रीविद्यारण्य स्वामी आणि त्यांचे बंधु सायणाचार्य यांचीं नांवें दार्शनिक वाङ्मयाच्या क्षेत्रांत चिरंतन बनलेलीं आहेत. श्रीगुरूंची अभिजात प्रज्ञा, समाजहितैषी चिंतनशीलता आणि व्यापक निरीक्षण ध्यानीं घेतां त्यांनीं आपल्या प्रदीर्घ एकान्तवासांत ( परळी वैजनाथ : १ वर्ष, औदुंबर ४ महिने वाडी : १२ वर्षें ) कांहीं ग्रंथरचना केली असावी, असें मला वाटतें. असें वाटण्याला कांहीं आधारहि मिळतो. म्हैसूरच्या महाराजा कॉलेजांतील प्राध्यापक श्री. एस्. एस्. श्रीकंठशास्त्री यांनीं ‘ विजयनगरकालीन संस्कृत वाङ्मय ’ या आपल्या लेखांत दिलेली पुढील नोंद या संदर्भांत चिंतनीय आहे :

“ अद्वैत मत : कृष्णानंद सरस्वती—नृसिंहस्वामी ( कृष्णानंद सरस्वती अविमुक्तक्षेत्राचा शिष्य )—अद्वैतदीपिकाविवरण, भावप्रकाशिका, वेदान्तसारसुबोधिनी, इत्यादि.

सदाशिव ब्रह्मेंद्र सरस्वती—गुरुरत्नमालिका, ब्रह्मसूत्रवृत्ति, स्तोत्रें, वगैरे.

माधव सरस्वती—शिवादित्यकृत सप्तपदार्थीवर टीका.”[६०]

या नोंदींतील कृष्णानंद सरस्वती, नृसिंह स्वामी आणि माधव सरस्वती हीं तीन नांवें आपल्या दृष्टीनें महत्त्वाचीं आहेत. यांपैकीं कृष्णानंद सरस्वती हे अविमुक्त क्षेत्राचे ( काशीचे ) होते आणि नृहिंहस्वामी हे त्यांचे शिष्य होते, हाहि उल्लेख चिंत्य आहे. परंतु वरील ग्रंथकार आणि ग्रंथ इ. स. १५७०–१६७० या कालखंडांत श्री. श्रीकंठशास्त्री यांनीं समाविष्ट केले आहेत.

६०. विजयनगर स्मारक ग्रंथ, पृ. १८४.

उपरिनिर्दिष्ट तीन ग्रंथांचीं हस्तलिखितें प्रत्यक्ष पाहूनच यासंबंधींचें निर्णायक मत नोंदविणें शक्य होईल. जर अशा पाहणींतून श्रीनरसिंह सरस्वती आणि उपरिनिर्दिष्ट नृसिंहस्वामी यांचें ऐकात्म्य सिद्ध झालें, तर वरील तीन ग्रंथांच्या आधारें श्रीगुरूंच्या विचारविश्वाचें स्पष्ट दर्शन घडविण्यास बहुमोल साह्य होईल.

## श्रीनरसिंह सरस्वती आणि दत्तोपासना :

श्रीगुरूंच्या उदयापूर्वी खास दत्तसंप्रदाय या नांवानें दत्तोपासनेची परंपरा रूढ नव्हती. महाराष्ट्रांतील दत्तसंप्रदायाचा प्रारंभ श्रीगुरूंच्या अवतार-चरित्रांतून झाला, असें मानलें जातें. परंतु आश्चर्याची गोष्ट अशी कीं, गुरुचरित्रांत वर्णिलेलीं उभय अवतारांचीं चरित्रें आपण बारकाईनें पाहिलीं, तर त्यांच्या अवतारचरित्रांत कुठेंहि दत्तोपासनेला प्राधान्य नाहीं. श्रीपाद श्रीवल्लभांचा जन्म एका अवधूताच्या आशीर्वादानें झाला आहे इतकेंच; परंतु त्यांनीं आपल्या जीवनकाळांत कधींहि दत्तोपासना उपदेशिली नाहीं. ते शिवस्थानांत राहिले आणि त्यांनीं शिवव्रताचा उपदेश केला. त्यांचें स्वतःचें जीवन मात्र एखाद्या अवधूतासारखें असावें. श्रीनरसिंह सरस्वतींनीं शिव, विष्णु, देवी, गणेश, नृसिंह इत्यादि देवतांच्या उपासनेचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष उपदेश केला आहे; परंतु त्यांनीं कुठेंहि दत्तात्रेयाच्या मूर्तीची व पादुकांची उपासना वा मानसपूजा कुणालाहि सांगितली नाहीं. सरस्वती गंगाधरांच्या श्रद्धेनुसार हे दोघेहि महापुरुष दत्तावतार असल्यामुळें त्यांच्याविषयींची भक्तिभावना हीच दत्तोपासना होय. गुरुचरित्रकारांना त्यांचा आणि दत्तोपासनेचा अनुबंध स्पष्ट करण्याची आवश्यकता भासत नाहीं. गुरुचरित्रांत माहूर, पांचाळेश्वर इत्यादि पुरातन दत्तस्थानांचे ओझरते उल्लेख आले असले, तरी या दोघांहि महापुरुषांच्या जीवनाशीं त्या स्थानांचा साक्षात् संबंध कधींच आला नाहीं.

आणि तरीहि या दोघांच्या संस्पर्शानें आणि सन्निधानानें पुनीत झालेलीं स्थानें प्रख्यात दत्तक्षेत्रें बनलेलीं आहेत. त्यांच्यानंतर झालेल्या अनेक श्रेष्ठ दत्तोपासकांनीं त्यांना दत्तस्वरूप मानून त्यांची गौरवगाथा मुक्तकंठानें गायिली आहे आणि त्यांच्या चरणीं कृपेची भीक मागितली आहे. याचा अर्थ असा कीं, जें गुरुचरित्रकारांना ठाऊक नाहीं, असें कांहीं तरी इतिहासाच्या

मौनांत लुप्त झालें आहे. मला अशी खात्री वाटते कीं, एक दिवस इतिहास आपलें गूढ मौन दूर सारील आणि अन्तस्तलांत लपविलेल्या अनन्त रहस्यांचा चित्रपट तुमच्या-आमच्यासमोर खुला करील.

पहिल्या प्रकरणांत दत्तात्रेय आणि शाक्त तांत्रिक साधना यांचा संबंध विवरितांना शंकराचार्यांच्या शृंगेरी पीठाचा आणि दत्तात्रेयाचा संबंध असल्याचा उल्लेख येऊन गेला आहे. श्रीगुरूंची गुरुपरंपरा शृंगेरी पीठांतीलच आहे. श्रीगुरूंच्या अवतारकालापूर्वी दत्तोपासनेच्या क्षेत्रांत विधिनिषेधातीत उन्मुक्त साधनेचें प्राबल्य फार होतें. परंतु श्रीगुरूंनीं संन्यास स्वीकारून वर्णाश्रमाचा पुरस्कार आवेगानें केल्यामुळें दत्तोपासनेच्या प्रवाहांत क्रांतिकारी परिवर्तन घडून आलें. आचारधर्मावर आणि अनुष्ठानावर त्यांनीं दिलेला भर पुढें दत्तसंप्रदायाचें एक वैशिष्ट्य बनून राहिलें. या दृष्टीनें विचार करतां श्रीगुरूंचें संन्यासग्रहण ही घटना दत्तोपासनेच्या इतिहासांत अत्यन्त महत्त्वपूर्ण वांटा उचलणारी ठरली आहे.

श्रीगुरूंच्या अवतारचरित्राचा प्रभाव गेल्या पांच शतकांवर उमटला आहे. औदुंबर, नरसोबाची वाडी आणि गाणगापूर हीं त्यांच्या निवासामुळें उदयास आलेलीं दत्तक्षेत्रें म्हणजे साधनेच्या क्षेत्रांतील जागत्या ज्योति आहेत. विवेकाच्या प्रकाशांत विकल्प-विकारांचा अंधार दूर सारून आपण श्रीगुरूंचें महनीय कार्य समजावून घ्यावयास हवें आणि त्यांच्या पाऊलखुणांचा मागोवा घेत चिरन्तनाचे वेध घ्यावयास हवे.

* * *

# ४. दत्तोपासक साधु - संत

## तपाचे हिमालय :

श्रीनरसिंह सरस्वतींच्या निजानंदगमनानंतर एक शतकाच्या आंतच महाराष्ट्रांत दत्तोपासनेचा प्रभाव सर्वव्यापी बनला. शालिवाहन शकाच्या पंधराव्या शतकांत जनार्दनस्वामी, एकनाथ आणि दासोपंत या त्रिमूर्तीनें दत्तभक्तीचा प्रकर्ष साधून दत्तोपासनेची परंपरा अधिक समृद्ध केली आणि भविष्याच्या वाटेवर आपल्या प्रतीतीचे प्रखर प्रकाशझोत टाकले. त्यानंतर या उजळलेल्या आणि रुळलेल्या वाटेनें अनेक साधकांनीं जीवनसाफल्याचें मंदिर गांठलें. श. १३८० ते श. १८८० या पांचशें वर्षांच्या कालखंडांत दत्तोपासनेच्या क्षेत्रांत अनेक तपाचे हिमालय उभे राहिले. त्यांपैकीं कांहीं ज्ञात आहेत, तर कांहीं अज्ञात. कांहींचीं जीवनें उन्मुक्त चिन्तनानें भारलेलीं, विधिनिषेधातीत अवधूतवृत्तीनें रंगलेलीं अशीं होतीं, तर कांहींचीं जीवनें विधिविधानांचा व्यापक प्रपंच रचणारीं, आचारधर्माला नि उपासनातंत्राला प्राधान्य देणारीं होतीं. या तपोनिधींच्या अनुभूतीची खोली आणि हृदयाची उंची मापायला माझी अश्रद्ध चिकित्सा अपुरी पडेल. त्या अनेक दत्तोपासकांतील कांहींचा अल्प परिचय पुढें देत आहें.

## जनार्दनस्वामी ( श. १४२६-१४९७ ) :

हे मूळचे चाळीसगांवचे देशपांडे. ऋग्वेदी आश्वलायनशाखीय देशस्थ ब्राह्मण. अहमदनगरच्या निजामशाहींत हे दौलताबादच्या किल्ल्यावर अधिकारी होते. यवनसेवेंत जीवन कंठीत असतांनाहि त्यांनीं आपली स्वधर्मनिष्ठा आणि स्वधर्मोचित साधना चळूं-ढळूं दिली नाहीं. ते दत्तात्रेयाचे अनन्यभक्त होते. त्यांच्या साधुत्वाचा प्रभाव हिंदूंप्रमाणेंच मुसलमानांवरहि पडलेला होता. नाथांनीं आपल्या एकादश-टीकेंत जनार्दनस्वामींना झालेल्या दत्तसाक्षात्काराचें वृत्त अभावितपणें सांगितलें आहे :

**गुरुप्राप्तीलागीं सर्वथा । थोर जनार्दनासी चिंता ।**
**विसरला तिन्ही अवस्था । सद्गुरु चिंतितां चिंतनीं ॥**

देव भावाचा भोक्ता । दृढ जाणोनि अवस्था ।
येणें जालें श्रीदत्ता । तेणें हातु माथां ठेविला ॥
हातु ठेवितांच तत्काळ । बोधु आकाळिला सकळ ।
मिथ्या प्रपंचाचें मूळ । स्वरूप केवळ स्वबोधें ॥
कर्म करूनि अकर्ता । तोचि अकर्तात्मबोधु जाला देता ।
देहीं असोनि विदेहता । तेही तत्त्वता आकळिली ॥
गृहाश्रमु न सांडितां । कर्मरेखा नोलांडितां ।
निज व्यापारीं वर्ततां । बोधु सर्वथा न मैळे ॥
तो बोधु आकळितां मना । मन मुकलें मनपणा ।
अवस्था नावरेचि जनार्दना । मूर्छापन्न पडियेला ॥
त्यासी सावध करूनि तत्त्वता । म्हणे प्रेमा राहे सत्त्वावस्था ।
तोहि गिळोनि सर्वथा । होईं वर्तता निजबोधें ॥
पूजाविधी करोनिया । जंव जनार्दनु लागला पायां ।
तंव अदृश्य जाला दत्तात्रेया । योगमायेचेनि योगें ॥ [1]

जनार्दनस्वामींच्या शिष्यप्रवरानें भावावेगांत कथन केलेलें हें साधना-रहस्य जनार्दनस्वामींच्या दत्तोपासनेवर प्रकाशझोत टाकणारें आहे.

श्रीनरसिंह सरस्वतींच्या अवतारकाळापासूनच दत्तभक्तीच्या क्षेत्रांत हिंदु-मुसलमानांचा समन्वय होत होता. जनार्दनस्वामींचें चरित्र या समन्वयाच्या विचाराच्या दृष्टीनें विशेष चिन्तनीय आहे. आजपर्यंत जनार्दनस्वामींचें गुरुत्व प्रत्यक्ष दत्तात्रेयाकडे किंवा श्रीनरसिंह सरस्वतींकडे दिलें जात असे. नाथांच्या अभंगगाथ्यांत प्रारंभीं जनार्दनस्वामींच्या नांवावर जे अभंग छापलेले आहेत, त्यांत पहिले चौदा अभंग श्रीनरसिंह सरस्वतींना उद्देशून लिहिलेले आहेत. परंतु जरा बारकाईनें पाहिल्यावर स्पष्ट होईल कीं, हे अभंग जनार्दनस्वामींचे नसून कुणा अन्य जनार्दनाचे आहेत.[2] या अभंगांतील—

१. एकनाथी भागवत, ९.४३१–४३८.

२. हे अभंग अठराव्या शतकाच्या अखेरीस नृसिंहक्षेत्रीं होऊन गेलेल्या जनार्दनाचे आहेत, असें श्री. वा. सी. बेंद्रे म्हणतात. ('तुकारामहाराज यांचे संतसांगाती, पृ. ८९.)

**बालविधवे आलिंगिलें । एकासनीं बैसाविलें ।**
**तिशीं रमतां मानिलें । स्वर्गसुख तृणतुल्य ॥**
**माय बहीण मीं सोडिली । इंद्रियें तीं सुखावलीं ।**
**शेखीं ऐसी गती झाली । गलितकुष्ठ मी झालों ॥**

हे उल्लेख सरळ सरळ स्पष्ट करतात कीं, हा जनार्दन कुणी दुसराच आहे. तेव्हां श्रीनरसिंह सरस्वतींचा आणि जनार्दनस्वामींचा संबंध इतिहास-दृष्ट्या सिद्ध होऊं शकत नाहीं. श्रीनरसिंह सरस्वतींचें निर्याण श. १३८० मध्यें घडलें आणि जनार्दनस्वामींचा जन्म श. १४२६ मध्यें झाला. अर्थात् त्यांचा प्रत्यक्ष संबंध अशक्य आहे. बरें, जनार्दनस्वामींना त्यांनीं स्वप्नबोध दिला असें मानावयाचें तर त्यांचा संबंध सूचित करणारा वरील अभंगात्मक पुरावाच उडालेला आहे.

जनार्दनस्वामींच्या गुरुपरंपरेसंबंधीं एक नवें रहस्य अलीकडेच प्रकाशित झालें आहे. श्री. वा. सी. बेंद्रे यांनीं शेख महंमदबाबा श्रीगोंदेकर याच्या-संबंधीं लिहितांना, शेख महंमदानें दिलेल्या माहितीच्या प्रकाशांत जनार्दन-स्वामींच्या गुरुपरंपरेविषयीं चर्चा केली आहे. शेख महंमद आपल्या ‘ योगसंग्राम ’ या ग्रंथाच्या पंधराव्या प्रसंगाच्या प्रारंभींच म्हणतो :

**ॐनमोजी श्रीसद्गुरु चांद बोधले । त्यांनीं जानोपंता अंगिकारिलें ।**
**जानोबानें एका उपदेशिलें । दास्यत्वगुणें ॥ १ ॥**

शेख महंमद आपल्या एका अभंगांतहि हाच उल्लेख पुढीलप्रमाणें करतो :

**धन्य चांद बोधले । त्यांनीं जानोपंता लोधलें ।**
**त्यांच्या शेषें धाले । एको जनार्दन ॥**
**केली भागवतटीका । उद्धार विश्वलोका ।**
**तेच दिसे सायेका । स्वामीपाशीं ॥**

याचा अर्थ असा कीं, जनार्दनस्वामींचे गुरु चांद बोधले असून शेख महंमद हा त्यांचा गुरुबंधु होय. शेख महंमदाच्या परंपरेंतील माहितीनुसार चांद बोधले हे शेख महंमदाच्या पित्याचे शिष्य होते. शेख महंमदाचा पिता सैयद राजे महंमद कादरी हा सूफींच्या कादरी उपपंथांतील होता. हिंदुस्थानांत

आलेला पहिला कादरी सैयद महंमद गौस (मृ. १५१७ इसवी) हा त्याचा गुरु. या संबंधामुळें चांद बोधलेचें सांप्रदायिक नांव 'सैयद चांद-साहेब कादरी' असें आढळतें. नाथांना श्रीदत्तात्रेयानें मलंगवेशानें भेट दिल्याची अद्भुत कथा या माहितीच्या पार्श्वभूमीवर लक्षांत घेण्यासारखी आहे. जनार्दनस्वामींनीं स्वतः दौलताबादच्या किल्ल्याच्या दाराशीं बांधलेली चांद बोधलेची कबर या रहस्याची साक्ष देत उभी आहे. मुकुंदराज नामक एकनाथशिष्यानें "चंद्र बोधला मूळ, जनार्दन खोड । शाखा पालव गोड एकनाथ ॥" असें म्हटलें आहे. पुण्याच्या गंगानाथ मठाच्या गुरुपरंपरेंतहि जनार्दनस्वामींच्या गुरूंचें नांव 'दत्तात्रेय' असें नसून 'चांद बोधले' असेंच प्रचलित आहे.

हे चांद बोधले म्हणजे नाथांना 'चतुःश्लोकी भागवता'च्या रचनेची स्फूर्ति देणारे चंद्रगिरीचे चंद्रगिरीचे चंद्रभट असावेत. या चंद्रभटांनींच उत्तरजीवनांत सूफी संप्रदायाची दीक्षा घेतली असावी आणि मलंगवेशानें भ्रमण चालू केलें असावें. त्यांच्याविषयीं प्रथमपासून पूज्यभाव बाळगणारे आणि परमार्थाच्या क्षेत्रांत भेदांना थारा न देणारे जनार्दनस्वामी त्यांचे शिष्य बनले असले, तर त्यांत विशेष आश्चर्य नाहीं. नाथांच्या साहित्यावर जो प्रतिक्रियात्मक व संस्कारात्मक असा उभयविध सूफी प्रभाव जाणवतो, त्याचें रहस्य या नव्यानें प्रकट होणाऱ्या संबंधांत असावें, असें वाटतें. शेख महंमद हा मालोजी राजे भोसले यांचा गुरु होता. त्यांनींच त्याला श्रीगोंद्यास आणलें. हा त्याच्या साधुत्वासंबंधींचा विश्वास आणि त्याची उदार परमार्थदृष्टि व्यक्त करणारी त्याची ग्रंथरचना लक्षांत घेतां तो सहिष्णु वातावरणांत वाढलेला असावा, असें वाटतें. नाथांच्या गुरुपरंपरेशीं असलेला हा सूफींचा संबंध गंभीर संशोधनाचा विषय बनावयास हवा.

श. १४६७ मध्यें स्वामींना नाथांसारखा समर्थ शिष्य लाभला आणि त्यांच्या हृदयांतील पारमार्थिक प्रतीतीची वल्लरी महाराष्ट्र-जीवनाच्या मंडपावर वेगानें पसरूं लागली. आपला व्यासंग, आपला अनुभव आणि आपली समाजदृष्टिहि त्यांनीं आपल्या पारमार्थिक सुपुत्राला दिली आणि त्याला हातीं धरून आपल्या वाटेवर चालविलें. त्यांनीं चंद्रभटाकडून नाथांसमोर चतुःश्लोकी भागवतावर प्रवचन घडविलें आणि नाथांना ग्रंथरचनेस उद्युक्त

केलें. ही प्रेरणा पुढें एकादशस्कंधाच्या टीकेच्या रूपानें फुललेली पाहून तर त्यांना प्रभुदर्शनाहूनहि आधिक आनंद झाला असेल. पुढें श. १४९३–९५ या काळांत नाथ काशीला गेले; तिथें त्यांच्या ग्रंथाची हेटाळणी झाली आणि नंतर मिरवणूकहि निघाली. नाथ गौरवासह परत आले आणि त्यानंतर दोनच वर्षांनीं फाल्गुन व. ६ श. १४९७ या दिवशीं स्वामी कृतार्थपणें निजानंदांत लीन झाले. फाल्गुन वद्य षष्ठी याच दिवशीं त्यांचा जन्म झाला होता, त्यांना दत्तदर्शनहि याच दिवशीं झालें होतें आणि नाथांना बोधदानहि त्यांनीं याच दिवशीं केलें होतें. समाधियोगहि त्याच दिवशीं आचरून त्यांनीं त्या दिवसाला चिरंतन पावित्र्य प्राप्त करून दिलें.

जनार्दनस्वामींनीं स्फुट अभंगांशिवाय कांहीं ग्रंथरचनाहि केली असावी. म. म. पोतदारांना पैठण येथें सांपडलेला 'आत्मानात्मविवेकसार' या नांवाचा पंचीकरणावरील एक ग्रंथ स्वामींचा आहे.[३] हा ग्रंथ ओवीबद्ध असून मधून मधून पुष्कळ संस्कृत व क्वचित् मराठी वचनें आधारास घेतलेलीं आहेत. या वचनांत ज्ञानेश्वरींतील वचनेंहि आहेत. विषयस्पष्टीकरणासाठीं अनेक कोष्टकें दिलेलीं आहेत. हा ग्रंथ गुरु-शिष्यसंवादात्मक आहे. ग्रंथाच्या उपसंहारांत जनार्दनस्वामी म्हणतात :

**ऐसे पंचीकृत महाभूताचे । पिंड ब्रह्माड हे रचे ।**
**देहचतुष्टय ऐसे । त्याचें नामकारण ॥**
**म्हणोनि ब्रह्मांड हें कारण । पिंड तें कार्य जाण ।**
**कार्य कारणाशीं अभिन्नपण । नित्य सिद्ध ॥**
**याचा उपक्रम उपसंहारू । गुरुमुखें जाणिजे विवरू ।**
**बोधलिया स्वनिर्धारू । सच्चिदानंद ॥**
**ऐसें हें पंचीकरण । महावाक्यविवरण ।**
**कळलीयां संन्यासग्रहण । सहजचि असे ॥**
**हा उकलु तैंचि सुगमु । जैं जोडे आत्मारामु ।**
**पूर्णानंद घनश्यामु । सोऽहं सिद्ध ॥**

३. भा. इ. सं. मं. त्रैमासिक, वर्ष १९ अंक २, पृ. ५९-६२.

जनार्दन विनवी भावें । हें भक्तिपूर्वक पहावें ।
पाहतां देहींच जीवें । ब्रह्म होणें ॥
हें वेदांत सारासार । आत्मज्ञानविचार ।
जनार्दना श्रीगुरु दातार । कृपा देती ॥

जनार्दनस्वामींनीं गुरूंजवळ अनेक शंका प्रदर्शित केल्या आहेत आणि गुरुमुखानें त्यांचा उलगडा झाला आहे.

**एकनाथ ( श. १४५५-१५२१ ):**

नाथांचें जीवन सर्व महाराष्ट्राला ज्ञात आहे. संत भानुदासांच्या कुळांत जन्मलेल्या या महापुरुषानें भागवतधर्माच्या मंदिराची उभारणी केली आणि ज्ञानदेवांनीं प्रारंभिलेल्या कार्याचें धुरीणत्व समर्थपणें वाहिलें. त्यांची सर्व-स्पर्शी प्रज्ञा, असीम गुरुभक्ति, प्रदीर्घ साधना आणि विश्वव्यापी करुणा मराठी संस्कृतीच्या इतिहासांत चिरस्मरणीय आहे. त्यांच्या सर्वपरिचित जीवना-विषयीं चर्चा करीत न बसतां आपण त्यांच्या दत्तोपासनेचा स्थूल परिचय करून घेऊं या.

एकनाथ जीवनभर वारकरी संप्रदायाच्या वातावरणांत नांदले, तरी दत्तोपासनेचा वारसाहि त्यांनीं उत्कटपणें सांभाळला होता. त्यांच्या अनु-भवाच्या प्रकाशांत पांडुरंग आणि दत्तात्रेय यांत कांहींच भेद नव्हता. त्यामुळें त्यांच्या मनोविश्वांत कधीं पांडुरंग भरून राह्यचा, तर कधीं 'त्रिगुणात्मक त्रैमूर्ती' चा संचार व्हायचा. एकादशटीकेंत दत्तात्रेयाला वंदना करतांना नाथ म्हणतात :

आतां नमूं दत्तात्रेया । जो आचार्यांचा आचार्या ।
तेणें प्रवर्तविलें ग्रंथकार्या । अर्थवावया निजबोधु ॥[४]

यदु-अवधूत संवादाच्या प्रसंगीं नाथांनीं अवधूत आणि दत्तात्रेय यांचें ऐक्य कल्पून आपली दत्तभक्ति व्यक्त केली असल्याचा उल्लेख पहिल्या प्रकरणांत येऊन गेलाच आहे. पुढें भिक्षुगीतेच्या प्रसंगीं त्यांनीं एक आगळा अनुभव नोंदविला आहे :

---

४. एकनाथी भागवत, १. १४२.

माझे निजगुरूचाहि गुरु । श्रीदत्त परमगुरु ।
तो भिक्षुगीतार्थं साचारु । योग्यां योगेश्वरु तुष्टला ॥
तेणें तोखलेनि अद्‌भुतें । आदरें आश्वासूनि मातें ।
अभय देऊनि निजहस्तें । ग्रंथार्थं डुल्लतु ॥[५]

नाथांच्या अभंग-संभारांत 'दत्तनाममाहिमा' (अभंग ४८) आणि 'दत्तमानसपूजा' (अभंग १५) अशीं दोन अभंगात्मक प्रकरणें आहेत.[६] शिवाय दत्तजन्मावरील ६७ ओव्यांचें एक लहान प्रकरणहि त्यांच्या नांवावर आहे. या ६३ अभंगांत नाथांच्या दत्तभक्तीचा प्रकर्ष प्रकटला आहे. नाथांच्या श्रद्धेनुसार 'विश्व तारावयासाठीं' अनसूयेच्या उदरीं निर्गुण निराकार तत्त्व साकारलें आहे. या 'गुरुकुळींच्या दैवता' विषयींची नाथांची भक्ति ओसंडून वाहत आहे. 'दत्त माझी माता । दत्त माझा पिता ।' अशी त्यांची भावना आहे. नाथांनीं हा 'लावण्यमनोहर प्रेमाचा पुतळा' श्रीगुरुकृपेनें ओळखला आणि त्याला हृदय-डोल्हाऱ्यावर बसवून व त्यावर अभेदाचा चांदवा झुलवून त्यांनीं त्याचें भक्तिकुसुमांनीं पूजन केलें. दत्त-माउलीच्या वात्सल्याची ग्वाही देतांना नाथ म्हणतात :

ऐसी जगाची माउली । दत्तनामें व्यापुनि ठेली ॥
जावें जिकडे तिकडे दत्त । ऐशी जया मति होत ॥
तया सांकडेंचि नाहीं । दत्त उभा सर्वां ठायीं ॥
घात आघात निवारी । भक्ता बाहे, धरी करीं ॥
ऐशी कृपाळू माउली । एका जनार्दनीं देखिली ॥

हा दत्तमाउलीच्या वात्सल्याचा अनुभव नाथांनीं जीवनभर घेतला आहे आणि त्याचमुळें ते सर्वांना कंठरवानें त्याच्या चरणांचा आश्रय घेण्यास सांगत आहेत. नाथांच्या काशी निवासांतहि त्यांना दत्तदर्शनाचा एक उत्कट अनुभव आला होता. त्या अनुभवाचें चित्र त्यांनीं एका अभंगांत रेखाटलें आहे :

एका एकीं एकला काशीवासा गेला ।
स्वलीला श्रीदत्त स्वयें प्रगटला ॥

५. एकनाथी भागवत, २३.१०००–१००१.
६. श्रीएकनाथमहाराज यांच्या अभंगांची गाथा, पृ. २०१–२०९.

दत्त देव आला, दत्त देव आला।
स्वभावा सांडोनि भेटावया चला ॥
मुक्तिमंडपामाझारीं निजनाम नगरीं।
दत्त प्रगटला कीर्तनामाझारीं ॥
भेटणें भेटी उठी दत्ता जाली भेटी।
सांगणें ऐकणें दत्त होऊनि उठी ॥
कीर्तनाआंतौता नाम श्रीदत्त दत्ता।
निज कीर्ति ऐकोनि डोले तत्त्वतां ॥
दत्त जंगमीं स्थावरीं विश्वीं विश्व धरी।
तोचि दत्त घरोघरीं नित्य भिक्षा करी

विश्व व्यापून विश्वाची धारणा करणारा आणि प्रत्येकाच्या हृदयाच्या द्वारीं उभा राहून भक्तीची भिक्षा मागणारा हा नाथांचा दत्तात्रेय दत्तोपासनेच्या इतिहासांत विलोभनीय आहे.

## दासोपंत (श. १४७३-१५३७):

हे बेदर परगण्यांतील नारायणपेठच्या देशपांडे घराण्यांत जन्मले. पित्याचें नांव दिगंबरपंत आणि मातेचें नांव पार्वतीबाई. घरीं गजान्त लक्ष्मी नांदत असल्यामुळें पांचव्या वर्षी दासोपंतांची मुंज थाटामाटानें साजरी झाली. १६ व्या वर्षी त्यांचा विवाह झाला. परंतु याच सुमारास बेदर प्रांतांत दुष्काळ पडला. लोक अन्नावांचून तडफडूं लागले. दिगंबरपंतांनीं आपल्या अधिकारांत सरकारी धान्य भुकेल्या जनतेला देऊन टाकलें. परंतु धान्याच्या किमतीइतक्या रकमेचा भरणा वेळेवर करतां न आल्यामुळें त्यांना बेदरहून बादशहाचें बोलावणें आलें. दिगंबरपंतांबरोबर दासोपंतहि बेदरला गेले. दिगंबरपंतांची हृदयव्यथा जाणण्यासाठीं बादशहाजवळ हृदयच नसल्यामुळें त्यानें त्यांना ताकीद दिली कीं, "एक महिन्यांत थकलेली बाकी चुकती करा. नाहींतर दासोपंतांस मुसलमान केलें जाईल." बादशहानें दासोपंतांना ओलीस म्हणून ठेवून घेतलें आणि दिगंबरपंत ढांसळलेल्या हृदयाला सांभाळीत नारायणपेठला परत आले. एक महिन्यांत दोन लक्ष रुपयांची तरतूद करावयाची होती!

दासोपंतांची तेजस्वी मुद्रा आणि डोळ्यांतील चमक पाहून बादशहास आनंद झाला होता. हा तडफदार मुलगा जर मुसलमान झाला, तर आपल्या धर्मांत चांगली भर पडेल, हा त्याच्या आनंदाचा पाया. नजरकैदेंत असेपर्यंत रोज एक रुपयाची नेमणूक त्यानें दासोपंतांसाठीं करून दिली होती. दासोपंत सकाळींच उठून ' झरणी नरसिंहा 'च्या मंदिरांत जात आणि स्नानसंध्या व पूजाअर्चा झाल्यावर त्या एक रुपयाचें दान करून टाकीत. या सत्प्रवृत्त राजबिंड्या मुलाचें धर्मान्तर होणार, या कल्पनेनें बेदरची हिंदु जनता अस्वस्थ होऊन गेली होती.

महिन्याची मुदत संपत आली. बादशहाच्या आसुरी आनंदाला भरतें येऊं लागलें आणि दिगंबरपंतांच्या घरांत अमावास्येचा अंधार झांकोळूं लागला. परंतु त्यांच्या सत्त्वसंचितांतून एक प्रकाशरेखा उसळून आली आणि तिनें काळाचा ग्रास होऊं लागलेल्या दासोपंतांना मुक्त केलें : दत्ताजी पाडेवार नामक व्यक्तीनें दिगंबरांना नकळत दोन लाखांचा भरणा पुरा केला आणि दिगंबरपंतांचा मुलगा बादशहाच्या कैदेंतून सोडविला. हा दत्ताजी पाडेवार म्हणजे प्रत्यक्ष दत्तात्रेयच, अशी सार्वत्रिक श्रद्धा आहे.[७]

दासोपंत घरीं आले. अभावित सुटकेमुळें घरच्या मंडळींना आनंदाचें भरतें आलें. परंतु दासोपंतांच्या मनाची शान्ति मात्र ढळली होती. या संकटकाळांतील चिन्तनानें त्यांच्या गृहासक्तीचा कणाच खिळखिळा होऊन गेला आणि हृदयांतील सुप्त अवधूतवृत्तीला जाग आली. बादशहाच्या कारावासांतून जरी त्यांचें शरीर मुक्त झालें होतें, तरी त्यांना मुक्तीचा आनंद वाटेना. सर्व आसक्तिमय जगत् एक विराट् कारागृह आहे, अशी त्यांना जाणीव झाली. या जाणिवेची तीव्रता इतकी वाढत गेली कीं, त्या आसक्तीचे पाश तोडून टाकण्यासाठीं एके रात्रीं, कोणाला नकळत, ते घराबाहेर पडले.

प्रथम ते हिलालपूर येथें आले. तेथून डाकुळगी येथें गेले. डाकुळगीचे कृष्णाजीपंत कुलकर्णी यांनीं या प्रज्ञासंपन्न बालयोग्याजवळ अनुग्रहाची याचना केली. परंतु आपल्या साधनेला सिद्धीचें फळ प्राप्त होण्यापूर्वीं गुरुत्वाचा आव आणणाऱ्या ' बुवां 'पैकीं ते नसल्यामुळें त्यांनीं कुलकर्ण्यांना अनुग्रह देण्याचें नाकारलें आणि पुनर्भेटीचें आश्वासन देऊन तें गांव सोडलें. त्या-

७. या प्रसंगाचें आणि दामाजीपंतांच्या चरित्राचें साम्य ध्यानीं घेण्यासारखें आहे.

नंतर प्रेमपूरला कुलदेवतेचें दर्शन घेऊन ते नांदेड येथें येऊन राहिले. या गोदामातेच्या नाभिस्थानीं कांहीं काळ तीर्थस्नानाचा लाभ घेऊन ते माहूरला गेले. तेथें सिंहाचळाच्या शिखरावर, दत्तगुरूंच्या सन्निधानानें पुण्यपावन बनलेल्या सिद्धभूमींत त्यांच्या मनाच्या कंदाला तपाचे धुमारे फुटले आणि बारा वर्षांच्या प्रदीर्घ अवधींत त्यांच्या जीवनांत परमार्थ सर्वांगीं बहरून गेला. साधनेच्या वेलीवर सिद्धीचीं अमृतफळें फळलीं आणि जीवन प्रकाशमय झालें. त्यानंतर आषाढघनासारखें आपलें अनुभवसंपन्न हृदय मुमुक्षूंच्या द्वारीं रितें करीत ते संचार करूं लागले. या मुक्त संचाराच्या काळांत राक्षसभुवन येथें गोदामाईच्या वाळवंटांत त्यांना दत्तपादुकांचा प्रसाद प्राप्त झाला. तेथें एकान्तचिन्तनांत काळ कंठीत असतांना अवधूताचें दर्शन झालें.

नंतर डाकुळगीच्या कृष्णाजीपंतांची आठवण होऊन ते त्यांच्याकडे गेले. त्यांच्या मुमुक्षुतेला आत्मबोधानें कृतार्थ करून आणि नित्योपासनेसाठीं त्यांना एक दत्तमूर्ति देऊन ते वाणीसंगमीं जाऊन राहिले. या ठिकाणीं त्यांचा निवास असतांना एक हृदयस्पर्शी आणि नाट्यमय घटना घडून आली: दासोपंतांच्या अकस्मात् गृहत्यागानें त्यांच्या घरीं शोकानें ठाण मांडलें होतें. बारा वर्षांचा काळ लोटला तरी त्यांचा थांगपत्ता न लागल्यामुळें तत्कालीन पद्धतीप्रमाणें सौभाग्यचिन्हांचा बिधिपूर्वक त्याग करण्याचा शोचनीय प्रसंग त्यांच्या पत्नीवर आला. या करुण गंभीर विधीसाठीं दिगंबरपंत परिवारासह वाणीसंगमावर आले. गोदावरीच्या पलीकडे दिगंबरपंतांचा मुक्काम होता आणि अलीकडे वाघेश्वराच्या मंदिरांत दासोपंतांचा मुक्काम होता. नित्यकर्म आचरीत असतांना दासोपंतांनीं पैलतीरावरील त्या परिवाराकडे पाहिलें आणि दीड तपापूर्वींच्या स्मृति त्यांच्या मनाच्या अन्तस्तलांतून उफाळून वर आल्या. प्रसंगाचें गांभीर्यहि त्यांच्या ध्यानीं आलें. त्यांनीं तिकडे निरोप पाठविला कीं, "ज्या कार्यासाठीं येथें आपण आलां आहां, तें कार्य सध्यां स्थगित करावें."

या निरोपामुळें दिगंबरपंतांचें आशावेडें मन निरोपाचें मूळ शोधूं लागलें. अखेर शोध लागला. वाघेश्वराच्या मंदिरांत दासोपंत आपल्या माता-पित्यांना आणि त्या चिरव्यथित सहचारिणीला भेटले. तो क्षण आनंदानें भरलेला असूनहि अश्रूंनीं भिजलेला होता.

दासोपंतांनीं सर्व परिवाराला स्वतःजवळ ठेवून घेतलें आणि वतनाच्या कारभाऱ्याला नारायणपेठच्या सर्व मालमत्तेचें दानपत्र करून दिलें. कांहीं काळानें ते सहपरिवार आंबें जोगाई येथें आले. आतां ते निश्चिन्त होते. 'कर्मीं अकर्मता' साधण्याचा योग त्यांच्या ठायीं नांदत होता. योगक्षेमाची त्यांना चिन्ता नव्हती. गांवाच्या मध्यभागीं असलेल्या गणेशमंदिरांत त्यांनीं वसति केली. तेथें गणेशदर्शनास आलेल्या सितोपंत देशपांडे नामक एका सत्त्वसंपन्न जिज्ञासूची आणि दासोपंतांची दृष्टभेट होतांच सितोपंतांचें भान हरपलें आणि क्षणैक त्यांचें तनमन आनन्दसमाधींत लीन झालें. सितोपंत सावध झाल्यावर दासोपंतांच्या चरणीं विनीत झाले आणि त्यानंतर त्यांनीं आपल्या गुरूची सर्व व्यवस्था लावून दिली.

आंबें जोगाईस येऊन राहिल्यावर सतत दोन तपें दासोपंतांनीं मराठी शारदेची महापूजा बांधली. आपल्या अनुभवाचा आणि अध्ययनाचा बहुमोल ठेवा त्यांनीं शब्दबद्ध केला आणि महाराष्ट्र-भूमीला कायमचें ऋणी करून ठेवलें. गीता हा त्यांच्या चिन्तनाचा प्रधान विषय. त्यांच्या घरीं गीतार्थ-चंद्रिकेची शीतलता अखंड नांदत होती आणि गीतार्णव हेलावत होता. रोज ढबू पैशाची शाई शब्दांकनासाठीं वापरणाऱ्या या अजब ग्रंथकारानें दोन लाखांवर रचना केली आहे. त्यांचा 'गीतार्णव' म्हणे सव्वालाख ओव्यांचा आहे; तर 'गीतार्थचंद्रिका' पस्तीस हजार ओव्यांची आहे. अशा प्रकारें ६४ वर्षें तपःपुनीत जीवन व्यतीत करून माघ व. ६, श. १५३७ या दिवशीं ते श्रीदत्तात्रेयाच्या विराट् रूपांत विलीन झाले.

दासोपंत हे दत्तात्रेयाचे महान् उपासक होते. हा दत्तोपासनेचा वारसा त्यांना स्वतःच्या घराण्यांतून मिळाला होता. त्याचमुळें जेव्हां त्यांना बेदरच्या बादशहाच्या कारावासांत अडकून रहावें लागलें, तेव्हां त्यांच्या आर्त हृदयानें चिरपरिचित दत्तदेवतेलाच हांक दिली :

**बंदी पडला बालक स्मरे जनका ।**
**प्राण व्येचीत जाई क्षणु येका ॥**
**तुजवांचूनी करुणा न ये आणिका ।**
**तैसी गती बा जाहली माझी येका ॥**

दत्ता धाव रे धाव रे धावणीया ।
मायबापा सांडिसी झणीं माया ॥
तुजवांचूनी न स्मरे योगीराया ।
भवबंधनीं पडलों गुणक्रिया ॥
केवीं राहूं, कवण दिशा पाहूं ।
पंथु न कळे केउता जाऊं ॥

दत्तभक्तीनें रंगलेलीं दासोपंतांचीं असंख्य पदें आहेत. त्यांच्या पदार्णवांत लीलाप्रिय दत्तात्रेय जणुं मुक्तपणें जलविहार करीत आहे, असें वाटतें. 'पदार्णवां'तील प्रकाशित भागांत समाविष्ट झालेल्या दीड हजारांवर पदांतून दासोपंतांचें दत्तवेडें हृदय ओसंडून वहात आहे. दासोपंतांचें प्रधान साहित्य जरी गीता आणि उपनिषदें यांच्या स्पष्टीकरणासाठीं निर्माण झालें आहे, तरी त्यांचें समग्र भावविश्व त्यांच्या पदार्णवांतच आविष्कृत झालें आहे. आजवर दासोपंतांचा परिचय प्रायः त्यांच्या गीतापर रचनेवरून झालेला आहे; परंतु त्यांचीं हृदयंगम पदें अंशतः प्रकाशित[८] होऊनहि महाराष्ट्रांत दुर्लक्षित राहिलीं आहेत.

'कल्पान्तींच्या जळासारखा' आणि 'क्षितिजहीन नभासारखा' तो अपरिमेय दत्तात्रेय दासोपन्तांच्या सर्व भाव-विचारांना व्यापून उरला आहे. श्रीदत्तचरणीं सर्वस्व वाहण्याचा संकल्प जेव्हां त्यांच्या भवविरत मनानें केला, तेव्हांपासून क्रमाक्रमानें ते दत्तस्वरूपाशीं जवळीक करीत राहिले आणि अखेर त्यांतच एकाकार झाले :

मन सुमनसुवर्णी समर्पिलें ध्यानीं,
आतां तें परतोनि न मगें, न मगें !
बा ! हे दृष्टि दर्शनीं समर्पिली वदनीं,
आतां ते परतोनि न मगें, न मगें !
बापा ! शरीर संकीर्तनीं हें दिधलें कीर्तनीं,
आतां तें परतोनि न मगें, न मगें !
वाणी तव स्मरणीं दिधली प्रगर्जनीं,
आतां ते परतोनि न मगें, न मगें !

---

८. दासोपंतांचीं पदें ( महाराष्ट्र सारस्वतमाला ) : का. वा. लेले, पदें १६०५.

**हे पै हस्त दोन्ही दिधले तव भजनीं,**
**आतां ते परतोनि न मगें, न मगें !**
**बा ! मति हे तुझ्या गुणीं अर्पिली निर्वाणीं,**
**आतां ते परतोनि न मगें, न मगें !**
**क्रियाफळें चरणीं अर्पिलीं पूजनीं,**
**आतां ते परतोनि न मगें, न मगें !**
**दिगंबरस्थानीं आत्मत्व ठेऊनि,**
**आतां तें परतोनि न मगें, न मगें !**

असें सर्वस्व-समर्पण झाल्यावर तेथून परत फिरण्याचा विचारहि त्यांच्या मनाला शिवला नाहीं. लौकिकाचे बंध जाचूं लागल्यावर त्यांची विरक्ति अधिकच वाढली; परंतु जननिंदेच्या डागण्याहि सुरू झाल्या. एखाद्या विफल विरहिणीसारखें त्यांचें हृदय दत्तसाक्षात्कारासाठीं तळमळूं लागलें :

**देव गेह सर्व सांडूनि, मी रातलें तुझ्या गुणीं,**
**चाड्र न धरीं लौकिकें, हांसतु कां जन पारिखे,**
**दिगंबरीं मन गुंतलें, तें परतोनि आप भुललें !**

दिन-रजनीच्या सीमा पुसून टाकणारें अखंड दत्तचिंतन सुरू झाल्यावर दासोपंतांच्या आंतल्या डोळ्यांसमोर दत्तावताराचा चित्रपट उलगडूं लागे आणि आपण जणुं त्या अलौकिक दत्तचरित्राचे साक्षी आहोंत, अशा तन्मयतेनें ते गाऊं लागत. कधीं कधीं ‘ गगनीं गहना चमकती ज्वाळा, पावकु उधळला रे । यसणा तपसु दारुणु, ब्रह्मगोळु तडतडिला । ’ असें अत्रीचें दाहक तप त्यांच्या दृष्टीस पडे; तर कधीं ‘ खेळतु खेळतु ऋषिपुत्रांसमवेतु ’ असें बालदत्ताचें चित्र त्यांच्या अन्तश्चक्षूंना आनंद देई. असें दृश्य तरळूं लागल्यावर त्यांचें दत्तवेडें मन पार्थिवाचें गुरुत्वाकर्षण लंघून पुढें जाऊं पाही आणि ‘ जाईन जाईन, दोहीं बाहीं कवळीन ’ असा हट्ट धरून राही. त्या ‘ सांवळ्या सुंदर ’ रूपाचा बाण हृदयांत रुपल्यामुळें त्यांच्या हृदयाची व्यथा असह्य झाली :

**सिद्धराजा ! अमृतजळधरा ! धर्मु न कळे मातें दुसरा,**
**येईन तुज संगें संगें, तूं पुढें मी मागें हेंचि पुरें !**

अशी त्यांची मनःस्थिति बनली. दत्तसंगासाठीं संसारसर्पाचें गरळहि उरीं पचविण्याचें सामर्थ्य त्यांनीं दाखविलें. तापत्रयाचा दाह त्यांनीं मूकपणें सहन केला. ' दिगंबरा ! तूं मी होईन, मग दंडु तोही मी साहीन ' एवढी त्यांची तयारी होती.

**असतां वो संसारीं हृदयकोशपुरीं—**
**मी माझा मंदिरीं, चोरटें आलें,**
**माझें नेलें हो सुपाणी माये, मनमोती चोरूनी**
**चिद्रत्नें आंगणीं विखुरलीं माये !**

त्या ' चोरट्या 'नें या प्रेमिकेच्या सुढाळ ' मनमोत्या 'ची चोरी केली, परंतु या चोरीच्या वेळीं त्याची इतकी धांदल उडाली कीं, जातां जातां त्याच्या अंगावरील चिद्रत्नें तिच्या अंगणांत विखुरलीं. त्या 'प्रीतीच्या खुणां 'नीं या प्रेमिकेच्या हृदयाची विव्हलता पराकोटीला पोंचली :

**वियोगताप वर्णूं माये, खरतरु तपे भानु,**
**देहीं हुताशनु प्रकटु जाला !**
**मज न साहे चंदन, अवो ! चंद्रामृतपान,**
**सुरसही गायन तें विष जालें !**
**जीवनें बोळे तान, काय तेथें घृतपान ?**
**क्षुधा अन्नें वीण तैसीचि माये !**
**हरिलें तेवीं मन या दिगंबरें बोधन,**
**तेणें वीण हे प्राण वेंचती माये !**

तनामनाचा इतका असह्य दाह होऊं लागल्यावर त्या कृपाघनाला हांक देण्याशिवाय अन्य मार्गच नव्हता. त्याच्या दिठींतलि अमृताच्या वृष्टींत एकदां जीवन न्हाऊन निघालें कीं, व्यथेचें अस्तित्वच उरणार नाहीं, याची या प्रेमिकेला खात्री होती :

**बापयाकारणें मेघु बोळे अंतराळीं,**
**घनु बोळे अंतराळीं,**
**तैसी मी चातकु तरी येईं यये काळीं !**

पाहीन रे, वाट पाहीन रे!
न येसील तरी प्राणु देईन रे!
दिगंबरा, तुजवीण नेणे आन कांहीं,
आत्मया! सद्गुरु! कधीं बोळसी हृदयीं?

अखेर या विरहिणीची वेदना त्या कृपाघनाच्या कानीं गेली आणि त्याच्या आगमनाचे शुभशकुन जाणवूं लागले.

सांवळा सुंदरू वो! देखिला आदिगुरू!
मन माझें उतावीळ, कैसें मी करूं?
तें मी कैसें सांवरूं?

मनाच्या कक्षांना आनंदाची दाटणीहि सहन होईना. अखेर त्या 'गगनाहुनि वाड' आनंदानें मन उन्मन झालें आणि 'द्वैताची चाड' मोडून गेली :

दिनु हारपे दिनमानीं, निशा निशीमानीं,
शशी सूर्य दोन्ही, विरे प्रपंचु गगनीं!
ऐसें देखणें देखावें, न लगे योगें शिणावें,
नभ जिरे नभापोटीं, तईं दिगंबरीं भेटी!

अशा प्रकारें, दासोपंतांच्या हृदय-विरहिणीनें लौकिकाचीं वसनें दूर सारून या अलौकिक दिगंबराच्या रूपाशीं एकरूपता साधली. स्वतः कृतकृत्य झाल्यावर दासोपंतांनीं अनेकांना वाट दाखविली आणि दत्तात्रेयाचें महिमान गाण्यासाठीं आपलीं हृदयवीणा सदैव झंकारत ठेवली.

दासोपंतांची दत्तोपासना आनंद संप्रदायाशीं संबद्ध आहे, असें सांगितलें जातें. परंतु दासोपंतांनीं स्वतः आपल्या शिष्य-साधकांसाठीं दत्तात्रेयाच्या उपासनेची एक विशिष्ट पद्धति आंखून दिली आहे. "प्रत्येक दिवशींचा उपासना-विधि, सात वारांचीं वेगवेगळीं भजनें, पर्वकाळाचीं आणि उत्सवाचीं विशेष भजनें, पदें, आरत्या, शेजारत्या, अष्टकें, स्तोत्रें हें सर्व त्यांनीं आंखून व रचून ठेवलें आहे. विशिष्ट प्रसंगीं करावयाचीं ललितें, संगीत, टिपऱ्या यांचीहि रचना केलेली आहे. नित्यपाठासाठीं दशनाम, शतनाम, सहस्रनाम, स्तवराज, माहात्म्यें हींहि तयार करून दिलेलीं आहेत....उत्सवपद्धति, सेवा,

अर्चन, उत्तरार्चन यांची देखील शिस्त त्यांनींच घातलेली आहे....मूर्तीच्या नित्यस्नानासाठींहि कांहीं नियम आहेत. 'आनंदें दत्तात्रेय देवदेव' हा दासोपंत परंपरेंतील जयघोष आहे."[९] दासोपंतांच्या परंपरेंत दत्तात्रेयाचे सोळा अवतार मानलेले आहेत आणि त्यांच्या जन्मोत्सवांच्या निरनिराळ्या तिथीहि ठरलेल्या आहेत. (हे सोळा अवतार व त्यांच्या जन्मोत्सवांच्या तिथि पहिल्या प्रकरणांत पृ. १५-१६ वर दिलेल्या आहेत.) या सोळा अवतारांशिवाय प्रत्यक्ष दासोपंत हे सतरावे 'श्रीसर्वज्ञावतार' मानले जातात आणि त्यांचा जन्मोत्सव भाद्रपद व. ८ रोजीं प्रतिवर्षी साजरा होतो. आंबें जोगाई येथें दासोपंतांचा ऐहिक आणि पारमार्थिक असा उभयविध वंश नांदतो आहे. तेथें त्यांचें देवघर आहे आणि त्या देवघरांत त्यांचा ग्रंथसंग्रह सुरक्षित आहे. अर्थात् हा संग्रह संपूर्ण नाहीं. काळाच्या कराल करांनीं त्यांतला बराच अंश लुटून नेला आहे. पण जें उरलें आहे तेंहि लाख मोलाचें आहे. त्यांत दासोपंतांच्या हृदयांतील विराट् संगीत सुप्त आहे. त्या संगीताचा स्पर्श ज्या भाग्यवंताच्या हृदयाला होईल, त्याचें हृदय दत्तप्रभूच्या ओठांवर बांसरी बनून राहील!

## मुक्तेश्वर (इ. स. चें सतरावें शतक):

'मराठी शारदेचा कालिदास' अशी ज्याची ख्याति आहे, तो महाकवि मुक्तेश्वर एकनाथांच्या मुलीचा मुलगा. कुरुंदवाडपासून एक मैलावर मुक्तेश्वराचें तेरवाड गांव आहे. त्याच्या पित्याचें नांव चिंतामणि आणि मातेचें नांव गंगा (गोदावरी वा लीला). त्याचें गोत्र अत्रि आणि मूळ नांव मुद्गल. सोनारीचा भैरव आणि कोल्हापूरची महालक्ष्मी या त्याच्या कुलदेवता. व्यास-वाल्मीकींच्या प्रतिभेचा वारसा घेऊन आलेला हा मराठी शारदेचा सुपुत्र शेंकडों रसिकांना प्रिय आहे. त्यानें रचलेल्या मराठी महाभारताची मोहिनी अपूर्व आहे. उत्तुंग कल्पनाशक्ति, भावनेचा अबाध प्रवाह आणि भाषेचा रमणीय विलास यांमुळें त्याचें काव्य सरस सुंदर झालें आहे. प्राचीन मराठी साहित्यांत एकमेव कलाकवि म्हणून त्याचें स्थान आहे. आज त्याच्या महाभारताचीं पांचच पर्वें उपलब्ध झालीं आहेत;

---

९. दासोपंतांची पासोडी : सं. न. शे. पोहनेरकर, प्रस्तावना पृ. १७.

परंतु तेवढ्या भागाच्या वाचनानें रसिकांना उर्वरित भागाच्या अभावाची चुटपूट लागून राहते. मानवी स्वभावाचे अनेक नमुने आणि ऋतुचक्रांतील सौन्दर्याच्या हृदयंगम छटा त्यानें समर्थपणें चितारल्या आहेत.

नाथ जसे दत्तोपासक होते, तसा हा त्यांचा शारदोपासक नातूहि दत्तभक्त होता. तो स्वतःला 'दत्ताच्या पदकमळांतील भ्रमर' म्हणवीत असे. त्याला दत्तभक्तीची प्रेरणा आजोबांकडून मिळाली, कीं त्याच्या गांवाशेजारच्या विख्यात दत्तक्षेत्रांतून ( नरसोबाची वाडी ) मिळाली, हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. त्याच्या श्रद्धाकेंद्रांत नाथांचें स्थान मोठें आहे. अलीकडेच मुक्तेश्वराचें रामायणहि अंशतः उपलब्ध होऊं लागलें आहे. श्री. कानोले यांना मुक्तेश्वरकृत युद्धकांडाचें एक अपूर्ण हस्तलिखित मिळालें आहे आणि त्याच्या उत्तरकांडाची एक प्रत मीं नुकतीच मुंगी येथील सनातन मठांत पाहिली आहे. या रामायण-रचनेची स्फूर्ति त्याला नरसोबाच्या वाडीस मिळाली, असें तो सांगतो :

**एका जनार्दना शरण । उत्तरकांड रामायेण ।**
**संतकृपेनें जालें संपूर्ण । सकळलोकतारक ॥ २०१ ॥**

**पवित्र सरिता कृष्णवेणी । पंचगंगा समस्थानीं ।**
**नृसिंह सरस्वतींचे चरणीं । ग्रंथप्रसाद लाधला ॥ २०२ ॥**

**तेथ जाली देववाणी । ग्रंथ पावावा प्रतिष्ठानीं ।**
**येकनाथाचिये सदनीं । विस्तारेल जनसुखे ॥ २०३ ॥**

मुक्तेश्वराचें दत्तमंदिर तेरवाडला अजूनहि उभें असून त्यांत त्याच्या पूजेंतील श्रीदत्तात्रेयाच्या पादुका आहेत.[१०] दत्तात्रेय हें त्याचें सद्गुरुस्वरूप उपास्य आहे. त्याच्या ग्रंथरचनेंत दत्तभक्तीचा धागा सर्वत्र अनुस्यूत आहे :

**विश्वेश लीलाविश्वंभरु । दत्तात्रय जगद्गुरु ।**
**तत्प्रसादें मुक्तेश्वरु । निरोपी तें पारिसावें ॥** आदि. २६. १२२
**चिन्मूर्ति लीलाविश्वंभरु । दत्तात्रय जगद्गुरु ।**
**त्याचेनि नामें मुक्तेश्वरु । कथा बोले भारती ॥** आदि. ३३. ३८

१०. आदिपर्व, खं. २ : सं. अ. का. प्रियोळकर ( चित्रें पहा ).

**लीलाविश्वंभर स्वामिया । दत्तात्रय जगदात्मया ।**
**मनोभावें वंदूनि पायां । मुक्तेश्वर अनुवादे ॥** आदि. ४६. १०१
**लीलाविश्वंभर ईश्वरु । दत्तात्रय जगद्गुरु ।**
**ज्याचेनि नामें भवसागरु । मागा तरले असंख्य ॥** सभा. १. ६
**ॐ नमोजी विश्वंभरु । तो देव दत्तात्रय जगद्गुरु ।**
**जनार्दना अभयकरु । कटाक्षेंसी बाणला ॥** नाथचरित्र
**मुक्तेश्वराचा श्रीगुरु । दत्तात्रय परब्रह्म अवतारु ॥** हनुमंताख्यान.

यावरून असें दिसून येईल कीं, मुक्तेश्वर हा दत्तात्रेयाच्या 'लीलाविश्वंभर' या स्वरूपाचा उपासक होता. लीलाविश्वंभर हा दत्तात्रेयाच्या सोळा अवतारांपैकीं सहावा होय.[11]

आपली दत्तभक्ति सुचविण्यासाठीं मुक्तेश्वर स्वतःस 'अवधूत' म्हणवून घेतो. त्याच्या दत्तस्वरूपाचें वैशिष्ट्य असें कीं, तो शिवस्वरूप आहे. मुक्तेश्वराचें मूळ नांव मुद्गल, हें प्रारंभींच सांगितलें आहे. मुक्तेश्वर हें त्याचें आराध्य दैवत. आपल्या सर्व ग्रंथरचनेंत त्यानें आराध्य देवतेचें नांवच स्वतःचें नांव म्हणून स्वीकारलें. गोदा-प्रवरासंगमावरील कायगांव येथील मुक्तेश्वराचें शिवस्थान हेंच त्याचें उपास्य असावें. त्याला प्रिय असलेला लीलाविश्वंभर दत्तात्रेय आणि हा मुक्तेश्वर त्याच्या कल्पनेंत एकरूप आहे. मुक्तेश्वराला (शंकराला) तो 'अवधूत' असें विशेषण लावतो. शिव आणि दत्तात्रेय यांच्या एकरूपतेचें मुक्तेश्वरकृत विवरण अभिनव असून दत्तस्वरूपावर एक वेगळाच प्रकाश टाकणारें आहे. शिवाचें त्रिमूर्ति-स्वरूप म्हणजेच दत्तात्रेय, अशी त्याची कल्पना आहे : -

**कां नाभिपादांत कमळासनु । मध्यकंठांत रमारमणु ।**
**स्कंधावरुता त्रिलोचनु । अंगत्रयीं जो यकु ॥**

मुक्तेश्वराच्या या त्रिमूर्तिशिवस्वरूप दत्तात्रेयाचें मूळ शोधल्यास दत्तदेवतेच्या विकासक्रमांतील एक रहस्य हातीं लागेल, असें वाटतें. मुक्तेश्वरापूर्वीं दासोपंतहि दत्तात्रेयाचा उल्लेख 'लीलाविश्वंभर' या पदानें करतात आणि दत्तभक्तीइतक्याच उत्कटतेनें शिवस्तुतीचीं गीतें गातात. मुक्तेश्वराचें

११. श्रीवासुदेवानंद सरस्वती-कृत श्रीदत्तात्रेयषोडशावतारजयंतीकल्पम्, पृ. ५४.

अज्ञात साहित्य हळूहळू उपलब्ध होऊं लागलें आहे. त्याची खास दत्तविषयक रचना जर असेल, तर त्याच्या दत्तविषयक कल्पनांचीं मूळें हातीं लागतील.

**निरंजन रघुनाथ (श. १७०४–१७०७) :**

या थोर दत्तोपासकानें आपलें हृदयंगम आत्मचरित्र लिहून ठेवलें आहे. प्राचीन मराठींतील अपवादात्मक आत्मचरित्रांत याची योग्यता बहिणाबाईच्या आत्मचरित्राच्या बरोबरीची आहे. या आत्मचरित्राच्या प्रकाशांत आपण निरंजन रघुनाथांचें जीवन न्याहाळूं या.

निरंजन रघुनाथांचें मूळ नांव अवधूत. कौशिकगोत्री आश्वलायनशास्त्रीय देशस्थ ब्राह्मण. मातेचें नांव लक्ष्मी आणि पित्याचें नांव श्रीधरपंत. श्रीधरपंत कळंब[१२] या गांवचे कुलकर्णी होते. निरंजन रघुनाथांचा जन्म कळंब येथें कार्तिक शु. ८ श. १७०४ या दिवशीं पंच पंच उषःकालीं झाला. माहूरची रेणुका ही त्यांची कुलस्वामिनी होती. घरची परिस्थिति गरीबीची असल्यामुळें नोकरीनिमित्त ते पुण्यास आले. तेथें नष्टे या नांवाच्या हुंडेकऱ्याकडे कारभारी म्हणून ते नोकरी करूं लागले. या पुण्याच्या निवासांतच त्यांच्या विरक्तीचा उदय झाला. पुण्यांत विष्णुमंदिरांत ठाकुरदासबाबांचीं[१३] कीर्तनें होत असत. त्यांच्या 'निःस्पृह कीर्तनां'ची कीर्ति सर्वत्र पसरली होती. ही कीर्ति ऐकून एके दिवशीं निरंजन रघुनाथहि कीर्तनास गेले. तें हृदयस्पर्शी कीर्तन ऐकून निरंजन रघुनाथांची वृत्ति पालटली :

ऐसें ऐकुनी कीर्तन । माझें दचकलें अंतःकरण ।
नेत्रीं पातलें जीवन । कंठ दाटून तो आला ॥
पाठीं उभे राहिले कांटे । शरीर कांपे थरथराटें ।
बोलूं जातां कंठ दाटे । शब्द होटीं न निघती ॥
वाटे आतांचि येईल मरण । म्यां कांहीं न केलें साधन ।
व्यर्थ गमाविलें जिणें । विषयमदें करूनी ॥

---

१२. हें गांव बालाघाटीं वंजरा नदीच्या तीरावर परळी वैजनाथाच्या पूर्वेस चार योजनांवर आहे. (ता. धारूर. बार्शी-लातूर रेल्वेलाइनवरील कळंबरोड स्टेशनपासून १२ मैलांवर.)

१३. महाराष्ट्र कविचरित्र, भा. ६, पृ. २१३–२२३.

कीर्तन संपतांच ते ठाकुरदासांजवळ गेले आणि आपलें प्रवृत्त्यंतर त्यांना निवेदन केलें. तें ऐकून ठाकुरदास म्हणाले : ‘ तूं होशील रे नारायण ! ’ ते शब्द शुभशकुनासारखे कानीं सांठवून निरंजन रघुनाथ मंदिराबाहेर पडले, परंतु मुक्कामावर गेले नाहींत. एका वाण्याच्या घरीं रात्र काढून दुसऱ्या दिवशीं सकाळीं ते पुण्याबाहेर पडले. गांवाबाहेर पडतांच एक जोगी भेटला. त्याला जवळचा लोटा देऊन टाकला आणि पुढील वाट धरली. चालतां चालतां ते चिंचवडला आले. तेथें एका बैराग्याला जवळचा ‘ दुपाटा ’ देऊन टाकला. नंतर ते देहूस गेले. देहूस आल्याबरोबर तुकोबांच्या स्मरणानें त्यांची वृत्ति भारावून गेली. मनाची विरक्ति अधिकच वाढली. इंद्रायणीच्या पात्रांत स्नान करीत असतांना त्यांनीं प्रतिज्ञा केली :

मग करसंपुटीं जळ घेऊन । सांडिलें संकल्पा लागून ।
जीव भाव मन प्राण । गुरु-अर्पण केलासे ॥
हृदयीं ठेविला नेम करून । आजपासून द्वादश महिंने ।
उपरी सात दिन जाण । देह धारण करणें हा ॥
मजला दत्तात्रयदर्शन । झालिया ठेवीन हा प्राण ।
नाहीं तरी देह अर्पण । केला असे गुरुपायीं ॥
ऐसा करूनि निश्चय अंतरीं । साक्षी तुकोबा बाहेरीं ।
वाचे करुनि दीर्घस्वरीं । तेथें वदता जाहलों ॥

तुकोबांच्या साक्षीनें हा संकल्प केल्यावर त्यांनीं कौपीन धारण केली आणि—

काढिली लज्जेची गवसणी । निर्लज्ज शस्त्र हातीं घेउनी ।
त्याचि ग्रामांत जाउनी । भिक्षाटण पैं केलें ॥

साधनेच्या वाटेवर पहिलें पाऊल टाकलें आणि पुढील वाटचाल सुरू झाली. मुखीं दत्तनामाचें चिंतन सुरू होतें. तीन दिवस अन्नपाण्यावांचून कांट्याकुट्यांतून आणि डोंगरदऱ्यांतून वाट तुडवीत ते ‘ घोडनगरी ’ येथें आले. तेथें भिकोबा नांवाच्या सत्पुरुषाकडे राहिले. त्यांनीं दिलेली एक गोधडी आणि नरोटी घेऊन पुढें ब्राह्मणवाड्यास आले. तेथें एका कानफाट्याच्या मठांत राहिले. निरंजनांचा निग्रह समजल्यावर त्या कानफाट्यानें त्यांना गिरनारवर जावयास सांगितलें. त्यानंतर ते जुन्नरास आले. तेथें

ठाकुरमंदिरांत थांबले. त्या मंदिरांत बैराग्यांचा समूह होता. त्यांनीं यांचा उपहास सुरू केला :

एक म्हणती झाला वेडा । एक म्हणती निःसंग उघडा ।
एक म्हणती बुद्धि प्रौढा । वेडा कैसा म्हणावा ॥
एक म्हणती मंत्र चळला । एक म्हणती भांग प्याला ।
एक म्हणती कासया आला । जाई ग्रामाभीतरीं ॥
एक म्हणती असों द्या परता । एक म्हणती सत्य म्हणतां ।
परि कांहीच होईल कांहीं करतां । वस्त्र पात्र संरक्षा ॥

जुन्नर येथें कुशाबा नामक एक बालोन्मत्तपिशाचवत् सत्पुरुष होता. त्याचें दर्शन घेऊन ते कोतूळहून अंकुल या गांवीं आले. तेथें चंडीदासबोवा नांवाचे संस्कृतज्ञ सत्प्रवृत्त गृहस्थ होते. त्यांच्याकडे निरंजन रघुनाथ राहिले. तेथें एकादशस्कंधावर पुराण ऐकतांना त्यांची दत्तदर्शनाची ओढ अधिकच वाढली. अंकुलास राहत असतांना कार्तिक शु. ९, श. १७३३ ( प्रजापति संवत्सर ) या दिवशीं त्यांचें सगुणध्यान सफळ होऊन त्यांना श्रीदत्तात्रेयाचा स्वप्नसाक्षात्कार झाला :

हृदयांतरीं करितां ध्यान । हें देहीं गेलों विसरून ।
तेथिंचा आनंद पाहून । वृत्ति शून्य पैं झाली ।
ऐसें एक घटिकापर्यंत । वाटे पाहतों स्वप्नांत ।
जे कां रचना मूर्तिमंत । मनोमय योजिली ॥
ऐसें पहातां तेचि वेळीं । कर्मरेषा विचित्र बळी ।
दत्तात्रयमूर्ति हृदयकमळीं । मातें जाली बोलती ।
तेयें मनाची मूर्ति सान । ते श्रीगुरूंनीं हृदयीं आलिंगून ।
मुखासीं लावूनि माझा कान । मंत्र झाले बोलती ॥

अंकुलास असतांना त्यांच्यावर एक विलक्षण संकट आलें. एका तरुण मुलीचा पति तिला सोडून निघून गेला होता. निरंजन रघुनाथांकडे पाहून, रूपसाम्यामुळें तिनें आईबापांस सांगितलें कीं, ‘ माझा नवरा जोगडा बनून आला आहे !’ या सकटांतून सुटतां सुटतां निरंजन रघुनाथांची त्रेधा झाली. त्यांनीं कळवळून आपलें पूर्ववृत्त निवेदिलें आणि सुटका करून घेतली.

तेथून ते सिन्नरास आले. तेथें अग्निकुंडावर स्नान करून देपुरास गेले. तेथें बाबाजी भागवत या आतिथ्यशील गृहस्थांकडे आठ दिवस राहून व शिंग्रास बाळकरामबाबा नांवाच्या सत्पुरुषाचें दर्शन घेऊन त्यांनीं नाशिक गांठलें :

जें कां सर्व देशाचें नासिक । योगिवृंदाचें येतसें पीक ।
तें हें सुक्षेत्र नाशिक । दृष्टीलागीं पाहिलें ॥
सर्वेचि दिठीं देखिली गंगा । जे त्रितापशमनी भवगंगा ॥
वसे सांबाचे अर्धांगा । जे श्रीरंगा आवडती ॥

नाशिक येथेंच त्यांना गुरुलाभ झाला. रघुनाथस्वामी[१४] नामक सत्पुरुषानें त्यांना गुरुबोध दिला आणि त्यांच्या उत्कट भावनेला ज्ञानाची दृष्टि दिली. श. १७३३ मध्यें कार्तिकांतील अमावास्येच्या रात्रीं निरंजनांच्या हृदयांत बोधाची पौर्णिमा उजळली. त्यानंतर श्रीसद्गुरूंनीं त्यांना योगांतील अनेक रहस्यें आणि परमार्थांतील अनेक क्षणानुभव यांचा प्रत्यय आणून दिला. त्यानंतर गुरुमठांत दत्तजयंतीचा सोहळा साजरा करून आणि गंगातीरावर आपल्या आत्मवृत्ताचा पूर्वार्ध[१५] शब्दबद्ध करून त्यांनीं गिरनारचें प्रस्थान ठेवलें. नाशकास त्यांचा मुक्काम दीड महिना होता. ज्यानें हृदयांत बोधाचें अखंड चांदणें निर्माण केलें, त्या सद्गुरूचा निरोप घेतांना निरंजनांचें हृदय विकल झालें :

मस्तकीं वंदिली चरणधुळी । रोमांच उठिले तये वेळीं ।
आसुवें आलीं नेत्रकमळीं । बाष्प कंठीं दाटला ॥
स्फुंद स्फुंदोनी करी रुदन । गुरुमुखातें अवलोकून ।
वाटे केव्हां होईल येणें । गुरुचरणाजवळिकें ॥

सद्गुरूंचा आशीर्वाद घेऊन निरंजन निघाले. नाशिकाहून ते त्र्यंबकेश्वरीं आले. तेथें त्र्यंबकेश्वराचें दर्शन घेऊन आणि ब्रह्मगिरीची प्रदक्षिणा करून तीन दिवस गांवांत काढले. तेथें असतांनाच सद्गुरूंचें एक परमार्थपथ-प्रदर्शक पत्र आलें.

---

१४. हे रघुनाथस्वामीहि दत्तोपासकच होते. निरंजनांनीं त्यांचें चरित्र २९६ ओव्यांत ग्रथित केलें आहे.

१५. स्वात्मप्रचीति, ओवीसंख्या ५६५ ( निरंजन रघुनाथांचे ग्रंथ : सं. य. त्र्यं. कोल्हटकर ).

त्यानंतर अनन्त हाल-अपेष्टा सहन करीत, निर्जन वनप्रदेश रात्रंदिवस तुडवीत आणि वाटेंत अनेक भलेबुरे अनुभव पदरीं बांधीत ते कोंकण ओलांडून गुजरातमध्यें शिरले. धर्मपूर या राजधानीच्या ठिकाणीं ते सात दिवस राहिले. या ठिकाणीं राहत असतांना त्यांनीं बरीच कवित्वरचना केली. तेथें त्यांना एका स्वामिनारायणपंथी दांभिकाचें दर्शन झालें. तिथला मुक्काम संपत आल्यावर नाशिकाकडे जाणाऱ्या एका ब्राह्मणाकरवीं त्यांनीं आपल्या गुरुदेवांना एक भावनामय पत्र दिलें. त्यानंतर ते सुरतेला गेले. तेथील तीन दिवसांच्या वास्तव्यांत शंकरस्वामी नांवाच्या एका वाममार्गी साधकाची भेट झाली.

सुरतेहून ते बडोद्याला गेले. तेथें राममंदिरांत एक पूर्णप्रज्ञ आणि प्रतीति-संपन्न संन्यासी होते. त्यांचा आशीर्वाद घेऊन ते ढवळकें येथें गेले. तेथें रुद्राक्षाकार शिवलिंगाचें दर्शन घेऊन त्यांनीं पुढील वाटचाल सुरू केली. गुजरात संपून काठेवाडचा प्रदेश सुरू झाला.

उष्ण जैशा भाजती लाह्या । कोठें नसे वृक्षछाया ।
उदक शीतल प्राशावया । न मिळेंचि सर्वथा ॥
चव चव कोसांचें रण । मार्गांत कांटे बहुसघन ।
सर्वदा पायांत भेदून । रुधिर वाहे भडभडा ॥
असा, अंतरीं करुनिया ध्यान । श्रीदत्ताचें नामस्मरण ।
निजवाचेसि उच्चारून । मार्गक्रमण करीतसे ॥
श्रीदिगंबराचें कीर्तन । करोनि वर्णीत जावे गुण ।
सद्गदित कंठ होऊन । प्रेमभरित अंतरीं ॥
आसुवें येवोनि नेत्रासी । खेद होवोनि मानसीं ।
वाटे केव्हां पायापाशीं । जाईन मी श्रीगुरूच्या ॥
चार घटिकांपर्यंत । बसावें मार्गांमाजीं रडत ।
अंतरीं वाटतसे खंत । दिगंबरभेटीची ॥

अखेर गिरनार दृष्टीच्या टप्प्यांत आला. दहा योजनें अंतरावरून गिर-नारचें शिखर दिसूं लागलें. गुरूनें उपदेशिलेल्या सगुणध्यानाचा क्रम तीन महिने चालला होता. त्या ध्यानाला 'ध्येयदर्शना'चें फळ पुनः एकदां

उत्कट स्वरूपांत लाभलें. जुनागड आदि ठिकाणें ओलांडून अखेर ते गिरनारवरवर आले. पर्वतावरील सर्व पवित्र स्थानें पाहून त्यांनीं गिरिप्रदक्षिणा केली. परंतु तें स्वप्नांतील ध्यान कांहीं प्रत्यक्ष गोचर होईना. मनांतील विकलता सारखी वाढत होती. तशाच अवस्थेंत द्वारकेला जाऊन ते पुनः गिरनारवर आले. संकल्पाची मुदत संपत आली होती. ते निग्रहानें शिखरावर गेले आणि दत्तात्रेयाच्या पादुकांजवळ त्यांनीं धरणें धरलें. तीन दिवस अन्नपाण्यावांचून काढले. उपवासानें गात्रें क्षीण होऊन गेलीं होतीं. इतकें होऊनहि दत्तदर्शन होत नाहीं, असें दिसल्यावर त्यांनीं एक भला मोठा पाषाण आणला आणि तो दत्तपादुकांजवळ ठेवून गुरुस्मरणपूर्वक त्याच्यावर डोकें आपटून घ्यावयास प्रारंभ केला :

जैसें श्रीफळ देवाप्रती । नवस करूनि फोडिती ।
शकलें वेगळालीं होतीं । क्षण एक न लागतां ॥
तयापरी मस्तक उचलून । पाषाणावरी मारिलें जाण ।
भडभडा रुधिर आंतून । यावयासी लागलें ॥
सर्वेचि त्यापरी दुसऱ्यानें । ताडितां झालों बहुसत्राणें ।
तंव मस्तक होवोनि छिन्नभिन्न । अचेतन पडियेलों ॥
तों इतुकियांत श्रीदत्तात्रया । षड्भुज मूर्ती सावयवा ॥
ध्यान केलें होतें बरवें । तयापरी प्रगटले ॥

अशा प्रकारें कृतार्थ होऊन आणि दत्तदर्शनाची खूण भाळीं मिरवून निरंजन गिरनारहून खालीं उतरले. हा जीवनसिद्धीचा सोहळा त्यांना भाद्रपद कृष्ण ११ ( सोमवार ), श. १७३४ या दिवशीं सकाळच्या वेळीं अनुभवावयास मिळाला. त्यानंतर प्रभास आणि सोमनाथ या तीर्थांचें दर्शन घेऊन तें समुद्रमार्गें मुंबईस आले आणि तेथून तीन दिवसांत नाशकास गुरुचरणांजवळ येऊन पोंचले. सर्व वृत्त गुरुदेवांना निवेदून त्यांनीं आत्मचरित्राचा उत्तरार्ध[१६] नाशिक येथेंच गोदातीरावर कार्तिक शु. ११, श. १७३४ मध्यें पूर्ण केला.

केवळ एक वर्षाच्या अवधींत मुमुक्षुतेपासून मुक्तीपर्यंतची वाट आक्रमिणारा हा परमार्थाचा प्रवासी अजब आहे. निरंजनांचें आत्मचरित्र म्हणजे

१६. साक्षात्कार, ओंवीसंख्या ७०७ ( निरंजन रघुनाथांचे ग्रंथ : सं. य. व्यं. कोल्हटकर ).

कठोर साधनेचा एक रोकडा प्रत्यय आहे. हें आत्मचरित्र गुरुदेवांच्या पुनर्भेटीपर्यंत पुरें करून आणि तें गुरुचरणीं अर्पण करून त्यांनीं नाशिक सोडलें. त्यानंतरहि त्यांची भ्रमन्ती थांबली नाहीं. कळंब, जुन्नर, सप्तशृंगी, वळवडें (कोल्हापूर प्रांत) या क्रमानें त्यांचीं स्थलान्तरें चालू होतीं. वळवडें येथें त्यांचा निवास असतांना मिरजचे अधिपति श्रीमंत गंगाधरराव बाळासाहेब पटवर्धन यांच्या कानीं त्यांची कीर्ति गेली आणि त्यांनीं निरंजनांना मिरजेस आणून त्यांचा अनुग्रह घेतला ( सुमारें श. १७६७ ).

आत्मचरित्रात्मक दोन प्रकरणांखेरीज निरंजनांची बरीच ग्रंथरचना आहे. ‘ अनुभवामृतपदबोधिनी ’, ‘ आत्मबोधप्रकाशिनी ’ ‘ केनोपनिषत् ’, ‘ रघुनाथचरित्र ’, ‘ केशवचैतन्यकथाकल्पतरु ’ हे त्यांचे ग्रंथ प्रकाशित झाले आहेत. याशिवाय त्यांनीं अनेक पदपदांतरेंहि केलीं आहेत. ‘ अनुभवामृतपदबोधिनी ’ ही अमृतानुभवावरील गद्य टीका त्यांच्या प्रज्ञेचें आणि प्रतीतिचें प्रत्यंतर घडविणारी आहे. ही सर्व ग्रंथरचना त्यांनीं जीवनाच्या अखेरच्या दहा वर्षांत मिरजेंत केली आणि भाद्रपद शु. ११, शके १७७७ या दिवशीं कृष्णामाईच्या प्रवाहांत जलसमाधि स्वीकारली.

मिरजच्या किल्ल्यांत त्यांनीं स्वहस्तें स्थापिलेली एकमुखी षड्भुज दत्ताची मूर्ति आजहि या अनन्यभक्ताच्या खडतर साधनेची कहाणी कौतुकानें उरीं सांठवून उभी आहे.

**नारायणमहाराज जालवणकर ( श. १७२९-१७८९ ) :**

हे निरंजन रघुनाथांचे शिष्य होत. त्यांचें जालवण गांव झांशीनजीक आहे. त्यांचे वडील श्री. तात्या पुराणिक हे स्थानिक राजातर्फे पुराण सांगण्याचा व्यवसाय करीत. आषाढ वद्य ५ श. १७२९ रोजीं नारायणमहाराजांचा जन्म झाला. ते एक वर्षाचे झाल्याबरोबर त्यांची आई निवर्तली. पुढें त्यांच्या आजीनें त्यांना सांभाळलें. आठव्या वर्षीं त्यांची मुंज झाली आणि दहाव्या वर्षीं विवाह ! परंतु संसारांत रमण्यासारखी त्यांची वृत्ति नव्हती. विवाहानंतर थोड्याच दिवसांत त्यांनीं घर सोडलें आणि मथुरेस गोवर्धनबाबा नांवाच्या हठयोग्याजवळ योगाध्ययनासाठीं ते चार वर्षें राहिले.



निरंजन रघुनाथ

( शके १७०४–१७७७ )



निरंजन रघुनाथांनी स्वहस्ते
मिरज किल्ल्यांत बसविलेली दत्तमूर्ति



**निर्गुण पादुका व दत्तमूर्ति**
( गाणगापूर )



**एकमुखी षड्भुज दत्त**
( गंगानाथ मठ, गंज पेठ, पुणे २ )

इकडे त्यांच्या वडिलांनीं त्यांचा शोध चालविलाच होता. एके दिवशीं मथुरेस आलेल्या जालवणच्या एका माणसानें यमुनेच्या कांठीं त्यांना पाहिलें आणि घरीं चलण्याचा आग्रह केला. परंतु त्यांनीं दाद दिली नाहीं. तेव्हां त्या माणसानें त्यांच्या गुरूची गांठ घेऊन सर्व वृत्त त्यांना सांगितलें. नारायणमहाराज मठांत आल्यावर त्यांना परत घरीं जाण्याबद्दल गुरूनीं आज्ञा केली. गुर्वाज्ञेनुसार ते घरीं आले आणि दोन वर्षें घरींच राहिले. या काळांत त्यांना एक मुलगा झाला; परंतु जन्मानंतर आठ दिवसांच्या आंतच तो मुलगा व त्याची आई निवर्तली. या घटनेनंतर नारायणमहाराज पुनः घराबाहेर पडले आणि गिरनारवर आले. गोवर्धनबाबांनीं त्यांना सुचविलें होतें कीं, " तूं गिरनारवर तप करून दत्तदर्शनाची प्राप्ति केलीस तर तुझ्या आत्म्याला चिरशान्ति लाभेल." गुरूच्या या आदेशानुसार त्यांनीं चौदा दिवसपर्यंत गिरनारवर धरणें धरलें. चौदाव्या दिवशींहि दत्तदर्शन होत नाहीं, असें पाहून देहत्याग करण्यासाठीं ते पर्वताच्या कड्यावरून उडी मारूं लागले. तोंच तेथें एक उग्र फकीर उपस्थित झाला आणि त्यानें हात धरून त्यांना रोखलें. त्यांचा हेतु समजावून घेऊन त्या फकिरानें त्यांना एका गुहेंत नेलें आणि तेथें आपलें सत्यस्वरूप प्रकट करून त्यांचें समाधान केलें.

गिरनारवर फकीररूपी दत्तात्रेयानें नारायणमहाराजांना निरंजनस्वामींच्या स्वाधीन केलें आणि पुढें ते चार वर्षें निरंजनस्वामींजवळ राहिले, असें सांगितलें जातें. परंतु निरंजन रघुनाथ श. १७३४ मध्यें गिरनारवर येऊन गेले होते. त्यांनीं गिरनारवर दीर्घ काळ निवास केला नाहीं वा ते पुनः तिकडे गेल्याचीहि नोंद नाहीं. नारायणमहाराजांना जें दत्तदर्शन गिरनारवर झालें, तें शके १७५० च्या सुमारास झालें असावें. त्या वेळीं निरंजन रघुनाथ हयात होते हें खरें; परंतु त्यांचा संचार त्या वेळीं महाराष्ट्रांतच होता. ते या सुमारास चार वर्षें गिरनारवर जाऊन राहिले असल्याची नोंद मिळत नाहीं. कदाचित् गिरनारवर निरंजन रघुनाथांच्या दत्तसाक्षात्काराची कहाणी प्रसिद्ध असेल आणि नारायणमहाराजांनीं मनोमन त्यांना गुरु मानून चार वर्षें गिरनारवर एकलव्यासारखें एकाकी तप केलें असेल. या अडचणीला आणखीहि एक सोडवणूक आहे. डॉ. शं. गो. तुळपुळे यांनीं महाराष्ट्र-सारस्वताच्या पुरवणींत त्यांचा काळ श. १७१५–१७९० असा दिला

आहे.[१७] जर त्यांचा जन्म श. १७१५ मधील असेल, तर वयाच्या विशीच्या सुमारास ते गिरनारवर आले असतां त्यांची आणि निरंजन रघुनाथांची प्रत्यक्ष भेट (श. १७३४) होणें शक्य आहे. अर्थात् त्यांचें चार वर्षांचें सान्निध्य तरीहि असंभवनीयच आहे.

नारायणमहाराज गिरनारहून द्वारकेस गेले. तेथून मुंबईवरून दक्षिणेस रामेश्वरापर्यंत गेले. त्यानंतर पुनः उत्तरेंत येऊन काशी, जगन्नाथपुरी इ. तीर्थें करीत करीत ते ब्रह्मावर्तास येऊन राहिले. त्यांचा निवास तेथें आहे, असें कळतांच त्यांच्या वडिलांनीं परिवारासह ब्रह्मावर्तास स्थलान्तर केलें. नारायणमहाजांचा शिष्यपरिवार फार मोठा होता. त्यांच्या मठांतील दत्त-जयंतीच्या उत्सवांत प्रतिवर्षी १० हजार ब्राह्मण जेवत, एवढें त्यांचें वैभव होतें. ब्रह्मावर्तास असतांना कधीं कधीं ते ग्वाल्हेरलाहि येऊन राहत. श. १७६२ मध्यें ते हरद्वारला गेले होते. देवास आणि ग्वाल्हेर येथील राज-घराण्यांची त्यांच्यावर श्रद्धा होती. आषाढ व ५ गुरुवार, श. १७८९ या दिवशीं ते समाधिस्थ झाले.

नारायणमहाराजांचा पारमार्थिक अधिकार मोठा होता. त्यांनीं लिहिलेला 'सप्तसागर' हा बृहद्ग्रंथ (ओवीसंख्या १७६७२) त्यांच्या अध्यात्म-चिंतनाची आणि सखोल अनुभवाची साक्ष देणारा आहे. या ग्रंथाचे बोध-सागर, कैवल्यसागर, ज्ञानसागर, विज्ञानसागर, आनंदसागर, शांतिसागर आणि करुणासागर असे सात विभाग आहेत. "मुमुक्षूच्या विविध अवस्था ध्यानीं घेऊन लिहिलेला हा ग्रंथ म्हणजे मोक्षधर्माची एक सप्तपदीच आहे" असें वाटतें.[१८] ज्याची मनोभूमिका सत्संगतींत अतिशुद्ध झाली आहे, अशा सच्छिष्यास सद्गुरूनें केलेला संवादरूपी गद्यात्मक बोध 'बोधसागरां'त ग्रथित केला आहे. 'कैवल्यसागरां'त 'बोधसागरां'तील विचार श्रुति-स्मृति-पुराणां-तील आप्त वचनांनीं दृढ केले आहेत. 'विज्ञानसागरां'त भक्ति-ज्ञान-वैराग्याचा विस्तार आहे. या ग्रंथाविषयीं—

**या ग्रंथाच्या उजेडें । अज्ञानाचा अंधार उडे ।**
**भाविकांतें श्रीराम जोडे । याच डोळां याच देहीं ॥**

---

१७. महाराष्ट्र-सारस्वत (आवृत्ति चौथी), पृ. १०६५.
१८. महाराष्ट्र सारस्वत (चौथी आवृत्ति), पृ. १०६५.

अशी प्रत्यक्ष ग्रंथकाराची ग्वाही आहे. ' आनंदसागर ' या विभागांत ग्रंथकारानें परमानंदाचें रहस्य विशद केलें आहे :

पाहे आपलें अंतरंग । जेथून येतो सुखतरंग ।
बा रे तूंतें सुखसंग । अखंड आहे अंतरीं ॥
बिंदू सर्वथा त्यजावा । सिंधूकडे डोल द्यावा ।
मग कल्पकोटी भोगावा । आनंदाचा सोहळा ॥

' शांतिसागरां 'त शांतीच्या उदयाची किमया विशद करतांना नारायणमहाराज म्हणतात :

दृश्य विषय त्यागावे । निर्वासन तें चित्त व्हावें ।
दृग् दृश्य सारें मावळावें । मग ते शांति कोसळे ॥

' करुणासागरां 'त नारायणमहाराजांचें आत्मचिंतन बऱ्याच विस्तारानें व्यक्त झालें आहे. सप्तसागरांतील या ' करुणासागरा 'चा व्याप सर्वांत अधिक असून, त्यांत नारायणमहाराजांचें हृदय दत्तचरणांशीं बसून कर्म, उपासना, ज्ञान, भक्ति इत्यादि परमार्थविषयांचें विनीतार्चिंतन करीत आहे. या सप्तसागरांशिवाय चिद्रत्नमाला, गुरुपादुकाष्टक, बोधाष्टक, निर्वाणपंचक, सिद्धयोगाष्टक, धांवे व पदें अशी त्यांची स्फुट रचना आहे. आपल्या गुरूंप्रमाणें त्यांनींहि हिंदी पदरचना केली आहे. एका पदांत दत्तविरहाची असह्यता व्यक्त करतांना नारायणमहाराज म्हणतात :

कोण्या काळीं येशील दीनबंधु ।
दत्तदेवा सद्गुरु दयासिंधु ॥
कधींचा मी व्याकुळ वाट पाहें ।
त्रैलोकींचें सुख शून्य वाटताहे ॥
वियोगें हा जीव प्राण जाऊं पाहे ।
कृपासिंधो सन्मुख उभा राहे ॥

नारायणमहाराजांच्या पारमार्थिक जीवनांत ' वनवास-विलासा 'चें महत्त्व आगळें आहे. ते आपल्या मनाला उद्देशून या ' वनवास-विलासा 'चें सुचारु चित्र रेखाटतात :

चाल चाल रे मना, वना जाऊं ।
रम्य काननीं एकटे सुखी राहूं ॥
पुण्यारण्याची महाशोभा पाहूं ।
शोभा पाहतां श्रीहरिगुण गाऊं ॥
वन्यतरूंचीं सुवर्णफळें खाऊं ।
इच्छाविहारी त्या मृगांसंगें धावूं ॥
दिव्य सरितांचें जळ तृष्णा हारी ।
मलयमारुत हा स्वयें वारा वारी ॥
पर्णशय्येतें मृदु निद्रा करी ।
स्थिर नोहे अंतरीं धीर धरी ॥
रात्रीं लावूं सोज्वळ चंद्रदीप ।
विरक्तिकांतेचें पाहूं गौररूप ॥
रूप पाहतां आलिंगी आपोआप ।
दूर करितें स्वयें सर्व ताप ॥
ऐशा सुखाची त्या वनीं आहे खाण ।
तेथें राहतां सांपडे त्याची खूण ॥
नेटेबोटें दाखवी नारायण ।
अंगें भेटवी तो सखा नारायण ॥

नारायणमहाराजांनीं विरक्तिकांतेशीं केलेला हा रतिविलास पर-सौंदर्यानें रंगलेला आणि आत्मानंदानें धुंद झालेला आहे.

## माणिक प्रभु (श. १७३९-१७८७):

माणिक प्रभु हे कल्याणीच्या मनोहर नाइकांचे पुत्र. आश्वलायनशाखीय देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. त्यांचा जन्म मार्गशीर्ष शु. १४ श. १७३९ या दिवशीं झाला. त्यांचे माता-पिता दोघेंहि परमार्थप्रवण आणि सत्त्व-संपन्न असल्यामुळें ‘ शुद्ध बीजापोटीं ’ या रसाळ फळाचा उद्‌भव झाला. माणिक-प्रभु हे दत्तात्रेयाचे चौथे अवतार समजले जातात.

हे साक्षात् ईश्वरी अवतार आहेत, अशी त्यांच्याविषयींची श्रद्धा त्यांच्या लहानपणासूनच पसरत चालली होती. त्यांचें दर्शन, स्पर्शन आणि भाषण

अमोघ असल्याचा प्रत्यय अनेकांना येत असे. त्यांना कानडी, फारशी, उर्दू, संस्कृत व मराठी या भाषा उत्तम तऱ्हेनें अवगत होत्या. शास्त्रचर्चेत पंडितहि त्यांच्यापुढें फिके पडत. जणुं 'वयसेचिया गांवा न जातां' बाळपणींच सर्वज्ञतेनें त्यांना वरलें होतें. अभिजात सिद्धींचा प्रत्यय अगदीं लहानपणापासूनच येऊं लागल्यामुळें त्यांच्या साधुत्वाचा डंका लौकरच सर्वत्र झडूं लागला. भालकी गांवाजवळील एका जंगलांतील गुहेंत ते एक वर्षभर समाधि लावून बसले होते. हुमणाबादेजवळील अरण्यांत त्यांनीं एका बेलाच्या झाडाखालीं निवास केला, तिथेंच त्यांच्या नांवानें 'माणिकनगर' वसलें.

सर्व दत्तावतारांत व दत्तोपासकांत माणिक प्रभु हे फार ऐश्वर्यसंपन्न असे राजयोगी होते. लहानपणापासूनच त्यांच्या अंगावर सोनें, मोती, हिरे, माणकें यांचे बहुमोल अलंकार असत. माणिक प्रभूंची गादी म्हणजे गायनकलेचें एक श्रेष्ठ पीठ होतें. प्रभूंच्या दरबारांत संगीताच्या मजलशी नेहमीं रंगत असत. स्वतः माणिक प्रभूंनीं अनेक रागबद्ध रसाळ पदांची रचना केली आहे.

माणिक प्रभूंच्या दत्तोपासनेच्या परंपरेला 'सकलमत संप्रदाय' असें नांव आहे. नांवावरूनच हें स्पष्ट होत आहे कीं, या संप्रदायांत समन्वयाचा मोठा प्रयत्न झालेला आहे. या संप्रदायाचा असा सिद्धान्त आहे कीं, जगांतील सर्व धर्म व संप्रदाय हे त्यांच्या त्यांच्या अनुयायांना परमेश्वराची प्राप्ति करून देणारे आहेत. तेव्हां प्रत्येकानें अन्य संप्रदायांना विरोधी वा त्याज्य न न मानतां समन्वयाच्या उदार दृष्टीनें त्यांतील सत्त्वांश ग्रहण करावा. या संप्रदायाचें उपास्य श्रीचैतन्यदेव (आत्मदेव—या विश्वांत भरून उरलेलें चैतन्यतत्त्व) हें आहे. या संप्रदायांत श्रीदत्तात्रेयाचें स्वरूप मधुमती नामक शक्तिसहित आराधिलें जातें. "हा संप्रदाय अद्वैती व सर्वव्यापी असल्यामुळें अमक्याच एका देवतेचा मंत्र घेतला पाहिजे, असा आग्रह मुळींच नाहीं. कारण आपले सद्गुरुच नाना वेशांनीं या जगांत नटलेले आहेत, सर्व स्वरूपें त्यांचींच आहेत; म्हणून बाह्यतः भेद दिसला, तथापि वस्तुतः सर्व देवता एकरूपच आहेत, असा निश्चय ठेवून मंत्र घेतल्यास बाधक होणार नाहीं."[१९]

१९. श्रीसंस्थान माणिक प्रभु पद्यमाला : प्र. अप्पासाहेब देशपांडे, प्रस्तावना पृ. ३-४.

या उदार समन्वयदृष्टीमुळें माणिक प्रभूंच्या अनुयायी वर्गांत हिंदूंबरोबर मुसलमानांचाहि मोठा भरणा होता. हिंदूंतील लिंगायतपंथहि त्यांना मानीत असे. " अतिथि-पांथस्थ, तड़ी-तापडी, पंगु-रोगी या सर्वांना प्रभूंचें संस्थान हें एक विश्रामस्थान झालें होतें. गरिबांचें दारिद्य जावें, निपुत्रिकांस संतति-लाभ व्हावा, रोग्यांना आरोग्य प्राप्त व्हावें, संसारक्लान्त जीव समाधान पावावे," असें त्यांच्या परिसरांतील वातावरण होतें. जंगमांचा संक्रांति-महोत्सव, मुसलमानांचा मोहरम आणि ब्राह्मणांची दत्तजयन्ती या उत्सवां-साठीं माणिकनगरांत प्रतिवर्षी तीस लाखांवर रक्कम खर्च होई !

असें योगेश्वर कृष्णासारखें दिव्य जीवन व्यतीत करून माणिकप्रभु मार्गशीर्ष शु. ११ श. १७८७ या दिवशीं जिवंत समाधिस्थ झाले. त्यांच्या अवतारकार्यामुळें दत्त संप्रदायाच्या प्रसाराला आणि प्रगतीला फार मोठी गति मिळाली. समन्वयाच्या वृत्तींतून निर्माण झालेली दत्तदेवता जणुं समन्वयाचें प्रात्यक्षिक आचरण्यासाठीं या भूतळावर माणिक प्रभूंच्या रूपानें अवतरली आणि तिनें योग व भोग यांचा सुमेळ साधून दाखविला.

माणिक प्रभूंच्या संप्रदायांत 'श्रीभक्तकार्यकल्पद्रुम-गुरुसार्वभौम-श्रीमद्-राजाधिराज–योगीमहाराज–त्रिभुवनानंद–अद्वैत–अभेद–निरंजन–निर्गुण–निरालंब–परिपूर्ण–सदोदित–सकलमतस्थापित-श्रीसद्गुरुमाणिकप्रभुमहाराज की जय!' असा जयघोष रूढ आहे. त्यांची गादी त्यांच्या भावाच्या वंशाकडे आजीहि चालू आहे. त्यांच्या गादीच्या परंपरेंत श्री मनोहर माणिक प्रभु आणि श्रीमार्तंड माणिक प्रभु हे दोन पुरुष विशेष प्रसिद्धि पावले. त्या दोघांचींहि अनेक मधुर पदें आहेत.

माणिक प्रभूंच्या पद-संभारांत कृष्णपर पदांचा विशेष भरणा आहे. त्यांचीं पदें मराठी, हिंदी आणि कानडी अशा तीन भाषांतील आहेत. त्यांच्या गीतांत मीरापदावलीची माधुरी आहे. लोक त्यांना दत्तावतार समजतात, तरी ते मात्र म्हणतात :

**श्रीगुरु माझा दत्त दयाघन रे ।**
**अंतरचालक त्रिभुवन पालक ।**
**सकळांसी जीवन रे ।**

अखंड अगोचर व्याप्त चराचर ।
शाश्वत चिद्घन रे ॥
माणिकदासासि मिळविलें स्वरूपासी ।
देऊनि उन्मन रे ॥[२०]

या उन्मनावस्थेंत आत्मस्वरूपाची जी स्थलकालातीत अनुभूति प्राप्त होते, त्या अनुभूतीच्या मस्तींत माणिक प्रभु म्हणतात :

आम्ही येथींचे तेथींचे ।
वेद जाणती नेतीचे ॥
आम्हां नाहीं येणें जाणें ।
आम्ही पूर्णातीत पूर्ण ॥
आम्हां गांव ठाव नाहीं ।
ठावातीत सर्वां ठायीं ॥
आमचें नाम माणिक नोहे ।
आम्ही आम्हातीत होय ॥[२१]

अशा प्रकारें भावावेगाच्या प्रवाहांत प्रज्ञा आणि प्रतीति यांचा सहज आविष्कार घडविणारी माणिक प्रभूंची गीतमाला प्रत्यक्ष दत्तप्रभूंनेंहि आवडीनें कंठीं धारण करावी, अशी आहे.

**अक्कलकोटचे स्वामीमहाराज (-श. १८००) :**

हे माणिक प्रभूंचे समकालीन सत्पुरुष दत्त संप्रदायाच्या अर्वाचीन इतिहासांत ख्यातनाम बनले आहेत. माणिक प्रभूंप्रमाणेंच त्यांनाहि दत्ताचे अवतार समजतात. त्यांचें चरित्र गूढ आणि अद्‌भुत आहे. आश्विन शु. ५ श. १७७९ मध्यें ते अक्कलकोट येथें आले आणि अखेरपर्यंत तेथेंच राहिल्यामुळें त्यांचें नांव 'अक्कलकोटचे स्वामी' असें पडलें. परंतु त्यांच्या पूर्वजीवनाविषयीं कांहींहि माहिती नाहीं. त्यांनीं स्वतःच पूर्वजीवन अज्ञात राखलें. एकदां कलकत्त्याचे दोन गृहस्थ त्यांच्याकडे आले असतां त्यांनीं भीत भीत स्वामींना प्रश्न विचारला, "आपण येथें कोठून आलांत?" त्यावर स्वामींनीं

---

२०. श्रीसंस्थान माणिकप्रभु पद्यमाला, पद १.

२१. श्रीसंस्थान माणिकप्रभु पद्यमाला, पद ४.

असें उत्तर दिलें होतें : "प्रथम आम्ही कर्दलीबनांतून निघालों. पुढें फिरत फिरत कलकत्ता वगैरे शहरें पाहिलीं. बंगाल देश हिंडून कालीदेवीचें दर्शन घेतलें. नंतर गंगातटाकानें फिरत फिरत हरिद्वार व केदारेश्वर पाहिलें. पुढें शेंकडों तीर्थें हिंडून गोदातटाकीं आलों. नंतर गोदातटाक आक्रमीत आक्रमीत दक्षिण हैद्राबादेस गेलों. तेथून मंगळवेढें, पंढरपूर, बेगमपूर, मोहोळ, सोलापूर अशा गांवीं रहात रहात अक्कलकोटास आलों."

ते कर्दलीबनांतून प्रकटले, असें त्यांच्याच मुखींच्या वचनावरून समजल्यावर श्रद्धावंतांनीं असें निश्चित केलें आहे कीं, श. १३८० मध्यें कर्दलीबनांत (श्रीशैल येथें) निजानंदास गेलेले श्रीनरसिंह सरस्वतीच स्वामींच्या रूपानें पुनः प्रकट झाले. या श्रद्धेला पोषक असें गूढ उत्तर एकदां त्यांनीं दिलें होतें : "आम्ही यजुर्वेदी ब्राह्मण. आमचें नांव नृसिंहभान. काश्यप गोत्र. आमची मीन राशि..." श्रद्धावन्तांची अमर्याद श्रद्धा विसरून लौकिक दृष्ट्या विचार करतां शालिवाहन शकाच्या अठराव्या शतकाच्या प्रारंभीं ते भूतलावर अवतरले असावे, असें वाटतें.

त्यांचें चरित्र उन्मुक्त लीलांनीं भरलेलें आहे. ते बालोन्मत्तपिशाचवत् अवस्थेंत वावरत असत. त्यांच्या लीला ऐकल्या कीं, जाणत्या वाचकांना चक्रधरांचे गुरु गुंडम राऊळ यांच्या चरित्राची आठवण येते. त्यांचा सर्व आचार वर्णाश्रमातीत अवधूतासारखा होता. त्यांच्या उन्मुक्त वृत्तीचें भय दर्शनार्थींना फार वाटे. त्यांच्यापुढें राव-रंक सारखेच. केव्हां कोणाचा गौप्यस्फोट करतील आणि अन्तस्तलांत दडी मारून बसलेल्या पापाला प्रकाशांत आणतील, याचा नेम नसे. त्यांचें समग्र चरित्र अद्भुत चमत्कारांनीं भरलेलें आहे. त्यांच्या अमोघ कृपेचा प्रत्यय सांगणाऱ्या अनेक कथा समाजांत ऐकूं येतात. लक्षावधि लोकांना त्यांच्या साधुत्वाविषयीं परमादर वाटत असे. त्यांच्याकडे दर्शनार्थ जाणाऱ्यांत शिक्षितांचाहि भरणा कमी नसे. त्यांच्यामुळें महाराष्ट्रांत दत्तोपासनेचा प्रचार मोठ्या प्रमाणावर झाला!

**शिवहर शंकर नमामि शंकर**
**शिव शंकर शंभो ।**
**ये गिरिजापति भवानी-शंकर शंभो ॥**



**श्रीपाद श्रीवल्लभ**
( सुमारें शके १२४५–१२७५ )



**नारायणमहाराज जालवणकर**
( शके १७२९–१७८९ )



**माणिक प्रभु**
शके १७३९–१७८७ )



**अक्कलकोटचे स्वामी**
( समाधि : शके १८०० )

संत महंतां होती भेटी ।
हरुषें नाचूं वाळवंटीं ॥

असें स्वामींचें भजन असे. धारित्री हें ज्याचें पीठ आहे, असीम आकाश हीच ज्याची लिंगमूर्ति आहे, चंद्र-सूर्य ज्याचे नेत्र आहेत, सप्तसमुद्र याच ज्याच्या कुक्षी आहेत, गिरिशिखरें याच ज्याच्या भुजा आहेत, सप्तपाताळांत ज्याचे पाय स्थिरावले आहेत आणि ज्यानें दशदिशांचें वस्त्र परिधान करून ग्रहनक्षत्रांच्या कुसुममाळा गळां घातल्या आहेत, अशा विराट् शिवाचें ध्यान ते सुषुप्ति अवस्थेंत करीत असत.

परंतु या 'विराटाच्या उपासका' भोंवतीं जे सेवेकरी वावरत, त्यांच्या जीवनाला स्वामींच्या साधुत्वाचा यत्किंचितहि स्पर्श झाला नाहीं. स्वामींचे एक चरित्रकार श्री. भागवत लिहितात : " महारांजाचे जे सेवेकरी होते. त्यांपैकीं बहुतेक भोजनभाऊच होते. महाराजांपासून महाप्रसादाची प्राप्ति करून घेतलेला एकहि प्राणी ऐकिवांत नाहीं. "

अक्कलकोट येथें सुमारें वीस वर्षें प्रकट राहून त्यांनीं महाराष्ट्रांत गुरुसंप्रदाय प्रसृत केला. माणिकप्रभूंचे ते समकालीन असले, तरी त्यांची विशेष प्रसिद्धि माणिक प्रभूंच्या नंतरच झाली. " महाराजांच्या अंतकालीं त्यांच्या सांप्रदायिकांनीं शास्त्रीमंडळीस बोलावून संकल्पपूर्वक त्यांच्याकडून प्रायश्चित्तें करविलीं. त्या वेळीं महाराजांनीं मोठ्या उल्हासानें स्वमुखानें संकल्प उच्चारून दानधर्म केला आणि वेदोक्त मंत्र म्हणण्याविषयीं शास्त्रीमंडळींस महाराजांनीं आज्ञा केली. नंतर त्यांनीं आपल्या अंगावरील बहुमोल जरीची शाल, तिचा एक पदर भिजवून, संकल्पपूर्वक रामाचार्य यांस दिली. श. १८०० चैत्र वद्य त्रयोदशीच्या दिवशीं दुपारीं महाराजांचे आश्रमांतील सर्व गुरें व घोडीं महाराजांनीं आपल्यापुढें आणविलीं आणि त्या दिवशीं आलेले सर्व नैवेद्य त्यांस खावयास दिले. त्यांचा आवाज खोल चालला असें पाहून एका सच्छिष्यानें 'आम्हांस आज्ञा काय ?' म्हणून विचारतां स्वामींनीं—

अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥

अवधूताच्या रूपानें मध्यरात्रीच्या वेळीं कृष्णातीरीं मंत्रोपदेश दिला, असें सांगितलें जातें. पूजा-अर्चा, ध्यान-धारणा यांशिवाय योगाचाहि अभ्यास त्यांनीं या काळांत केला.

वाडीहून माणगांवीं परत जातांना त्यांनीं एक दत्तमूर्ति बरोबर नेली. त्या मूर्तीसाठीं लहानसें मंदिर बांधून मंदिरांतच ते राहूं लागले. ते स्वहस्तें स्वयंपाक करून एकटे राहत आणि मौन व्रत पाळीत. सात वर्षें अशा निग्रही पद्धतीनें दत्तात्रेयार्चन केल्यावर श. १८११ मध्यें दत्तात्रेयाच्या दृष्टान्तानुसार त्यांनीं पत्नीसह माणगांव सोडलें आणि बरोबर केवळ एक तांब्या, एक धोतर व एक लुगडें घेऊन त्यांनीं भ्रमन्ती सुरू केली. या भ्रमणाच्या काळांत, घर सोडल्यापासून दोन वर्षांनंतर, श. १८३३ मध्यें गंगाखेड या गांवीं त्यांच्या पत्नीचें देहावसान झालें. पत्नी गेल्यावर तेराव्याच दिवशीं त्यांनीं संन्यासदीक्षा स्वीकारली आणि 'वासुदेवानंद सरस्वती' असें नांव धारण केलें.

संन्यास-ग्रहणानंतर त्यांनीं काशीपासून रामेश्वरापर्यंत आणि द्वारकेपासून राजमहेंद्रीपर्यंत भारत-भ्रमण केलें आणि शास्त्राचरणाविषयीं लोकांच्या मनांत श्रद्धा निर्माण करण्याचा प्रयत्न केला. त्यांनीं अनेक ठिकाणीं दत्तमूर्तींची स्थापना केली, दत्तोपासनेचा प्रचार केला आणि उपासनेला सदैव प्रेरक ठरेल अशा मौलिक साहित्याची निर्मिति केली. त्यांनीं सर्व प्रवास पायीं केला. त्यांची ही पदयात्रा केवळ दोन छाट्या, दोन लंगोट्या व एक कमंडलू एवढ्याच साहित्यानिशी चालू असे. उज्जयनी, ब्रह्मावर्त, बदरीकेदार गंगोत्री, हरिद्वार, पेटलाद, तिलकवाडा, द्वारका, चिखलदा, मेहतपूर, नरसी, बढवाणी, तंजावर, मुक्ताला, पवनी, हावनूर, कुरगुड्डी, गरुडेश्वर या ठिकाणीं त्यांनीं संन्यस्त जीवनांतील चातुर्मास काढले. यावरून त्यांच्या संचाराची व्याप्ति समजून येईल. माणगांव, वाडी, ब्रह्मावर्त व गरुडेश्वर या चार ठिकाणीं त्यांच्या जीवनाचा बराच मोठा भाग व्यतीत झाला. गरुडेश्वरीं असतांनाच ज्येष्ठ व. ३० श. १८३६ या दिवशीं रात्रीं श्रीदत्तात्रेयाच्या समोर उत्तराभिमुख अवस्थेंत त्यांनीं निजानंदीं गमन केलें. गरुडेश्वराला त्यांचें समाधिमंदिर आणि दत्तमंदिर बांधलेलें असून तेथें त्यांच्या पुण्यतिथीचा उत्सव मोठ्या प्रमाणांत होत असतो.

अवधूताच्या रूपानें मध्यरात्रीच्या वेळीं कृष्णातीरीं मंत्रोपदेश दिला, असें सांगितलें जातें. पूजा-अर्चा, ध्यान-धारणा यांशिवाय योगाचाहि अभ्यास त्यांनीं या काळांत केला.

वाडीहून माणगांवीं परत जातांना त्यांनीं एक दत्तमूर्ति बरोबर नेली. त्या मूर्तीसाठीं लहानसें मंदिर बांधून मंदिरांतच ते राहूं लागले. ते स्वहस्तें स्वयंपाक करून एकटे राहत आणि मौन व्रत पाळीत. सात वर्षें अशा निग्रही पद्धतीनें दत्तात्रेयार्चन केल्यावर श. १८११ मध्यें दत्तात्रेयाच्या दृष्टान्तानुसार त्यांनीं पत्नीसह माणगांव सोडलें आणि बरोबर केवळ एक तांब्या, एक धोतर व एक लुगडें घेऊन त्यांनीं भ्रमन्ती सुरू केली. या भ्रमणाच्या काळांत, घर सोडल्यापासून दोन वर्षांनंतर, श. १८३३ मध्यें गंगाखेड या गांवीं त्यांच्या पत्नीचें देहावसान झालें. पत्नी गेल्यावर तेराव्याच दिवशीं त्यांनीं संन्यासदीक्षा स्वीकारली आणि 'वासुदेवानंद सरस्वती' असें नांव धारण केलें.

संन्यास-ग्रहणानंतर त्यांनीं काशीपासून रामेश्वरापर्यंत आणि द्वारकेपासून राजमहेंद्रीपर्यंत भारत-भ्रमण केलें आणि शास्त्राचरणाविषयीं लोकांच्या मनांत श्रद्धा निर्माण करण्याचा प्रयत्न केला. त्यांनीं अनेक ठिकाणीं दत्तमूर्तींची स्थापना केली, दत्तोपासनेचा प्रचार केला आणि उपासनेला सदैव प्रेरक ठरेल अशा मौलिक साहित्याची निर्मिति केली. त्यांनीं सर्व प्रवास पायीं केला. त्यांची ही पदयात्रा केवळ दोन छाट्या, दोन लंगोट्या व एक कमंडलू एवढ्याच साहित्यानिशी चालू असे. उज्जयनी, ब्रह्मावर्त, बदरीकेदार गंगोत्री, हरिद्वार, पेटलाद, तिलकवाडा, द्वारका, चिखलदा, मेहतपूर, नरसी, बढवाणी, तंजावर, मुक्ताला, पवनी, हावनूर, कुरगुड्डी, गरुडेश्वर या ठिकाणीं त्यांनीं संन्यस्त जीवनांतील चातुर्मास काढले. यावरून त्यांच्या संचाराची व्याप्ति समजून येईल. माणगांव, वाडी, ब्रह्मावर्त व गरुडेश्वर या चार ठिकाणीं त्यांच्या जीवनाचा बराच मोठा भाग व्यतीत झाला. गरुडेश्वरीं असतांनाच ज्येष्ठ व. ३० श. १८३६ या दिवशीं रात्रीं श्रीदत्तात्रेयाच्या समोर उत्तराभिमुख अवस्थेंत त्यांनीं निजानंदीं गमन केलें. गरुडेश्वराला त्यांचें समाधिमंदिर आणि दत्तमंदिर बांधलेलें असून तेथें त्यांच्या पुण्यतिथीचा उत्सव मोठ्या प्रमाणांत होत असतो.

वासुदेवानंद सरस्वतींची ग्रंथरचना फार मोठी आहे. गुरुचरित्राचें संस्कृत रूपान्तर ( 'गुरुसंहिता' ), दत्तविषयक पौराणिक सामग्रीचा उपयोग करून आणि आपले विचार त्यांत प्रसंगौचित्यानें ग्रथित करून लिहिलेलें संस्कृत 'दत्तपुराण', जनसाधारणासाठीं मराठींत लिहिलेलें ओवीबद्ध 'दत्तमाहात्म्यम्', जीवनाच्या अवस्थात्रयीचें नियमन करण्यासाठीं लिहिलेलें 'शिक्षात्रय' (कुमारशिक्षा, युवाशिक्षा आणि वृद्धशिक्षा), 'सप्तशती गुरुचरित्र' (मराठी ओवीबद्ध), 'दत्तमाहात्म्या'चा संक्षेप करणारें 'श्रीदत्तलीलामृताब्धिसासार' (मराठी : ओवीबद्ध), 'माघमाहात्म्य' (मराठी : ओवीबद्ध), स्त्री-शिक्षा (संस्कृत) इत्यादि ग्रंथ आणि शेंकडों संस्कृत व मराठी स्तोत्रें एवढा त्यांच्या रचनेचा व्याप आहे. चार-पांच हजार पृष्ठांचा हा प्रचंड ग्रंथसभार स्वामींच्या दत्तभक्तीचें, धर्मनिष्ठेचें, प्रगाढ चिंतनशीलतेचें आणि लोकोद्धाराच्या तळमळीचें प्रत्यंतर घडवीत आहे. वर्णाश्रमोचित कर्तव्यें भक्तीच्या अधिष्ठानावर सर्वांनीं कांटेकोरपणें आचरावीं, यासाठीं त्यांनीं हा ग्रंथरचनेचा प्रपंच मांडलेला आहे. आचारधर्मावर त्यांचा विशेष कटाक्ष होता. त्यांच्या ग्रंथांतून उताऱ्यांची निवड करणें अशक्य आहे. त्यांच्या स्तोत्ररचनेंत भारतीय संस्कृतींतील श्रद्धास्थानांचा महिमा भक्तिभावानें आणि समर्थ वाणीनें गायिलेला आहे.

**दत्तात्रेया, श्रीगुरुराया,**
**मजला भेट द्या हो !**
**रात्रंदिन हृदयांतरिं आशा**
**लागलि दृढतर पुराणपुरुषा**
**पूर्ण करावी श्रीजगदीशा**
**इतुकें मागणें हो !**

हीच या सत्पुरुषाची एकमेव इच्छा होती. त्यांच्या हृदयांत आणि वाणींत संचार करून दत्तगुरूंनीं ती इच्छा पूर्ण केली.

### पंतमहाराज बाळेकुंद्रीकर (श. १७७७-१८२७) :

यांचें व्यवहारिक नांव दत्तात्रेय. रामचंद्र कुलकर्णी (बाळेकुंद्रीकर). त्यांचें गांव बेळगांवजळील बाळेकुंद्री हें होय. त्यांचा जन्म दड्डी (जि.

बेळगांव ) या गांवीं मामांच्या घरीं आषाढ व. १३ श. १७७७ या दिवशीं झाला. बेळगांव येथें त्यांचें मॅट्रिक्युलेशनपर्यंतचें इंग्रजी शिक्षण झालें. त्यानंतर त्यांनीं तेथेंच इंग्रजी शाळेंत शिक्षकाचें काम पत्करलें. श. १८०४ मध्यें त्यांचा विवाह झाला. घरच्या लोकांच्या निर्वाहाची जबाबदारी त्यांच्यावरच होती. आपल्या घरांतील मुलांच्या शिक्षणाकडे ते जितक्या आस्थेनें पहात, तितक्याच आत्मीयतेनें ते गरीब मुलांच्या शिक्षणाची काळजी घेत. पंतांच्या प्रयत्नांमुळें त्यांचे पांच बंधु उच्च शिक्षण प्राप्त करून प्रतिष्ठा पावले.

त्यांचें परमार्थचिंतन आणि अध्यात्मसाधन नोकरी करीत असतांनाच चालू होतें. दत्तात्रेय हें त्यांच्या वडिलांचेंहि उपास्य होतें. त्यामुळें हा पैतृक वारसा त्यांना अनायासेंच लाभला होता. दोन-अडीच तपें दत्तोपासना आचरून आणि परमानंदाचे अधिकारी बनून त्यांनीं आश्विन व. ३ शके १८२७ या दिवशीं देह ठेवला.

पंतांच्या गुरूचें नांव बालमुकुंद किंवा बालावधूत. हे बालावधूत बाळेकुंद्रीजवळील कर्डीगुद्दीच्या डोंगरांत राहत. आश्विन व. १२ श. १७९७ मध्यें त्यांनीं पंतांवर अनुग्रह केला आणि आपला 'अवधूत संप्रदाय' पुढें चालविण्याची जबाबदारी पंतांवर टाकून ते मल्लिकार्जुनास निघून गेले. या अनुग्रहानंतर पंतांनीं योगसाधना आचारिली. पंतांनीं अध्यात्मग्रंथांचें परिशीलन उत्तम प्रकारें केलें होतें. त्यांना मराठी, कानडी, इंग्रजी, हिंदी व संस्कृत या पांच भाषा अवगत होत्या. त्यांच्याभोंवतीं जिज्ञासूंचा नि श्रद्धावंतांचा मोठा समूह नेहमीं वावरत असे. त्यांचा शिष्यवर्ग मोठा असून त्यांत सर्व जमातींच्या लोकांचा समावेश होता.

दत्तप्रीतीच्या रसायनांत प्रपंच-परमार्थाची मिळणी साधणाऱ्या पंतांनीं जवळ जवळ तीन हजार पदें रचलीं आहेत. हीं पदें म्हणजे त्यांच्या हृदयसागरांत उसळणाऱ्या दत्तप्रेमलहरीच आहेत.[२३] या गीत-संभारांत श्रीदत्तात्रेय आणि श्रीगुरु बालावधूत यांच्याविषयीचा भक्तिभाव व्यक्त झालेला आहे :

**दत्त माझा भाव, दत्त माझा देव ।**
**दत्त अनुभव अंतरींचा ॥**

---

२३. श्रीदत्तप्रेमलहरी : प्र. न. रा. बाळेकुंद्रीकर, बेळगांव. पदें २७३०.

दत्त माझें ध्यान, दत्त माझें ज्ञान ।
दत्तावीण आन विश्वीं नाहीं ॥
दत्तनाम श्रवण दत्त ध्यान मनन ।
दत्तभजनीं मौन सहजचि ॥
दत्त माझी भक्ति, दत्त माझी मुक्ति ।
दत्तस्मरणीं विरति अनायासें ॥
दत्तपदीं जनन, दत्तरूपीं मरण ।
दत्तपायीं शरण जीवें भावें ॥
दत्त सविकल्प, दत्त निर्विकल्प ।
निमे भवताप दत्तकृपें ॥
दत्त जीव शिव, दत्त ब्रह्मभाव ।
भावातीत भाव दत्त माझा ॥
दत्त निराकार दत्तचि साकार ।
दत्त गुरुवर बाळ माझा ॥

एवढ्या एका गीतावरूनहि पंतांच्या दत्तविषयक भावविश्वाचे रूपरंग ध्यानीं येतील. पंतांच्या 'दत्तप्रेमलहरी' आणि त्यांचा अवधूत संप्रदाय दत्तोपासनेच्या इतिहासांत स्वतंत्र अभ्यासाचा विषय होण्याइतका महत्त्वपूर्ण आहे.

**विष्णुदास** (श. १७६६-१८३९) :

यांचा जन्म सातारा येथें श. १७६६ मध्यें धांदरफळें उपनांवाच्या माध्यंदिनशाखीय ब्राह्मणकुळांत झाला. १२ व्या वर्षी त्यांचा विवाह झाला आणि १८ व्या वर्षी तरुण पत्नी व माता-पिता-बंधुगण या सर्वांना सोडून, कुणाला न कळवितां, त्यांनीं गृहत्याग केला. त्यांना अगदीं लहानपणापासूनच पूजा-अर्चा, कीर्तन-श्रवण इत्यादि भक्तिप्रेरक गोष्टींचें आकर्षण होतें. परसांतील औदुंबराच्या झाडाखालीं बसून ते दत्तपादुकांची एकाग्रतेनें पूजा करीत.

दत्तदर्शनाची तळमळ वाढल्यामुळें त्यांनीं घर सोडलें. घरांतून बाहेर पडल्यावर पंढरपूर, बेळगांव, हुबळी, हंपी विरूपाक्ष, श्रीशैल या ठिकाणीं भ्रमण करून श. १७८६ मध्यें ते माहुरास आले. तेथें मधुकरीवर निर्वाह

करून अनुष्ठानाला प्रारंभ केल्यावर थोड्याच काळांत त्यांना दत्तात्रेयाचें सगुणदर्शन झालें. दत्तात्रेयाप्रमाणें त्यांच्या हृदयांत रेणुकामातेविषयीं असीम भक्ति होती. १६ वर्षें माहूर येथें राहिल्यावर घरच्या मंडळींना त्यांचा शोध लागला आणि दीड तपावर काळ पतिविरहित काढल्यानंतर त्यांच्या पत्नीला पतिदर्शन झालें. माहूर येथें १४ वर्षें संसार केल्यावर श. १८२२ मध्यें त्यांची पत्नी निवर्तली. त्यानंतर आठ-नऊ वर्षांनीं ( वयाच्या ५७ व्या वर्षी ) उमरखेडच्या नित्यानंद सरस्वतींकडून त्यांनीं संन्यासग्रहण केलें आणि पुरुषोत्तमानंद सरस्वती असें नांव धारण केलें. संन्यास-ग्रहणानंतर रेणुका-मातेच्या चरणांजवळ मातृतीर्थावर त्यांनीं मठस्थापना केली आणि वयाच्या ७३ व्या वर्षी श. १८३९ मध्यें इहलोकची यात्रा संपविली.

त्यांची वाणी 'खेचरालाहि सात्त्विकाचा पान्हा फोडणारी' होती. त्यांनीं अनेक देवतांविषयीं लिहिलेलीं स्तुतिगीतें त्यांच्या भेदातीत अद्वैतानुभवाची पूर्ण कल्पना आणून देतात.

तूं तो समर्थ दत्त दाता । नाम सोडिलें कां आतां ॥
जगन्माते, लेकुरवाळे । काय निघालें दिवाळें ॥
कृपासिंधु झाला रिता । कोण्या अगस्तीकरितां ॥
सुकीर्तीची सांठवण । काय नाहीं आठवण ॥
भागीरथी कां बाटली । कामधेनु कां आटली ।
चंद्र थंडीनें पोळला । कल्पवृक्ष कां वाळला ॥
विष्णुदास म्हणे कनका । ढंग लावूं नका नका ॥ [२४]

अशी प्राचीन संतकवींच्या वाणीचें स्मरण करून देणारी त्यांची रचना आहे. त्यांचे भाचे आणि सच्छिष्य श्री. नरहरशास्त्री खरशीकर यांनीं विष्णुदासच्चरितामृताचे तीन खंड आणि विष्णुदासांची कविता संपादून प्रसिद्ध केली आहे.

## रामानंद बीडकर ( श. १७६०-१८३४ ) :

हे अक्कलकोटच्या स्वामींचे एक सच्छिष्य होत. पार्थगोत्री देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. त्यांचा जन्म माघ शु. ८ श. १६६० या दिवशीं झाला. त्यांना

२४. विष्णुदासांची कविता : सं. नरहरशास्त्री खरशीकर, पृ. १२५.

पितृसुख फार काळ लाभलें नाहीं. त्यांची वृत्ति लहानपणापासूनच जिज्ञासू होती. देवभक्तीचें वेडहि बालवयापासूनच त्यांच्या ठिकाणीं वसत होतें. विद्यार्थीवयांत ते पायीं पंढरपूरला गेले होते. सप्तशृंगीची यात्राहि त्यांनीं लहानपणींच केली होती. त्यांनीं गृहस्थाश्रम स्वीकारला तेव्हांपासून कुटुंबाची सर्व जबाबदारी त्यांच्यावर पडली.

त्यांचा व्यवसाय सुगंध्याचा होता. या व्यवसायाच्या निमित्तानें त्यांचें भ्रमण खूप झालें आणि मोठमोठ्या धनिकांशीं व राजेरजवाड्यांशीं त्यांचा संबंध आला. या संबंधामुळें आणि हातीं खेळणाऱ्या पैशामुळें त्यांना व्यसनासक्तीनें पछाडलें. परंतु त्यांची मूळची सत्प्रवृत्ति त्यांना आंतूनच अंकुश लावूं लागली. या मनोमंथनांतूनच त्यांना स्वामींच्या दर्शनास जाण्याची प्रेरणा झाली. स्वामींच्या प्रथम दर्शनानें रामानंदांच्या वृत्तींत परिवर्तन घडून आलें आणि तिसऱ्या भेटीच्या वेळीं स्वामींनीं त्यांच्यावर पूर्ण कृपा केली. त्यानंतर स्वामींच्या आज्ञेनें त्यांनीं नर्मदापरिक्रमा केली. या परिक्रमेच्या काळांतच महेश्वर मुक्कामीं असतां स्वामींच्या निर्याणाची दुःखद वार्ता त्यांना समजली.

नर्मदापरिक्रमेहून परतल्यावर कांहीं काळानें त्यांनीं काशी-प्रयागादि उत्तरेंतील तीर्थें, औदुंबर, नरसोबाची वाडी, आणि पुण्याजवळील देहू, आळंदी, चिंचवड या स्थळांच्या यात्रा केल्या आणि प्रपंच-परमार्थाच्या एकसाथ जीवन-क्रमांतील अनेक भलेबुरे अनुभव स्थिरवृत्तीनें पदरीं बांधून फाल्गुन व. १० श. १८३४ या दिवशीं ते स्वस्वरूपीं लीन झाले.

पुण्यांत शनिवार पेठेंत नदीकांठीं त्यांचा मठ आहे. त्या मठांत काष्ठमय विठ्ठल-रुक्मिणीच्या मूर्ति, गणपति व महादेव असे देव आहेत. मारुती हें त्यांचें प्रथपासूनचें उपास्य होतें. त्यांचा शिष्यपरिवार मोठा होता. परंतु त्या सर्व शिष्यांच्या मांदियाळींत रावसाहेब ऊर्फ बाबा सहस्रबुद्धे ( श. १८०५–१८७६ ) हे विशेष प्रसिद्ध होत. हे मूळचे रत्नागिरीचे ऋग्वेदी शाखेचे कोंकणस्थ ब्राह्मण. पूर्ण नांव : रामचंद्र आप्पाजी सहस्रबुद्धे. त्यांचा जन्म १४ नोव्हेंबर १८८३ रोजीं हुबळी येथें झाला. त्यांचें शिक्षण एल्. सी. ई. पर्यंत झालें होतें. इ. स. १९११ मध्यें श्रीरामानंद बीडकरांचा त्यांच्यावर अनुग्रह झाला. “ आमचा उपदेश वेड लावून घेण्याचा आहे, पण वेडा होण्याला आज कोणीहि तयार नाहीं ” ही रामानंदांची खंत



वासुदेवानंद सरस्वती
शके १७७६–१८३६ )



पंतमहाराज बाळेकुंद्रीकर
( शके १७७७–१८२७ )



**रामानंदमहाराज वीडकर**
( शके १७६०–१८३४ )



**रावसाहेब ( बाबा ) सहस्रबुद्धे**
( शके १८०५–१८७६ )

रावसाहेबांनीं दूर केली आणि ते परमार्थानें ' वेडे ' झाले. त्या अनुग्रहाच्या क्षणापासून जो त्यांचा स्वरूपानुसंधानांत लय लागला तो अखेरपर्यंत. त्यांचें सर्व जीवनयापन एखाद्या विदेही मुक्तासारखें असे, असें सांगतात.

**दीक्षित स्वामी ( श. १७८८–१८४९ ):**

यांचा जन्म नृसिंहवाडीच्या दीक्षित घराण्यांत चैत्र शु. १. श. १७८८ रोजीं झाला. पित्याचें नांव लक्ष्मणशास्त्री व मातेचें नांव अहल्याबाई. हीं दोघेंहि दत्तभक्तिपरायण होतीं. जणुं त्यांच्या भक्तीचें सुख लुटण्यासाठीं दत्तगुरूंनींच त्यांच्या उदरीं जन्म घेतला. लहानपणीं त्यांची वृत्ति विलासप्रिय होती; परंतु इंग्रजी शाळेंत शिकत असतांना, पित्याच्या सुहृदाच्या उपदेशामुळें, विरक्ति प्राप्त झाली आणि ते इंग्रजी शिक्षण व विलास सोडून शास्त्र-मार्गानें वागूं लागले. संस्कृतांतील अनेक विद्यांचें अध्ययन पूर्ण करून त्यांनीं वडिलांचें दत्तोपासनेचें व्रत आचरण्यास प्रारंभ केला. त्यांच्या पत्नीस त्यांची ही विरागी वृत्ति रुचत नसे.

आपल्या मुलाची ही वृत्ति पाहून लक्ष्मणशास्त्र्यांनीं त्यांना वासुदेवानंद सरस्वतींच्या स्वाधीन केलें. या सुयोग्य शिष्याला वासुदेवानंदांनीं ' वाट ' दाखवली आणि ते उत्तर-यात्रेला निघून गेले. इकडे दीक्षित महाराजांचा उत्तरोत्तर विकास होऊं लागला. नियमितपणें ब्रह्मकर्म व अग्निकार्य करीत ते गृहस्थाश्रम आचरीत होते. त्यांची वृत्ति अयाचित आणि अपरिग्रही होती. त्यांचा योगक्षेम, त्यांच्याविषयीं श्रद्धा बाळगणाऱ्या लोकांच्या करवीं, श्रीदत्तगुरुच चालवीत होते. परंतु अनेकदां त्यांना उपवासहि पडे. अशा प्रकारें जीवन-यापन चालू असतां प्लेगनें त्यांची बायको-मुलें निवर्तलीं. त्यांनाहि प्लेगनें घेरलें; परंतु त्यांतून ते कसेबसे सुटले. या आजारांतून उठतांच त्यांनीं चतुर्थाश्रम स्वीकारला. त्यानंतर कांहीं काळानें वासुदेवानंद सरस्वती वाडीस आले आणि चौदा वर्षांनीं या आश्रमान्तरित गुरु-शिष्यांची भेट झाली. श्रीवासुदेवानंद सरस्वती आपल्या या समर्थ सच्छिष्याला आशीर्वाद देतांना म्हणाले कीं, " जें एकमेवाद्वितीय परब्रह्म भक्तोद्धारार्थ भूतलीं अवतीर्ण झालें, ज्याला श्रीदत्त नरसिंह सरस्वती हें नाम आहे, तेच नरसिंह सरस्वती तुम्ही आहां.... " आणि दीक्षितांना ' नरसिंह सरस्वती ' हें नामाभिधान प्राप्त झालें. परंतु आद्य नरसिंह सरस्वतींपासून

# ५ : दत्त संप्रदाय

**परिस्थितीची प्रतिक्रिया :**

गेल्या दोन हजार वर्षांत दत्तोपासनेचा अश्वत्थ कसकसा विस्तार पावत गेला, हें आपण मागील चार प्रकरणांत पाहिलें. दत्तात्रेय ही महाराष्ट्रांतील लोकप्रिय देवता आहे. या देवतेच्या उपासनेला सर्वाधिक प्रेरणा मिळाली, ती श्रीनरसिंह सरस्वतींच्या अवतारामुळें. त्यांच्या अवतारानंतर महाराष्ट्रांत खास दत्तोपासनेचा संप्रदाय निर्माण झाला आणि औदुंबर, वाडी व गाणगापूर हीं त्या संप्रदायाचीं प्रधान तीर्थस्थानें बनलीं. श्रीनरसिंह सरस्वतींच्या अवतारांतून जो दत्तोपासनेचा प्रवाह प्रवर्तित झाला, त्या प्रवाहाशिवाय, दत्तोपासनेच्या क्षेत्रांत अन्य प्रवाहहि नांदत राहिले; परंतु त्यांचें स्वरूप व्यापक नसल्यामुळें ते वैयक्तिक उपासनेपुरतेच मर्यादित राहिले—त्यांना संप्रदायाचें स्वरूप प्राप्त झालें नाहीं. आज ज्याला आपण दत्त संप्रदाय म्हणून ओळखतों, तो प्रवाह श्रीनरसिंह सरस्वतींच्या अवतार-कार्यातून प्रकटलेला आहे.

दत्त संप्रदायाच्या स्वरूपावर दत्तदेवतेच्या मूलस्वरूपाचा प्रभाव विशेष आहे, हें तर खरेंच; परंतु त्याच्या घडणींत, विचार-आचारांत दत्तावतारी महापुरुषांचाहि वांटा मोठा आहे. दत्तात्रेयाच्या मूलस्वरूपांत पौराणिक कल्पनेनुसार चातुर्वर्ण्य-संरक्षणावर अधिक जोर आहे. पुराणांत वारंवार असें सांगितलें आहे कीं, दत्तात्रेयाचा अवतार हा चातुर्वर्ण्याच्या संरक्षण-संवर्धनासाठीं झालेला आहे. अर्थातच दत्तात्रेयाच्या उपासनेच्या क्षेत्रांत वर्णाश्रमोचित आचारधर्माचें कांटेकोर आचरण करणें हा महत्त्वाचा भाग बनला आहे. श्रीनरसिंह सरस्वती हे शंकराचार्यांच्या परंपरेंतील असल्यामुळें त्यांच्या विचारांचा वारसा त्यांनीं सांभाळल्यास त्यांत नवल नाहीं.

ज्या काळांत श्रीनरसिंह सरस्वतींचा अवतार झाला, त्या काळांत ‘ कठीण दिवस युगधर्म । म्लेंच्छराज्य क्रूर कर्म ’ अशी परिस्थिति होती. त्या परिस्थितींत ब्राह्मण वर्ग आचारदृष्ट्या शिथिल होऊं लागला होता. वर्णाश्रमोचित कर्तव्यांचें त्यांना विस्मरण झालें होतें आणि आपला

त्यांची वेगळी ओळख सांगण्यासाठीं त्यांना 'दीक्षितस्वामी' असें म्हणत. ते शास्त्रपारंगत, योगी, असंग्रही असूनहि लोकसंग्रही, निग्रही आणि अनुग्रहदायी, स्वानुभवसंपन्न असूनहि गुरुसेवारत असे होते.

ते अयोध्येला गेले असतां तिकडेच आश्विन व. ७ श. १८४९ या दिवशीं इहलोक सोडून गेले. त्यांनीं ५५ स्तोत्रादि स्फुटें (संस्कृत) आणि साधनेंतील समस्यांची उकल करण्यासाठीं 'गुरुशिष्यसंवाद' या नांवाचें मराठी गद्य प्रकरण लिहिलें आहे. 'त्रिशिर व षड्भुज दत्ता'च्या दर्शनाविषयीं स्पष्टीकरण करतांना त्यांनीं म्हटलें आहे कीं, "कलियुगांत अशा त्रिशिर मूर्तीचें दर्शन होणें दुष्प्राप्य आहे. तें या युगांत एकशिर, द्विहस्त व बालोन्मत्त अथवा पिशाच्च वृत्तीनें होणारें आहे."[२५] त्यांचे गुरु वासुदेवानंद सरस्वती यांनीं पुरस्कारिलेलें दत्तस्वरूप असेंच असल्याचें आपण पहिल्या प्रकरणांत पाहिलें आहे.

**अगणितांचें अपुरें गणन :**

माणिक प्रभु, अक्कलकोटचे स्वामी व वासुदेवानंद सरस्वती या त्रिमूर्तींच्या प्रभावामुळें गेल्या शतकभरांत अनेकांचीं जीवनें दत्तभक्तीनें भारलीं गेलीं. त्यांचे शेंकडों शिष्य परमार्थसाधना करीत राहिले. यांशिवाय महाराष्ट्रांत व इतरत्रहि अनेक दत्तसाक्षात्कारी पुरुष होऊन गेले. पूर्वाश्रमीं आद्य क्रांतिकारक वासुदेव बळवंतांचे सहकारी असलेले आणि पंढरपुरास दत्ताश्रमांत समाधिस्थ झालेले सीनोरचे श्रीसच्चिदानंदस्वामी ऊर्फ मुनिस्वामी (श. १७८२–१८५६), कारंजाचे ब्रह्मानंद सरस्वती ऊर्फ लीलादत्त, वाडीचे अग्रपूजार्ह नारायणस्वामी, गाणगापूरचे चिदानंद सरस्वती, नाशिकचे देव मामलेदार, इस्लामपूरचे दत्तमहाराज, कोल्हापूरचे श्रीकृष्ण स्वामी, केडगांवचे नारायण महाराज, शिरडीचे साईबाबा, पुण्याचे जंगली महाराज या सर्व व्यक्ति दत्तसाक्षात्कारी समजल्या जातात.

त्या सर्व ज्ञात-अज्ञात दत्तोपासकांचें गणन करीत बसणें अशक्य आहे. त्यांचीं जीवनें ज्या दत्तप्रभूंच्या चरणीं विसांवण्यासाठीं लांचावलीं होतीं, त्या दत्तप्रभूंच्या चरणांचें स्मरण करून हें परिगणन येथेंच थांबवितों.

* * *

---

२५. वासुदेवानंद सरस्वती ग्रंथमाला, तृतीय पुष्प, पृ. ३८५.

धर्मविहित आचार विसरून ते निर्वाहासाठीं नाना व्यवसाय करीत होते. किंबहुना आपला संपूर्ण धर्मच ज्यांच्या आक्रमणामुळें संकटांत आला होता, त्या यवनांच्या सेवेंतहि त्यांनी आपली बुद्धि व शरीरें रत केलीं होतीं. अशा परिस्थितींत श्रीनरसिंह सरस्वतींनीं वैदिक परंपरेच्या पुनरुज्जीवनासाठीं व संरक्षणासाठीं वर्णाश्रमधर्माला प्राधान्य दिलें. ‘धर्मो रक्षति रक्षितः’ ही त्यांची त्यामागची भूमिका होती. अर्थातच धर्माचें संरक्षण करावयाचें म्हणजे धर्मोक्त आचारधर्माचें पालन आवश्यक ठरणार. अशा प्रकारें वर्णाश्रमधर्माचें कांटेकोर पालन आणि उपासनेचें कर्मकांड हा दत्त संप्रदायाचा प्रधान विशेष म्हणजे एक परिस्थितीची प्रतिक्रिया आहे. ही प्रतिक्रिया शालिवाहन शकाच्या चौदाव्या शतकांतील आहे. त्यानंतर युगमानांत अनेक स्थित्यंतरें होत आलीं. परंतु युगधर्माचें भान ठेवून जनमानसावर प्रभाव गाजविणारा आणि त्यांच्या विचारांत परिवर्तन घडविणारा श्रीगुरूंच्या तोलाचा महापुरुष गेल्या पांच शतकांत निर्माण झाला नाहीं. त्यामुळें दत्त संप्रदायाच्या जडण-घडणींत नव्या प्रेरणांचा उदय होऊं शकला नाहीं. माणिक प्रभूंसारख्या कांहीं सत्पुरुषांनीं नवयुगाचें भान ठेवून नव्या प्रेरणा प्रसृत करण्याचा प्रयत्न केला, तर वासुदेवानंद सरस्वतींसारख्या प्रज्ञावंतांनीं सनातन परंपरेच्या पुनरुज्जीवनांतच आपल्या सर्व शक्ति वेंचल्या. दत्तोपासनेच्या क्षेत्रांत जनसाधारणाच्या मनांतील पूर्वीचे संकेत इतके दृढ झालेले होते कीं, नरसिंह सरस्वतींच्या नंतर झालेल्या सर्व श्रेष्ठ दत्तोपासकांच्या विचारांतील नवे-जुनेपणाला डावलून त्यांनीं आपल्या ‘सनातन’ श्रद्धा सुरक्षित ठेविल्या!

**सिद्ध पुरुषांची किमया :**

दत्त संप्रदायाचें उपास्य असलेला दत्तात्रेय हा एक योगी असल्यामुळें दत्त संप्रदायांत स्वाभाविकच योगालाहि प्राधान्य मिळालें. चांगदेव राऊळां-पासून आजपर्यंत झालेले प्रायः सर्व महान् दत्तोपासक योगी होते. नाथ संप्रदायांत तर दत्तात्रेय ही योगप्रदायक देवताच मानली आहे. नाथसिद्धां-विषयीं सर्वसाधारण समाजांत आजहि असा समज रूढ आहे कीं, नाथसिद्ध हे योगप्रभावानें हवें तें करूं शकत. चांगदेव राऊळ हे हातांतील खराटा मारून शक्तिदान करूं शकत, तर चक्रधर हेहि केवळ दृष्टिपातानें स्थित्यानंद

प्राप्त करून देत. गुरुचरित्रांत अशीं अनेक वर्णनें आहेत कीं, श्रीनरसिंह सरस्वतींनीं आपल्या अमोघ शक्तींनीं अनेक आर्तांचीं शारीरिक दुःखें व संकटें एकदम दूर केलीं. अलिकडच्या काळांतहि सिद्ध पुरुषांच्या किमयेचें कुतूहल आणि आकर्षण जनसाधारणांत कमी नाहीं. आधुनिक काळांत होऊन गेलेल्या दत्तोपासक सिद्ध पुरुषांचीं चरित्रें आपण वाचलीं, तर त्यांचा बहुतेक भाग अलौकिक शक्तींच्या वापरानें भरलेला दिसेल.

दत्तोपासनेच्या बळावर सिद्ध पुरुषांना अशा शक्ति प्राप्त होतात आणि शक्तींच्या सहाय्यानें ते आपलीं दुःखें दूर करूं शकतात, आपल्या कामनांचीं पूर्ति करूं शकतात आणि साधनेच्या मार्गावरहि आपलें विहंगोड्डाण करवूं शकतात, ही जी भावना जनसाधारणाच्या मनांत प्रथमपासून रुजत गेली, त्या भावनेंतहि दत्त संप्रदायाच्या लोकप्रियतेचें रहस्य आहे. केवळ दर्शन-स्पर्शनानें वा आशीर्वादानें या सिद्ध पुरुषांनीं आपल्या व्यथा-वेदना नाहींशा कराव्या आणि आपल्या मनःकामना पूर्ण कराव्या, अशी त्यांची अपेक्षा असते. या अपेक्षेपोटीं बऱ्याच अर्थार्थींनीं संप्रदायोपदिष्ट उपासना-क्रमाचा स्वीकार केलेला असतो. सत्पुरुषांना अभिप्रेत असलेल्या मानसिक उन्नयनाच्या कल्पनेपासून ते दूर राहतात आणि आत्मविकासांतून आत्मप्राप्ति करण्याचा महान् पुरुषार्थ डावलून, सिद्धींच्या परिसानें आपल्या जीवन-पाषाणाचें सोनें व्हावें, अशी आशा बाळगून असतात.

### गुरुसंस्थेचा गौरव :

दत्तसंदायाचें उपास्य असलेला दत्तात्रेय हा गुरुदेव आहे. त्याची उपासना गुरुस्वरूपांतच करावयाची असते. 'श्रीगुरु दत्त' किंवा 'गुरुदेव दत्त' हा त्याचा जयघोष आहे. त्याचमुळें गुरुसंस्थेला प्राधान्य असलेल्या सर्व साधना-प्रणालींत दत्तात्रेयाची पूज्यता रूढ झाली. परमार्थांत गुरुसंस्थेचें महत्त्व स्वयंसिद्ध आहे. विकल्पविकारांचें तिमिर दूर सारून यथार्थज्ञानाचा प्रकाश दाखविण्यासाठीं सद्गुरूची नितांत आवश्यकता असते. दत्तात्रेय हा 'परमगुरु' असल्यामुळें पथप्रदर्शक गुरु आणि गुरूच्या मार्गदर्शनानें होणारी परमप्राप्ति हे दोन्ही विशेष त्यांच्या स्वरूपांत सामावले आहेत. दत्तात्रेयाचें स्वरूप असें असल्यामुळें दत्तसंप्रदायांत गुरु-शिष्यांच्या मानवी परंपरांचें सातत्य राहिलें नाहीं आणि संप्रदायाची संघटित बांधणीहि होऊं शकली नाहीं. साधकांना

प्रत्यक्ष दत्तात्रेयाकडूनच बोध मिळाल्याच्या कथा रूढ आहेत. अशा स्थितींत सिद्धावस्थेला पोंचलेले पुरुष आपापल्या विचारांचा नि साधनापद्धतींचा पृथक् पृथक् उपदेश करीत असत आणि त्यांच्या विभूतिमत्त्वानें भारावलेले शिष्य वा सर्वसाधारण उपासक आपापल्या श्रद्धेय पुरुषाच्या आदेशानुसार पृथक् पृथक् आचारविशेषांचें वा उपासनेचें अवलंबन करीत. ज्या अर्थानें आपण महानुभाव संप्रदाय, वारकरी संप्रदाय, समर्थ संप्रदाय या संज्ञा वापरतों, त्या अर्थानें दत्त संप्रदाय ही संज्ञा वापरतां येणार नाहीं. दत्त संप्रदायांत साधकांसाठीं सांप्रदायिक अनुशासन रूढ असूनहि त्या अनुशासनाच्या कक्षेबाहेर नांदणारे अनेक उपासक आढळतात. प्रत्येक दत्तसाक्षात्कारी वा दत्तावतारी सत्पुरुषाच्या नांवानें स्वतंत्र संप्रदायसदृश परंपरा रूढ आहेत. माणिक प्रभूंचा ‘ सकलमत संप्रदाय ’, पंत महाराजांचा ‘ अवधूत संप्रदाय ’, अक्कलकोटच्या स्वामींची विधिनिषेधातीत उन्मुक्त साधनाप्रणाली, वासुदेवानंद सरस्वती व नारायणमहाराज केडगांवकर यांच्या वर्णाश्रमोचित कर्मांवर जोर देणाऱ्या परंपरा, इत्यादि पृथगात्म प्रवाह आजहि दत्त संप्रदायाच्या कक्षेंत वाहत आहेत.

**संस्कृति-समन्वयाचा प्रयत्न :**

दत्तात्रेय हें समन्वयाचें प्रतीक असल्यामुळें दत्त संप्रदायांत शैव आणि वैष्णव परंपरांचा जसा समन्वय साधला गेला, तसाच हिंदु-मुसलमानांच्या समन्वयाचाहि प्रयत्न झाला. आश्चर्य असें कीं, या प्रयत्नाचा मूलारंभ श्रीनरसिंह सरस्वतींच्या चरित्रांत झालेला आहे. त्यानंतर जनार्दनस्वामी व एकनाथ यांच्या जीवनकाळांतहि दत्तोपासनेच्या पार्श्वभूमिवर हिंदु-मुस्लिम समन्वयाचा प्रयत्न झाला. जनार्दनस्वामींचे गुरु चांद बोधले हे सूफींच्या कादरी उपपंथांतले होते आणि चांद बोधल्यांचा एक मुसलमान शिष्य शेख महंमद हा योग व भक्ति यांचें विवरण करणारे ग्रंथ मराठींत लिहीत होता. जनार्दनस्वामी यवनांचे सेवक असूनहि त्यांच्या दत्तभक्तीचा प्रभाव मुसलमानांवर, मुस्लिम राज्यकर्त्यांवर पडला होता. त्यांच्या अमदानींत सुटीचा दिवस शुक्रवारऐवजीं गुरुवार मानला जाऊं लागला. त्यांनीं आपल्या गुरूचें समाधि-मंदिर देवगिरीच्या किल्ल्याच्या दर्शनी भागीं बांधविलें. माणिकप्रभूंच्या सकलमत संप्रदायांत तर मुसलमानांचा भरणा विशेष आहे.

परंतु हा समन्वयाचा प्रयत्न दुर्दैवानें यशस्वी होऊं शकला नाहीं. जो मुसलमान वर्ग दत्त संप्रदायाच्या कक्षेंत वावरत असे, तो संप्रदायाचें तत्त्वज्ञान पटल्यामुळें नव्हे, तर दत्तोपासक सिद्धपुरुषांच्या भोंवतीं चमत्कारांचें नि अद्‌भुत सिद्धींचें जें एक गूढ वलय निर्माण झालेलें असे, त्या वलयाच्या आकर्षणानें खेचला जात असे. त्या त्या सिद्धपुरुषाविषयींच्या विभूतिपूजे-शिवाय अन्य बाबतींत आपल्या विधर्मी गुरुबंधूंशीं त्यांनीं कुठलाहि समन्वय साधला नाहीं. श्रीनरसिंह सरस्वतींचें चरित्रहि या गोष्टीचें प्रत्यंतर घडवीत आहे. माणिकप्रभु तर स्वतःच या परिस्थितीनें विषाद पावले होते, असें त्यांच्या चरित्रावरून दिसतें. या समन्वयाच्या प्रयत्नासाठीं दत्त संप्रदायांत कांहीं मुसलमानांचे आचारविशेष उपासनेंत रूढ झाले. भजनांत संगीताला मिळालेलें प्राधान्य ही सूफीची उसनवारी आहे. धूपासारख्या सुगंधी द्रव्यांचा वापरहि मुस्लिम धर्मस्थानांतील वातावरणाचें अनुकरण सुचविणारा आहे. जनार्दनस्वामी व एकनाथ यांना दत्तात्रेयानें मलंगवेशानें भेट दिली, तर निरंजन रघुनाथांनाचे शिष्य नारायणमहाराज जालवणकर यांना गिर-नारवर फकिराच्या रूपानें दत्तात्रेयांनीं दर्शन दिलें. हिंदूंच्या या देवतेला यवनरूप घेऊन येण्याची आवश्यकता भासावी, यांत हिंदूंची समन्वयाची तिडीक प्रतिबिंबित झाली आहे.

**दोन मूल्यांकनें :**

महाराष्ट्रांतील सर्वाधिक लोकप्रिय संप्रदाय म्हणजे वारकरी संप्रदाय. या भक्तिसंप्रदायाच्या उदार आणि उदात्त परंपरेच्या पार्श्वभूमीवर दत्त संप्र-दायाचें मूल्यांकन करण्याचा प्रयत्न अनेक अभ्यासकांनीं केला. असा प्रयत्न करणाऱ्या बहुतेक अभ्यासकांनीं दत्त संप्रदाय आणि समर्थ संप्रदाय यांवर एकाच पद्धतीचे आक्षेप घेतलेले आहेत. त्याचप्रमाणें दत्त संप्रदायाच्या वर्णाश्रमधर्म-प्राधान्याचा गौरव करून वारकरी संप्रदायांतील 'औदार्या'चा निषेध करण्याचा प्रयत्नहि कांहीं अभ्यासकांनीं केला आहे. दत्त संप्रदायाकडे दोन विभिन्न दृष्टींनीं पाहणाऱ्या दोघां प्रातिनिधिक पंडितांचीं मतें पाहिल्यावर आपणांस दत्त संप्रदायविषयक विचारप्रवाहांची स्पष्ट कल्पना येईल.

आहिताग्नि शं. रा. राजवाडे यांनीं या दोन संप्रदायांची तुलना करतांना एके ठिकाणीं म्हटलें आहे : " अर्वाचीन मुसलमानी साम्राज्याच्या काळा-

मध्यें भीमातटाकीं आणि कृष्णातटाकीं जे दोन परस्पर विरुद्ध औद्धिक आणि सांघिक स्वरूपाचे संप्रदाय उदयास आले ते पहा. कृष्णातटाकीं उत्पन्न झालेल्या गुरुसंप्रदायानें कर्ममार्गावर मीमांसेचें रक्षण केलें. त्यानें जितका प्राचीन यज्ञयागाचा पुरस्कार केला, तितका दुसऱ्या कोणीं केला नाहीं. त्याचें आराध्य दैवत गुरु दत्तात्रेय. हें त्रयी विद्येचें, तीन कर्मांचें आणि त्रेताग्नीचें यथार्थ प्रतीक आहे. दत्त हा अग्नीनें दिलेला अनसूयेचा पुत्र म्हटला आहे. अत्रि म्हणजे साक्षात् अग्नि ( अद् = खाणें, किंवा अत् = गमन करणें, या धातूपासून ) व अनसूया म्हणजे मूर्तिमंत सहिष्णुता होय. प्राचीन वैदिक यज्ञाचा धर्म हा अत्यंत सहिष्णु धर्म आहे. त्यानें आपलें उज्ज्वल रूप रक्षण करतांना दुसऱ्या कोणाचाहि छळ केला नाहीं. हा दत्तात्रेय जितका सोंवळा देव आहे. तितकाच त्याचा 'गुरुचरित्र' हा ग्रंथहि अगदीं सोंवळा आहे. इतका कीं, तो शूचिर्भूत ब्राह्मणानें सोंवळ्यांत वाचावा व सोंवळ्यांत पूजन करून ठेवावा. कारण तो केवळ वर्णाश्रमधर्मीयांचें कर्माचरण सांगणारा आहे. भीमातटाकावरील वसुधैवकुटुंबवृत्तीच्या वारकरी संप्रदायांतील साधुसंतांनीं यज्ञयागांतील हिंसेला अनुलक्षून त्यांची वेळीअवेळीं अजाणपणें यथेच्छ निंदा केली आहे. त्याचें आराध्यदैवत पंढरपूरचा पांडुरंग. तें 'विटेवरी उभें कटिवरी हात' अशा स्वरूपाचें एकटेंच एक खडें प्रतीक आहे. त्याचे जवळ सोंवळ्याओवळ्याचा विधिनिषेध नाहीं. तें भक्तीच्या पूजनविधीनेंच काय, पण नाममात्रानेंहि पावणारें आहे. त्याचा मुख्य संहिताग्रंथ ज्ञानेश्वरी. हा केवळ वेदान्त, भक्ति आणि योग यांनीं सजलेला आहे. त्याला कर्माचा, म्हणजे मीमांसकी वैदिक कर्माचा, किंचितहि विटाळ नाहीं. तो पाहिजे त्यानें पाहिजे त्याला वाचून दाखवावा व समजून घ्यावा. अशा या महाराष्ट्राच्या परमपूज्य ग्रंथद्वयाकडे इतिहासाच्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे एकानें शंकराचार्यांच्या अद्वैतमताचा तिरस्कारानें निषेध कां केला व दुसऱ्यानें 'आचार्यातें वाट पुसत' असें म्हणून त्याला आदरानें शिरःस्थानीं कां बसविलें, याचें कारण समजतें."[1]

संत-साहित्याचे एक ख्यातनाम समालोचक प्रा. गं. बा. सरदार याच दोन संप्रदायांची तुलना करतांना लिहितात : "हा ( दत्त ) संप्रदाय

१. षड्दर्शनसमन्वय आणि पुरुषार्थमीमांसा, पृ. २७९–२८०.

चौदाव्या शतकाच्या अखेरीस श्रीपाद श्रीवल्लभ व नृसिंह सरस्वती या दोन सिद्ध पुरुषांच्या पुण्याईनें उत्कर्ष पावला. 'गुरुचरित्र' हा या पंथाचा प्रमाण-ग्रंथ असून त्यांत मुख्यतः कर्मकांडाचेंच तपशीलवार विवरण आहे. लोकांच्या मनावरील वर्णाश्रमधर्माची पकड कायम ठेवून सनातन वैदिक परंपरेचें पुनरुज्जीवन करण्याची उत्कंठा या ग्रंथांत दिसून येते. नृसिंह सरस्वतींची परंपरा आद्य शंकराचार्यांपासूनची आहे. तेव्हां त्यांच्या विचारसरणींतहि ब्राह्मण्याचें रक्षण म्हणजे वैदिक धर्माचें संरक्षण असें समीकरण आढळल्यास नवल नाहीं. 'कठिण दिवस युगधर्म। म्लेंच्छ राज्य क्रूर कर्म' अशा बिकट परिस्थितींत दत्त संप्रदायानें ब्राह्मण समाजांतील धर्मभावना जिवंत ठेवण्याची पराकाष्ठा केली. (त्या काळांत चाललेली ब्राह्मणांची) घसरगुंडी थांबवून ब्राह्मणांनीं कर्मभ्रष्टतेमुळें आतांपर्यंत गमावलेली आपली प्रतिष्ठा पुनः परत मिळवावी, अशी दत्तसांप्रदायिकांची खटपट होती. त्या वेळचा काळ ध्यानांत घेतला म्हणजे त्यांच्या या कामगिरीचें महत्त्व पटल्याखेरीज राहत नाही. मात्र वारकरी पंथाच्या मानानें दत्त संप्रदायाचें कार्यक्षेत्र फार मर्यादित होतें, त्याचा दृष्टिकोन अगदींच संकुचित होता, असें म्हणावें लागतें. 'भावार्थदीपिका' लिहून ज्ञानेश्वरांनीं शूद्रातिशूद्रां-साठीं मोक्षसुखाचें अन्नछत्र घातलें; पण 'गुरुचरित्र' लिहितांना सरस्वती गंगाधराची नजर ब्राह्मणांच्या हितसंबंधांपलीकडे कधीं पोहोंचलीच नाहीं. वारकरी संतांप्रमाणें सामाजिक विषमतेची तीव्रता कमी करण्याऐवजी त्यांनीं जन्मसिद्ध उच्चनीचभावाचें समर्थन केलें. इतकेंच नव्हे तर शूद्रांना वेदमार्ग शिकविणारा मनुष्य पुढच्या जन्मीं चांडाळ होतो, अशी दहशत घालून ठेवली. अशा पंथाबद्दल चोखामेळ्याच्या किंवा गोरा कुंभाराच्या ज्ञाति-बांधवांना कसें प्रेम वाटणार ? सकामतेचा पुरस्कार, अंधश्रद्धा व चमत्कार यांचें प्राबल्य यांमुळें बहुजनसमाजाला थोडा दरारा वाटला, तरी त्याच्या मनांत कधीं आपुलकी निर्माण झाली नाहीं. वारकरी पंथाच्या प्रभावामुळें हेमाद्रि-बोपदेवांच्या ग्रंथांतील पुनरुज्जीवनवादी प्रवृत्ति कांहीं काळ मागें पडली होती; तिनेंच दत्त संप्रदायाच्या रूपानें आतां पुनः डोकें वर काढलें."[२]

---

२. संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुति, पृ. ९८–१००.

## सिद्धान्त आणि साधना :

'त्रिपुरारहस्या'चा ज्ञानखंड, 'दत्तप्रबोध' व 'दत्तमाहात्म्य' या ग्रंथांत दत्त संप्रदायाचें तत्त्वज्ञान ग्रथित झालें असून 'गुरुचरित्र' हा ग्रंथ संप्रदायाच्या आचारधर्माचें विवरण करणारा आहे. त्याशिवाय 'अवधूतगीता', 'जीवन्मुक्तगीता' आणि 'गुरुगीता' यांतूनहि संप्रदायाचे सिद्धान्त आले आहेत. वामनबोवांनीं 'दत्तप्रबोधां'त दत्त-अनसूया-संवादाच्या मिषानें जीव-जगत्—जगदीश्वरासंबंधीं जे सिद्धान्त मांडले आहेत, ते संक्षेपानें असे : १. ब्रह्म हें अखिल, अभंग, निरुपाधिक, निःसंग, करून अकर्तें, भोगून अभोक्तें, शुद्ध, शांत, निर्गुण, निरामय, नित्यानंद व मनाला अगोचर आहे. ब्रह्मांडाची सृष्टि करणारें व इंद्रियांना प्रेरणा देणारें तेंच आहे. तेंच जगद्रूपानें नटलें आहे. तें ज्ञानदृष्टीनें जाणतां येतें. २. मूळ परब्रह्माची त्याहून भिन्न नसणारी जी इच्छाशक्ति तीच प्रकृति होय. तिचें स्वरूप अपरिमेय असून तिच्यांतूनच त्रिगुणात्मक माया, भूतसृष्टि व तिन्ही लोक उत्पन्न होतात. ३. जे मूळ परब्रह्मस्वरूप आहेत, परंतु भिन्न भिन्न देह धारण केल्यामुळें भिन्न भिन्न दिसतात, ते जीव होत.

वासुदेवानंद सरस्वतींच्या 'दत्तमाहात्म्य' या ग्रंथांत संप्रदायाचे सिद्धान्त सुलभ स्वरूपांत विवरिले आहेत. सहस्रार्जुनाला कर्मयोगाचा संदेश देतांना दत्तात्रेय म्हणतो :

श्रीदत्त म्हणे अर्जुना । अंगिकारावें माझ्या वचना ।
लावूनि स्वरूपीं मना । बाह्याचरणा करावें ॥
जरी अवशिष्ट नसे कृत्य । तरी आचारा सेवी अगत्य ।
स्वतःचें नसतांही कृत्य । होईल सत्य परोपकार ॥
धर्म आहे सनातन । त्याला न द्यावा सोडून ।
स्वयें धर्म आचरून । जनां शिक्षण तें लावावें ॥
येणें होयें परोपकार, नातरी सिद्धा पाहूनि इतर ।
वागतील जरी अनाचार । होईल संहार संकरानें ॥
लोकबाधा न व्हावी म्हणून । लोक जातील भुलोन ।
असें दाखवावें बाहेरून । विपरीताचरण जनांमाजीं ॥

तूं गृहस्थ असती । न टाकी वर्णाश्रमासी ।
करी त्रिविध कर्मासी । सक्ति मानसीं न धरितां ॥
जे असती मुक्त । ते कोठेंहि न होती सक्त ।
त्यांना करी अनुरक्त । असी वस्तु जगीं नाहीं ॥[3]

अशा प्रकारें वर्णाश्रमोचित क्रिया आचरून आणि सगुणोपासना व योगमार्ग यांच्या सहाय्यानें वाटचाल करून अंतिमोद्दिष्ट प्राप्त करतां येतें, असें सांप्रदायिक ग्रंथांत सांगितलें आहे. वामनबोवा 'दत्तप्रबोधां'त म्हणतात :

जन्मोनि साधिजे हें स्वहित । सगुणभक्तीसि भावें रत ।
ईश्वर आहे सर्वगत । त्या पदीं नत होईजे ॥
सर्वांभूतीं साधिजे मन । सर्वांतर व्यापक देवचि जाण ।
ही भावना जडतां पूर्ण । भिन्नाभिन्न द्वैत विरे ॥
नाना कल्पना सरतां । देव भक्तचि उरे वार्ता ।
हृदयीं चढे सप्रेमता । पावे कोमलता अंतरीं ॥
नामस्मरणीं उल्हास । श्रवणीं सांठवी कीर्तनरस ।
वृत्तिसी होय उदास । लागे ध्यास आगळा ॥
ध्यासीं मन होतां निमग्न । मग सहजचि होय उन्मन ।
साक्षात्कार ठाके पुढें येऊन । दर्शन सगुणाचें ॥[4]

गुरुचरित्रांत अनेक ठिकाणीं विस्तारानें विवरिलेला शास्त्रोक्त आचारधर्म सर्वपरिचित आहे.

संसार म्हणजे स्वप्नापरी । जैसें पुष्प असे मोगरी ।
सवेंचि होय शुष्कवरी । तयापरी देह जाणा ॥
जैसी वीज असे लवत । सवेंचि होय गुप्त ।
त्याचि परि देह होत । स्थिर नव्हे परियेसा ॥[5]

असें देहाचें स्वरूप अशाश्वत असल्यामुळें जोंवर शरीर धड आहे, तोंवर कर्मांनीं चित्तशुद्धि साधीत राहिलें पाहिजे. गुरुचरित्राच्या ३७ व ३८ या अध्यायांत ब्राह्मणाचा आचारधर्म विस्तारपूर्वक सांगितला आहे.

३. दत्तमाहात्म्य, १६.२३-२९.

४. दत्तप्रबोध.

५. गुरुचरित्र, १२. ११-१२.

दत्त संप्रदाय आणि मराठी भक्तिपरा यांत सगुणोपासना आणि गुरु-भक्ति हे समान विशेष आहेत. परंतु दत्तात्रेयाच्या सगुणसाक्षात्कारासाठीं दत्तोपासक अत्यंत कठोर अनुष्ठानें आचरतात, कायाक्लेश करून घेतात, प्रसंगीं आत्महत्येलाहि प्रवृत्त होतात. निरंजन रघुनाथांनीं गिरनारवर डोकें दगडावर आपटून प्राण देण्याचा प्रयत्न केला, तर त्यांचे शिष्य नारायण-महाराज जालवणकर यांनीं १४ दिवस अन्नपाणी वर्ज्य केलें होतें.

महानुभाव संप्रदायाचें तत्त्वज्ञान जसें चक्रधरसिद्धान्तसूत्रें या ग्रंथांत आलें आहे, वारकरी संप्रदायाच्या तत्त्वज्ञानाचा प्रपंच जसा ज्ञानेश्वरी व नाथभागवत या ग्रंथांत झालेला आहे, समर्थ संप्रदायाचे सर्व सिद्धान्त जसे दासबोधांत ग्रथित झाले आहेत, तसा संप्रदायाच्या तत्त्वज्ञानाचा खास विचार करणारा ग्रंथ दत्त संप्रदायाच्या कक्षेंत नाहीं. गुरुचरित्रांत आचारधर्म आणि तोहि प्राधान्यानें ब्राह्मणांचा आचारधर्म विवरिला आहे. पुराणांतील दत्तोपदेशाचे प्रसंग, दत्तप्रणीत व दत्तविषयक उपनिषदें, अवधूतगीता, जीवन्मुक्तगीता, गुरुचरित्र, दत्तप्रबोध, दत्तपुराण व दत्तमाहात्म्य हे ग्रंथ आणि जनार्दनस्वामींपासून आजपर्यंत झालेल्या दत्तोपासकांचें प्रचंड साहित्य धांडोळून दत्त संप्रदायाच्या सिद्धान्तांचें आणि साधनाप्रणालीचें सुस्पष्ट दर्शन घडविण्याचा प्रयत्न कुणातरी विशेषज्ञानें करावयास हवा. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक परंपरेंत दत्तोपासनेच्या प्रवाहाचें स्थान किती व्यापक होतें, हें आपण, इतिहासाचा ज्ञाताज्ञात चित्रपट उलगडून, आतांपर्यंत पाहिलेंच आहे. तेव्हां या पार्श्वभूमीवर असा प्रयत्न झाला तर तें मराठी भक्तिपरंपरेचें स्वरूप समजावून घ्यावयास पोषक आणि पूरक ठरेल. कारण महानुभाव, वारकरी आणि समर्थ या लोकप्रिय संप्रदायांच्या सिद्धान्तांचा विचार करणारे अनेक स्फुट व ग्रांथिक प्रयत्न झाले आहेत; दत्त संप्रदाय या बाबतींत उपेक्षित आहे.

संप्रदायाच्या सिद्धान्तांचें विवरण करणारा एकमेव प्रातिनिधिक ग्रंथ नसल्यामुळें सामान्य जनांना संभ्रान्ति निर्माण होते. तशांतच संप्रदायाशीं संबद्ध अशी जाणती मंडळी प्रसंगीं जे विचार प्रदर्शित करतात, त्यांमुळें रूढ कल्पनांची जुळणी ढांसळून जाते. श्री पारनेरकर महाराज यांनीं एकदां इंदूर येथें दत्तसांप्रदायिकांपुढें प्रवचन देतांना असें सांगितलें कीं, " दत्त

संप्रदायाचे लोक वेदान्तीहि आहेत. वेदान्ताचा आणि दत्त संप्रदायाचा अर्थाअर्थी संबंध नाहीं. दत्त संप्रदाय हा प्रत्यक्षवादी, सगुणवादी आहे. दत्त संप्रदायानें जीवनाला अत्यावश्यक असलेल्या मंत्रशास्त्राची जोपासना, नवें संशोधन आणि जपणूक करण्याची फार मोठी कामगिरी आजवर केली आहे. मंत्रशास्त्राचे रखवालदार आणि तत्त्वतः सगुणवादी दत्तसंप्रदायी जेव्हां वेदान्त बडबडतात, तेव्हां त्यांच्याकडे पाहून हंसावें का रडावें हेंच कळत नाहीं ! "[६]

वर्णाश्रमधर्मपालन, सगुणध्यानासाठीं प्रदीर्घ अनुष्ठानें, गुरुचरित्राचीं पारायणें, गुरूपदिष्ट योगमार्गाचें आचरण, इत्यादि विशेषांनीं युक्त असलेली दत्त संप्रदायाची साधनाप्रणाली मराठी भक्तिपरंपरेंत पृथगात्म आणि स्वतंत्र अभ्यासाचा विषय ठरणारी आहे.

दत्त संप्रदायांत सगुणध्यानासाठीं जरी दत्तात्रेयाचें सालंकृत सगुणरूप वापरलें जात असलें, तरी पूजोपचारासाठीं मूर्तीऐवजीं पादुकांचें स्वरूप विशेष मानलें जातें. औदुंबर, वाडी आणि गाणगापूर या तीनहि ठिकाणीं दत्तात्रेयाच्या पादुकाच आहेत. पुराणांत दत्तात्रेयाच्या मूर्तीचा विचार केलेला आहे, हें आपण पहिल्या प्रकरणांत पाहिलेंच आहे. असें असतां नरसिंह सरस्वतींच्या अवतारकालांत पादुकांच्या पूजेची पद्धति कशी रूढ झाली? त्यांच्यापूर्वीं महानुभावांच्या परंपरेंत दत्ताची मूर्तिच असे. मला वाटतें, मूर्ति-मंदिरांचा विध्वंस करणाऱ्या यवनांच्या अत्याचारांपासून आपल्या श्रद्धास्थानांना सुरक्षित ठेवण्यासाठीं आणि त्यांच्या उपास्यप्रतीकांशीं कांहींसें साम्य दाखविण्यासाठीं शिलासनस्थ पादुकांची उपासना हेतुतः रूढ केली असावी. ज्या चरणकमळांच्या छंदामुळें भक्तांचे मनोमिलिंद वेडावतात, त्या चरणांचें प्रतीक उपासनेंत रूढ करण्यांत एक भक्ति-वैज्ञानिक औचित्यहि आहे.

**संप्रदायाचे मान्य ग्रंथ :**

गुरुचरित्र, दत्तप्रबोध, दत्तमाहात्म्य आणि गुरुलीलामृत हे ग्रंथ दत्त-संप्रदायांत विशेष मान्यता पावलेले आहेत.

**गुरुचरित्र :** हा ग्रंथ म्हणजे दत्त संप्रदायाचा वेद आहे. या ग्रंथांतील शब्दाशब्दाला मंत्राची योग्यता आहे, असें मानलें जातें. हा ग्रंथ सरस्वती

---

६. 'परिचय' : सं. ल. का. देशपांडे, पृ. १८८.

गंगाधरांनीं लिहिलेला आहे. तिसऱ्या प्रकरणांत सरस्वती गंगाधरांविषयीं थोडी माहिती येऊन गेलीच आहे. ते श्रीगुरुशिष्य सायंदेवाचे पांचवे वंशज असल्यामुळें त्यांचा काळ श्रीगुरूंच्या निर्याणानंतर सत्तर-ऐंशीं वर्षे इतका असावा. त्यांनीं लिहिलेल्या या ग्रंथाचा काळ श्रीगुरूंच्या निर्याणानंतर १०० वर्षे ( श. १४८० ) असा मानला जातो. सरस्वती गंगाधरांची मातृभाषा कानडी. 'भाषा न ये महाराष्ट्र' असें ते म्हणतात. परंतु असें असूनहि श्रीगुरूंच्या बहुसंख्य मराठी भक्तांच्या उपयोगासाठीं त्यांनीं लिहिलेला ग्रंथ मराठी-कानडीच्या स्नेहानुबंधाचें दृढीकरण करणारा आहे. सरस्वती गंगाधरांच्या मराठी रचनेंत क्वचित् कानडी शब्द व कानडी लकबीहि दिसून येतात. त्यांनीं रचलेलीं दोन कानडी भक्तिगीतें उपलब्ध आहेत.

सरस्वती गंगाधर-विरचित गुरुचरित्राचे ५२ अध्याय असून ओवीसंख्या ७४९१ इतकी आहे. या ५२ अध्यायांपैकीं अध्याय १ मंगलाचरण, अध्याय २–९ दत्तावतारचरित्र, अध्याय ५ ते १० श्रीपाद श्रीवल्लभ यांचें अवतार चरित्र आणि अध्याय ११ ते ५१ श्रीनरसिंह सरस्वतींचें अवतार-चरित्र असून ५२ वा अध्याय अवतरणिकेचा आहे. हा अवतरणिकेचा अध्याय नंतर जोडला गेला असून मूळ गुरुचरित्र ५१ अध्यायांचेंच होतें, असें अभ्यसकांचें मत आहे.

तिसऱ्या प्रकरणांत गुरुचरित्रावरून दिलेली श्रीपाद श्रीवल्लभ व नरसिंह सरस्वती यांचीं चरित्रें वाचून गुरुचरित्राच्या विषयाची कल्पना येईलच. गुरुभक्ति आणि प्रसाद हे या ग्रंथाचे दोन प्रमुख विशेष आहेत. चौदाव्या शतकांतील महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनाचें प्रतिबिंब म्हणूनहि या ग्रंथाचें महत्त्व विशेष आहे. दोन दत्तावतारांच्या चरित्रांशिवाय प्रसंगाप्रसंगानें ब्राह्मणांचा आचारधर्म, सतीधर्म, गुरुभक्ति, व्रतें, तीर्थें इत्यादि अनेक विषय सरस्वती गंगाधरांनीं हाताळले आहेत.

उपासक इष्टसिद्धीसाठीं आणि अर्थार्थी जन ऐहिक गरजांच्या परिपूर्तीसाठीं गुरुचरित्राचीं पारायणें करतात. या पारायणासाठीं सोंवळ्याचे नियम कडकपणें पाळले जातात. स्त्री-शूद्रांना या ग्रंथाच्या केवळ श्रवणाचा अधिकार आहे, वाचनाचा नाहीं, असें मानलें जातें. अर्थात् या नियमांत गुरुचरित्राचें 'एका विभूतिमान् सत्पुरुषाचें चरित्र' असें स्वरूप गृहीत नसून, तो एक मंत्रकोश

आहे, ही भावना अनुस्यूत असते. श्री. अप्रबुद्ध याविषयीं मतप्रकटन करतांना लिहितात : "खुद्द सरस्वती गंगाधरांनीं म्हणा, कीं गुरुचरित्रास अवतरणिका जोडणाऱ्या भक्तानें म्हणा, 'अंतःकरण असतां पवित्र । सदाकाळ वाचावें गुरुचरित्र' असें म्हणून ठेविलें आहे. त्यावरून असें दिसतें कीं, नित्यनियम म्हणून अगर सप्ताहपद्धतीनें श्रीगुरुचरित्र वाचण्याचा क्रम सोडला तर सामान्य शुचिर्भूत अवस्थेंत श्रीमद्‌भागवत अथवा शिवलीलामृत इत्यादि ग्रंथांसारखा तो वाचावयास हरकत नसावी. अतिशय शुचिर्भूतपणानें त्याचें पारायण करणें हें 'तपोदृष्ट्या' अवश्य आहे, असें वाटतें; 'भक्तिभावास' त्याची गरज नसावी. स्त्रीशूद्रांनीं वाचण्यासंबंधीं अधिकारी विभूतीकडून मी असें ऐकिलें आहे कीं, श्रीगुरुचरित्र हा एक सबंध मंत्रच आहे; आणि म्हणून मंत्राच्या अनुष्ठानासंबंधींचे सर्व नियम त्याला लागू आहेत. त्यांत अनेक ठिकाणीं मधून मधून वेदाक्षरें आलीं आहेत, म्हणून तो स्त्रीशूद्रांनीं वाचण्यास प्रतिबंध आहे."[७]

श्री. रा. कृ. कामत यांनीं परिश्रमपूर्वक गुरुचरित्राची संशोधित आवृत्ति संपादिली आहे. त्यांच्या प्रतींत सप्ताहांतील अध्यय-विभागणी पुढीलप्रमाणें आहे : (१) अ. १–७ (ओ. १०६७), (२) अ. ८–१८ (ओ. १०६८), (३) अ. १९–२८ (ओ. १०४८), (४) अ. २९–३४ (ओ. ९८९), (५) अ. ३५–३७ (ओ. ११५२), (६) अ. ३८–४३ (ओ. ११३५), (७) अ. ४४–५१ (ओ. ९२७).

वाङ्मयीन दृष्ट्या या ग्रंथाचें मूल्यमापन करतांना श्री. ज. स. करंदीकर म्हणतात : "वाङ्मयाच्या दृष्टीनें पाहिल्यास श्रीगुरुचरित्र हा ग्रंथ श्रीधर-कवीच्या शिवलीलामृतापेक्षांहि सरस आहे. श्रीधराच्या वर्णनांत नव्या कल्पना व कवित्वस्फूर्ति अल्पांशानें आढळते. त्याचें वर्णन नेहमींच पाल्हाळीक व ठराविक ठशाचें असतें. त्यांत नावीन्य, अद्‌भुतरम्यता, रसाविर्भाव गुरु-चरित्राच्या मानानें कमीच दिसून येतो. श्रीधरस्वामीच्या शिवलीलामृताशींच गुरुचरित्राची तुलना करण्याचें कारण असें कीं, त्या दोहींत दहा-बारा कथा सारख्याच आहेत. तेव्हां एकाच प्रसंगाचें वर्णन ते दोघे कोणत्या पद्धतीनें करतात, याची तुलना चांगली करतां येते. उदाहरणार्थ, गणपतीनें रावणास

७. गुरुचरित्र, पुरस्कार, पृ. ६८२.

फसवून त्यानें दिलेलें शिवलिंग भूमीवर ठेवल्याचा प्रसंग घ्या किंवा शबरीनें चिताभस्म मिळण्यासाठीं आपला देह जाळून घेतल्याचा प्रसंग घ्या, या कथेंतील गुरुचरित्रांतील वर्णन अत्यंत हृदयंगम असेंच वाटेल व त्यापुढें श्रीधरस्वामीचें वर्णन फिकें पडेल."[८]

गुरुचरित्राच्या रचनेवर 'विवेकसिंधू'तील शब्दांचा आणि दृष्टान्तांचा विशेष प्रभाव दिसून येतो.[९]

**दत्तप्रबोध :** हा ग्रंथ अनंतसुत विठ्ठलबोवा ऊर्फ कावडीबोवा यांनीं श. १७८२ (चैत्र शु. १) मध्यें लिहिला. या ग्रंथाचे अध्याय ६१ आहेत. ग्रंथाचा प्रारंभ इंदूर येथें झाला आणि तेथें चाळीस अध्याय लिहून झाल्यावर पुढील एकवीस अध्याय बडोदें येथें लिहिले गेले. ग्रंथकार अनंतसुत हे आश्वलायन-शाखीय भारद्वाजगोत्री ऋग्वेदी ब्राह्मण. त्यांच्या पित्याचें नांव अनंत आणि मातेचें नांव राधा. अनंतराव कुलकर्णी हे परशुराम क्षेत्राजवळील पिंपळगांवचें जोस-कुलकर्णपण करीत. अनंतराव यात्रेस गेले असतां राधेनें विष्णुपदीं देह ठेवला आणि नंतर प्रयाग येथें अनंतरावांनीं संन्यास घेतला. अनंतसुत हे एकनाथांच्या निंबराज परंपरेंतले. त्यांची गुरुपरंपरा आदिनारायण–हंस–विधि–अत्रि – दत्तात्रेय – जनार्दन – एकनाथ–नरहरि – निंबराज – शिवराम – जयराम–नारायण–अनंत–अनंतसुत विठ्ठल अशी आहे.

दत्तप्रबोधाच्या ६१ अध्यायांपैकीं अध्याय १ ते ३५ दत्तावतार-चरित्र, अध्याय ३६ ते ५० मत्स्येन्द्र-गोरक्षादि दत्तसंबंधित सिद्धांच्या कथा आणि अध्याय ५० ते ६१ जनार्दन, एकनाथ, निंबराज या ग्रंथकाराच्या गुरुपरंपरेंतील सत्पुरुषांच्या कथा अशी विषयविभागणी आहे. ग्रंथकार पांडुरंगभक्त निंबराजाच्या परंपरेंतील असल्यामुळें त्याच्या भावविश्वांत पांडुरंग व दत्तात्रेय एकाकार झालेले आहेत. या ग्रंथांत कथा-निवेदनाच्या ओघांत प्रसंगाप्रसंगानें अनंतसुतांनीं तत्त्वज्ञानाचें विवेचन केलें आहे. दत्त संप्रदायाच्या

---

८. 'गुरुचरित्रांतील ऐतिहासिक माहिती' : भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष ९, अंक ९, पृ. ६–७.

९. 'विवेकसिंधु व गुरुचरित्र' : स. मुजुमदार, भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त श. १८३५, पृ. २८२–२८५.

सैद्धान्तिक अध्ययनासाठीं या ग्रंथाचा बराच उपयोग होईल. अनंतसुतांच्या तत्त्वग्रथधाची कल्पना येण्यासाठीं पुढील उतारा पहा :

सत्य ब्रह्म सनातन । तोंचि विस्तारलें परिपूर्ण ।
पदार्थमात्र नसे त्याविण । अवघा व्यापूनि तोचि तो ॥
धर्मकर्म अकर्म विकर्म । अधर्म धर्माधर्म ।
कृत्य अकृत्यादि वर्म । उगम निगम तोचि कीं ॥
गति सुगति अवगती । मति सुमती कुमती ।
देह इंद्रिय मनाच्या वृत्ती । कर्तृत्व कारण तोचि पैं ।
आब्रह्मस्तंबपर्यंत । सर्वांतरीं तोचि व्याप्त ।
तोचि कर्ता करविता सत्य । सर्वांगत सर्व तो ॥
सत्यत्वें ऐसें असतां । मायोपाधि हे जीवता ।
तेथोनि त्रिगुणात्मक अहंता । सर्व भ्रमता तेथोनी ॥
पडतां मायेचें आवरण । सद्वस्तु गेली लोपोन ।
असत् जालें दृश्यमान । हेंचि भान ठसावलें ॥[१०]

**श्रीगुरुलीलामृत** : हें अक्कलकोटच्या स्वामींचें चरित्र आहे. ग्रंथ-काराचें नांव वामनबोवा. वामनबोवा हे स्वामींच्या अंतेवासींपैकीं एक होते. अहमदनगरच्या प्रसिद्ध वैद्य घराण्यांत त्यांचा जन्म झाला. धारण्यगोत्री यजुर्वेदी ब्राह्मण. वडिलांचें नांव रावजी व आईचें नांव अहल्या. श. १७८५ मध्यें वामनबोवांना पयोष्णीसंगमावर महामंत्रोपदेशाचा लाभ झाला.

या ग्रंथाचे ५५ अध्याय असून ओवीसंख्या ९७५७ आहे. या दहा हजार ओव्यांत ग्रंथकारानें स्वामींचें अवतारित्व सिद्ध करण्यासाठीं त्यांनीं केलेल्या अनेक अद्भुत चमत्कारांच्या कथा वर्णिल्या आहेत. ‘ दत्तप्रबोधा ’-प्रमाणें याहि ग्रंथांत प्रसंगाप्रसंगानें तत्त्वचर्चा आली आहे :

तो परमेश्वर जरी करी कृपा । संसार परमार्थ तरीच सोपा ।
होय निश्चयात्मक सहज बापा । शिष्या धरी रे मानसीं ॥
बहुत जन्मांचें पूर्वार्जित । ईश्वरार्पण निष्काम सुकृत ।
असतां निरामय धूतचित्त । तरीच परमात्मकृपा होय ॥

---

१०. दत्तप्रबोध, २८-१९१-१९७.

भोळे भाविक भक्तिमान । सहज मोकळें शुद्ध मन ।
काम राग द्वेष त्यजून । भगवच्चरण सेविती जे ॥
मग ते केवळ उच्चजाती । अथवा नीचकुळ असतां मंदमती ।
गोड लागे ती भगवद्‌भक्ति । अनन्य प्रेमें जयासी ॥
तयासी श्रीजगदीश्वर । सद्‌गुरुनाथ दयासागर ।
प्रसन्न होऊन निरंतर । प्रत्यक्ष दर्शन देतसे ॥
अंतःकरण असूनि निर्मळ । हरिगुरुचरणीं चिरकाळ ।
असतां अनन्यैक भक्ति केवळ । अवश्य होय दर्शन तें ॥
येथें मुख्य कारण शुद्धभाव । भाव तेथेंचि देवाधिदेव ।
सर्वदा तिष्ठतसे स्वयमेव । निःसंशय जाणिजे ॥ "[११]

अशी आहे वामनबोवांच्या विचारांची आणि विवेचनाची मांडणी. त्यांत प्रसाद आहे, भोळा भाव आहे आणि अनन्य गुरुभक्ति आहे.

**दत्तमाहात्म्य :** हा ग्रंथ श्रीवासुदेवानंद सरस्वतींनीं लिहिलेला आहे. ग्रंथकर्त्याचा अल्प परिचय आपण गेल्या प्रकरणांत करून घेतलाच आहे. या ग्रंथाची रचना क्षिप्रेच्या कांठीं श. १८२३ मध्यें झाली आहे. हा ग्रंथ ५९ अध्यायांत ( ओवीसंख्या : ५५१३ ) विभागलेला असून त्याची मुद्रित पृष्ठसंख्या पांचशेंच्यावर आहे. स्वामींनीं संस्कृतांत ' दत्तपुराण ' लिहिलें होतें; परंतु संस्कृतानभिज्ञ साधारण जनांकरितां त्याचा उपयोग नव्हता. म्हणूनच या प्रासादिक ग्रंथाची निर्मिति स्वामींनी केली. आपल्या ग्रंथरचनेचा हेतु ते पुढीलप्रमाणें व्यक्त करतात :

विविध धर्मान्वित । ज्ञानभक्तिरसभरित ।
असें हें श्रीदत्तचरित्र । मूर्तिमंत ब्रह्म कीं ॥
ब्रह्म तें अरूप असून । कोणा न ये दिसून ।
करितां उपनिषदांचें श्रवण । मनन ध्यानें मग कळे ॥
मंदां विशेषें करून । नुमजे औपनिषद ज्ञान ।
त्यांकरितां हें लेखन । करवी अत्रिनंदन दयाळू ॥ "[१२]

---

११. श्रीगुरुलीलामृत, १३. ३०–३६.
१२. दत्तमाहात्म्य, १५. १०४–१०६.

दत्तावताराचें चरित्र वर्णन करीत असतांना स्वामींनीं तत्त्वविवेचनाची संधिहि अनेकदां घेतली आहे : " सर्वव्यापी, अव्यय, अनंत व आनंदरूप असें आत्मस्वरूप आहे. त्या अवस्थेप्रत जाण्याकरितां ईश्वरार्पण बुद्धीनें केलेलीं निष्काम कर्में बुद्धीचा मल हरण करून ईश्वरविषयक गोष्टींसंबंधीं आवड उत्पन्न करतात. आवड उत्पन्न झाली म्हणजे श्रवण व श्रवणानंतर मनन व तदनंतर दृढ प्रयत्नानें अनेक प्रकारांपैकीं कोणती तरी उपासना तीव्रतेनें होऊन शेवटीं त्या आत्मस्वरूपाची प्राप्ति होते." हें या ग्रंथाचें तात्त्विक सार आहे. दत्तप्रभूचें अवधूतस्वरूप आणि तत्प्रणीत अष्टांगयोगाची चर्चाहि या ग्रंथांत केलेली आहे. स्वामींनीं भक्तीचें महिमानहि उत्कटपणें गायिलें आहे :

**भक्ति ज्ञानाची माऊली । करी कृपेची साऊली ।**
**जिनें नामरूपा आणिली । ब्रह्ममूर्ती भली अनायासें ।।**
**प्रेमळ भक्ताविण । देवा न पडे चैन ।**
**म्हणूनी लाज सोडून । राहे तदधीन भक्तांपासीं ।**
**असी ही प्रेमभक्ती । हीच एकांतभक्ती ।**
**इजवरूनी चारी मुक्ती । ओंवाळून टाकाव्या ।।**[१३]

**संप्रदायाचीं तीर्थक्षेत्रें :**

१. **माहूर** : हें स्थान मराठवाड्यांत अदिलाबाद जिल्ह्यांत आहे. पुराणांत हें दत्ताचें शयनस्थान म्हणून वर्णिलें आहे. बाराव्या शतकांतील दत्तभक्त चांगदेव राऊळ यांना येथेंच दत्तसाक्षात्कार झाला. चांगदेव राऊळांच्याहि पूर्वी या स्थानाची विशेष प्रसिद्धि होती. हें एक शक्तिपीठहि आहे. परशुरामाची आई रेणुका येथें सती गेली, असें पुराणें सांगतात. गुरुचरित्रांत या स्थानाचे ओझरते उल्लेख आहेत. माहूरच्या एका स्त्रीचा पति श्रीगुरूंनीं संजीवित केला, अशी कथा गुरुचरित्रांत ( अ. ३० ) आहे. महानुभाव संप्रदायांत माहूरचें महिमान विशेष आहे. ' स्थानपोथी 'च्या कांहीं प्रतींत तेराव्या शतकांतील माहूरविषयीं विस्तृत वर्णन आलें आहे.[१४] अलीकडच्या काळांत विष्णुदासांचा निवास माहूर येथें होता. दासोपंतांनीं १२ वर्षें या ठिकाणीं तप करून दत्तप्रभूला प्रसन्न करून घेतलें होतें.

---

१३. दत्तमाहात्म्य, १·१७; २७५५-५६.

१४. स्थानपोथी : सं. डॉ वि. भि. कोलते, पृ. ७६–७८.

माहूरच्या तीर्थमहिम्यांत देवदेवेश्वर, रेणुकादेवी, अनसूया, दत्तात्रेय या देवांचीं मंदिरें आणि अमृतकुंड, सर्वतीर्थ, कमलतीर्थ, शिखर हीं स्थानें महत्त्वाचीं गणलीं जातात. दत्तात्रेयाचें मंदिर माहूरपासून सहा मैलांवर एका टेकडीवर वसलेलें आहे. महंत मुकुंदभारती या नांवाच्या महंतांनीं सध्यांचें मंदिर सं. १२९७ मध्यें बांधलें. मूळ मंदिर फक्त १०′×१२′ या आकाराचें आहे. त्यानंतर भोंवतींच्या ओवऱ्या व प्राकार यांची बांधणी झालेली आहे. या देवस्थानाला औरंगजेबाकडून अनेक जहागिऱ्या मिळालेल्या आहेत. देवस्थानाचें वार्षिक उत्पन्न पन्नास हजारांवर आहे. ‘सर्वतीर्थ’ किंवा ‘मावळा तीर्थ’ म्हणून ओळखलें जाणारें तीर्थ म्हणजे महानुभावीय वाङ्मयांत व ज्ञानेश्वरांच्या अभंगांत उल्लेखिलेला मेरुबाळा तलाव होय.

**गिरनार** : हें दत्तोपासनेचें प्राचीन केंद्र आहे. नाथसंप्रदायाच्या माध्यमांतून दत्तोपासना दूरवर पसरल्याचें एक मोठें प्रत्यंतर गिरनारच्या रूपानें उभें आहे. हें दत्तमंदिर जुनागडजवळ गिरनार पर्वताच्या एका शिखरावर आहे. हिंदु, बौद्ध, जैन व इस्लाम अशा निरनिराळ्या संस्कृतिप्रवाहांचा संगम गिरनारवर झालेला आहे. अशा ठिकाणीं समन्वयकारी दत्तात्रेय उभा आहे, याला विशेष अर्थ आहे. गिरनारवर जैन मंदिर, एका पीराचा दर्गा, गोरखनाथ मंदिर, शिवमंदिर, दोन देवीचीं मंदिरें व दत्तमंदिर अशीं मंदिरें आहेत. हा पर्वत बराच उंच असून त्याच्या सर्वोच्च शिखरावर गुरु गोरखनाथाचें मंदिर आहे आणि त्याच्या खालोखाल असलेल्या शिखरावर (वर जातांना पांचव्या शिखरावर) दत्तात्रेयाचें स्थान आहे. सर्व शिखरावर चढण्यास पायऱ्या आहेत. दत्तस्थानापर्यंत जाईतों सुमारें दहा हजार पायऱ्यांची चढ-उतार करावी लागते.

दत्तोपासनेच्या इतिहासांत गिरनारचा महिमा विशेष आहे. या तपोभूमींत दत्तदर्शनाचा ध्यास घेऊन तप आचरणारे अनेक ज्ञातातात महात्मे होऊन गेले. निरंजन रघुनाथ, किनाराम अघोरी, नारायणमहाराज जालवणवर इत्यादि दत्तोपासकांना गिरनारवरच दत्तसाक्षात्कार झाला आहे. वामनबोवांनीं ‘दत्तप्रबोधां’त गिरनारचें माहात्म्य असें वर्णिलें आहे :

**एक शृंगावरी गोरक्षनाथ । दुसरे शृंगावरी हिंगळजादेवी वसत ।**
**तिसरे शृंगावरी स्वयें अवधूत । विश्रांति घेत हिंडतां ॥**

नवनाथ चौऱ्यांशी सिद्ध । येथें वसती गा प्रसिद्ध ।
दत्त अविनाश तूं स्वतां सिद्ध । अद्वय अभेद्य सर्वांतीत ॥
हिंदु आणि मुसलमान । यांसाठीं रूपें दोन ।
दत्त दातार अभिमान । हृयस्थान शोभविलें ॥

**औदुंबर :** श्रीनरसिंह सरस्वतींच्या चातुर्मास निवासामुळें हें क्षेत्र निर्माण झालें आहे. पुण्याहून हुबळीकडे जाणाऱ्या दक्षिण लोहमार्गावर किर्लोस्कर-वाडीच्या पलीकडे भिलवडी स्टेशनपासून चार मैलांवर कृष्णेच्या कांठीं हें ठिकाण आहे. कृष्णा नदीच्या ऐलतीरावर भिलवडी आहे आणि पैलतीरा-वर औदुंबर आहे. भिलवडीजवळ भुवनेश्वरीचें प्राचीन शक्तिपीठ आहे. त्यामुळें या स्थानीं तपस्वी जनांची वर्दळ नेहमीं असे. कृष्णेच्या तीरावरील वृक्षांच्या दाटीमुळें येथें आपोआपच एकान्तमय तपोवन निर्माण झालेलें होतें. त्यामुळें या निसर्गसिद्ध तपोवनांत, औदुंबरांच्या दाट शीतल छायेंत शके १३४४ च्या सुमारास श्रीनरसिंह सरस्वतींनीं चातुर्मासाचा काळ घालविला आणि या स्थानाला चिरंतन पावित्र्य प्राप्त करून दिलें. येथील कृष्णेचा घाट प्रशान्त आणि प्रशस्त आहे. या घाटावरच दत्तपादुकांचें मंदिर आहे. ज्या घाटावर दत्तपादुकामंदिर आहे, तो घाट येथील ब्रह्मानंद-स्वामींचे शिष्य सहजानंद स्वामी यांनीं बांधविला आहे. पावसाळ्यांत श्रींच्या पादुका कृष्णेच्या महापुरांत बुडून जातात आणि त्यामुळें नित्योपासना व दर्शन अशक्य होऊन बसतें. ही अडचण दूर करण्यासाठीं स. १९२६ मध्यें उंच जागीं एक देवघर बांधलें आहे. पावसाळ्यांत देव तेथें नेतात आणि तेथेंच पूजा-अर्चा होते. क्षेत्रांतील नित्यनैमित्तिक उपासनेसाठीं अनेक सरदार-संस्थानिकांकडून दानें व इनामें मिळालीं आहेत. अलीकडेच 'औदुंबर भक्त मंडळा'नें बारा हजार रुपये खर्चून ४३′ × २६′ एवढ्या विस्ताराचा काँक्रीटचा मंडप बांधला असून क्षेत्राच्या भावी विकासाची योजना संकल्पिली आहे.

मंदिराच्या परिसरांत औदुंबर वृक्षांची घनदाट छाया आहे. आकाशांत सूर्य तळपत असतांना भूमीवर छाया-प्रकाशाची रांगोळी तरळत राहते. या क्षेत्रांत ब्रह्मानंदस्वामींचा मठ आहे. हे सत्पुरुष १८२६ च्या सुमारास गिरनारहून औदुंबर क्षेत्रीं आले आणि इथेंच एक मठी उभारून त्यांनीं

तपश्चर्या केली. येथील शांत, प्रसन्न आणि पवित्र वातावरणांत त्यांच्या तपाला सिद्धीचें यश प्राप्त झालें आणि अखेर इथेंच त्यांनीं समाधि घेतली. या ब्रह्मानंद मठांतच श्रीवासुदेवानंद सरस्वतींनीं आपल्या जीवनसाधनेचीं पहिलीं पावलें टाकलीं होतीं. कोल्हापूरच्या मंदबुद्धि ब्राह्मणाला श्रीगुरूंनीं ज्ञानदान केल्याची गुरुचरित्रांतील कथा याच स्थानांत घडलेली आहे.

**नरसोबाची वाडी :** मिरज-कोल्हापूर लोहमार्गावरील जयसिंगपूर या पहिल्याच स्टेशनवर उतरून मोटारनें आठ मैल गेल्यावर कृष्णा-पंचगंगा-संगमावर हें ठिकाण लागतें. वाडी हें नांवाप्रमाणेंच एक खेडेगांव आहे. सर्व वस्ती कृष्णेच्या कांठावर एकवटली आहे. कृष्णेच्या घाटावरच दत्त-पादुकामंदिर आहे. वाडीचा कृष्णाघाट प्रशस्त आहे. इथें कृष्णेचा प्रवाह खळाळून वहात आहे. श्रीनरसिंह सरस्वती औदुंबरचा चातुर्मास संपवून इथें आले आणि बारा वर्षें इथें राहून पुढें गाणगापूरला गेले. श्रीगुरूंच्या चरणस्पर्शानें पावन झालेल्या तीरावरील भूमीला आवेगानें मिठी देण्याची तिलाहि जणूं ओढ असावी. पादुकांच्या समोरून कृष्णा वाहत चालली आहे आणि जवळूनच उजव्या बाजूनें पंचगंगा धावत आली आहे. दत्तदर्शनाचा आनंद पंचगंगेच्या हृदयीं रिचवण्याची जणुं कृष्णेला घाई झाली आहे आणि जवळच, एक फर्लांग अंतरावर, तिनें पंचगगेशीं मिळणी साधली आहे.

इथें बारा वर्षे राहून, अनेक दीनदलितांच्या जीवनांत समाधानाचे नि सुखाचे मळे फुलवून, अनेकांचीं संकटें दूर सारून ते पुढें गाणगापूरला गेले. कृष्णेच्या पैलतीरावर औरवाड आणि गौरवाड या नांवाचीं दोन गांवें आहेत. हीं गांवें विजापूरच्या आदिलशहानें वाडीच्या दत्तपूजेसाठीं इनाम दिलेलीं आहेत. यांपैकीं औरवाड म्हणजेच गुरुचरित्रांतील अमरापूर. या अमरापुरांत अमरेश्वर नांवाचें शिवस्थान आहे. या अमरापुराचा आणि त्याच्या कृष्णा-पंचगंगा संगमाचा महिमा गुरुचरित्रांत असा वर्णिला आहे :

**पंचगंगा नदीतीर। प्रख्यात असे पुराणांतर।**
**पांच नामें आहेति थोर। सांगेन ऐका एकचित्तें ॥**
**शिवा भद्रा भोगावती। कुंभी नदी सरस्वती।**
**पंचगंगा ऐसी ख्याति। महापातक संहारी ॥**

ऐसी प्रख्यात पंचगंगा। आली कृष्णेचिया संगा।
प्रयागाहूनि असे चांगा। संगमस्थान मनोहर ॥
अमरापुर म्हणिजे ग्राम। स्थान असे अनुपम।
जैसा प्रयाग संगम। तैसें स्थान मनोहर ॥
वृक्ष असे औदुंबरु। प्रत्यक्ष जाणा कल्पतरु।
देव असे अमरेश्वरु। तया संगमा षटकूळीं ॥[१५]

नदीच्या बाजूनें घाटाच्या पहिल्या टप्प्यावरच लहानसें ( १२′×२३′ ) दत्तपादुकामंदिर आहे. या पादुकांना ' मनोहर पादुका ' अशी संज्ञा आहे. मंदिराच्या मागें औदुंबराचा पार आहे. दुपारीं बारा वाजतां या मनोहर पादुकांची महापूजा होते. महापूजेच्या वेळीं पुजारी पादुकांवर लोटीभर दूध ओततात आणि त्यानंतर त्या अमृताच्या अभिषेकानें मनोहर पादुका दर्शनेच्छूंच्या डोळ्यांत भरतात.

घाटाच्या अखेरच्या टप्प्यावर श्रीवासुदेवानंद सरस्वतींचें स्मृतिमंदिर आहे. वाडीचें दत्तस्थान हेंच वासुदेवानंदांचें प्रेरणास्थान होय. त्यांच्या स्मृतिमंदिरामागें श्रीगुरूंशीं समकालीन असलेले श्रीरामचंद्रयोगी यांचें स्मृतिस्थान आहे, आणि उजव्या हाताला ओळीनें नारायणस्वामी, काशीकरस्वामी, गोपाळस्वामी, मौनीस्वामी या तपोनिधींचीं स्मारकें आहेत. त्यांच्या तपानें आणि चिरविश्रान्तीनें कृष्णाकांठ पुनीत झाला आहे.

**गाणगापूर :** हें स्थान पुणें-रायचूर लोहमार्गावर गाणगापूर स्टेशनपासून चौदा मैलांवर भीमा-अमरजेच्या संगमस्थानीं आहे. श्रीनरसिंह सरस्वती येथें वाडीहून आले आणि सुमारें तेवीस वर्षें येथें राहून येथूनच श्रीशैलाकडे त्यांनीं गमन केलें. त्यांच्या दोन तपांएवढ्या प्रदीर्घ सन्निधानामुळें हें स्थान दत्तोपासनेच्या क्षेत्रांत सर्वोपरि महिमान पावलें आहे. श्रीगुरु जेव्हां येथें आले, तेव्हां प्रथम ते संगमावरच राहत. नंतर ते गांवांत बांधलेल्या मठांत राहूं लागले. या मठाच्या स्थानींच त्यांच्या पादुका आहेत. वाडीच्या पादुकांना ' मनोहर पादुका ' म्हणतात, तर येथील पादुकांना ' निर्गुण पादुका ' अशी संज्ञा आहे. जणुं वाडी येथें असतांना त्यांच्या सगुण रूपाची

---

१५. गुरुचरित्र, १८.१५-१९.

दीप्ति कळसास पोंचली होती—' मनोहर ' बनली होती, तर येथें ते देहातीत—गुणरूपातीत होऊन ' निर्गुण ' स्वरूप पावले होते. गुरुवार हा इथला पालखीचा वार. नित्योपासना दररोज पहांटपासूनच सुरू होते. येथील पादुकांना जलस्पर्श करीत नाहींत; केवळ अष्टगंध आणि केशर यांचें लेपन करतात. येथील ' निर्गुण पादुका ' चल आहेत. त्या त्यांच्या आकाराच्या संपुटांत ठेवलेल्या असतात. संपुटांतून मात्र त्या बाहेर काढल्या जात नाहींत. संपुटांना झांकणें आहेत. पूजेच्या वेळीं झांकणें काढून आंतच लेपनविधि होतो आणि अन्य पूजोपचारांसाठीं ताम्हणांत ' उदक ' सोडतात.

पादुका असलेला मठ गांवाच्या मध्यभागीं आहे. मठाच्या पूर्वेस महादेवाचें स्थान आहे; दक्षिणेस औदुंबर व त्याखालीं महादेव-पार्वती यांच्या मूर्ति आहेत; पश्चिमेस अश्वत्थाचें झाड आहे. अश्वत्थाच्या पाराभोंवतीं नागनाथ, मारुती यांचीं स्थानें व तुळशीवृंदावन आहे. मठांतील पादुकांच्या गाभाऱ्याला द्वार नाहीं. दर्शनार्थ एक चांदीनें मढविलेला लहानसा झरोका आहे. या झरोक्यांतूनच दर्शनार्थीनीं श्रीगुरूंच्या त्या चिरस्मरणीय ' निर्गुण पादुकां 'चें दर्शन घ्यावयाचें असतें. अनेक साधकांना या पादुकांच्या ठायींच श्रीगुरूंचें दिव्य दर्शन झालें, असें सांगतात.

गांवापासून एक मैल अंतरावर भीमा-अमरजा संगम आहे. संगमाजवळच भस्माचा डोंगर आहे. संगमावरील संगमेश्वराच्या देवालयापुढें श्रीगुरूंची तपोभूमि आहे. गाणगापूरच्या परिसरांत षट्कुलतीर्थ, नरसिंहतीर्थ, भागरथीतीर्थ, पापविनाशीतीर्थ, कोटितीर्थ, रुद्रपादतीर्थ, चक्रतीर्थ आणि मन्मथतीर्थ अशीं अष्टतीर्थें आहेत.

गाणगापूरच्या उत्सव-संभारांत दत्तजयन्ती आणि श्रीगुरूंची पुण्यतिथि या दोन उत्सवांचें विशेष महत्त्व आहे. श्रीगुरूंचें सर्व जीवनकार्य गाणगापूर येथेंच घडलें आणि आपल्या दिव्योदात्त विभूतिमत्त्वाचें सर्व तेज त्यांनीं याच भूमीच्या अणुरेणूंत संक्रांत केलें. त्याचमुळें गेलीं पांच शतकें हें स्थान दत्तोपासकांच्या हृदयांत असीम श्रद्धेचा विषय बनलें आहे.

याशिवाय नेपाळांतील भटगांव, दक्षिणेंतील बाबा बुडन, पांचाळेश्वर, प्रवराकांठचें जोवें, चित्रकूटाजवळील अनसूया पहाड आणि त्यावरील दत्तजन्मस्थान, ब्रह्मावर्त येथील ध्रुवस्थान ( दत्तात्रेयानें ध्रुवाला उपदेश केल्याचें

स्थान ), इत्यादि अनेक दत्तस्थानें आहेत. श्रीनरसिंह सरस्वतींचें जन्मस्थान असलेलें वऱ्हाडांतील लाडकारंजें ( करंजनगर ) हेंहि तीर्थमहिमा पावलेलें आहे. काशी येथील पंचगंगेश्वरमठाधिपति श्रीब्रह्मानंद सरस्वती ऊर्फ लीलादत्त यांनीं श. १८५६ मध्यें या ठिकाणीं सुंदर मंदिर बांधून त्यांत श्रीगुरूंच्या मूर्तीची स्थापना केली आहे. हें स्थान 'उत्तरेकडील गाणगापूर' म्हणून ओळखलें जातें. दत्तात्रेय आणि दत्तावतार विभूति यांच्या सन्निधानानें पावन झालेल्या या स्थानांशिवाय दत्तोपासकांच्या निवासानें आणि निर्याणानें पुनीत झालेलीं स्थानेंहि तीर्थमहिमा पावलीं आहेत. माणिक प्रभूंचें माणिकनगर, स्वामींचें अक्कलकोट, वासुदेवानंद सरस्वतींचें गरुडेश्वर, इत्यादि स्थानें दत्तोपासनेचीं केंद्रें बनलीं आहेत.

## गाउं त्यांना आरती :

दत्तोपासनेचा हा धांवता आढावा आहे. मराठी भक्तिपरंपरेच्या पंच-गंगांतील ही दत्तभक्तीची सरिता गेलीं दीड-दोन हजार वर्षें महाराष्ट्राचें आंतर जीवन उजळीत राहिली आहे. मराठी लोकमानसाची विवेकनिष्ठ आणि समन्वयकारी भावना दत्तोपासनेच्या इतिहासांतहि विविध रंगरूपें धारण करून आविष्कृत झाली आहे. अनेक तपस्व्यांनीं आणि संतांनीं आपल्या विश्वाकार अनुभूतीनें आणि अतलस्पर्शी प्रज्ञेनें दत्तभक्तीच्या सरितेची 'जीवन-समृद्धि' आजवर वाढविली आहे. त्या अनेक दत्त-भक्तांच्या सहज-संचारानें आणि सन्निधानानें महाराष्ट्र-भूमीची जीवन-शुद्धि होत आली आहे. ज्या वेळीं मराठी लोकजीवन आत्मविनाशाच्या गर्तेच्या काठांवर उभें होतें, त्या वेळीं दत्तभक्तीच्या प्रेरणेनें मराठी लोक-मानसाला मृत्युंजयी निष्ठा प्रदान केली आहे.

दत्तात्रेय ही संघर्ष आणि भेद यांना उल्लंघून सामंजस्य साधणारी देवता आहे. शैव आणि वैष्णव, सनातनी आणि विद्रोही, हिंदु आणि मुसलमान या भेदांना ती आपल्या पदस्पर्शानें लुप्त करूं पाहत आहे. तिचें चरित्र हें सगुण साकार ईश्वरावताराचें नसून, चिरन्तन मूल्यांच्या विकास-प्रक्रियेचें आहे आणि म्हणूनच दत्तात्रेयाची उपासना ही सर्वोच्च जीवन-मूल्यांची साधना

आहे. जेव्हां दत्तोपासनेच्या आश्रयानें दंभ, अज्ञान, सकामता यांचा संचार सुरू होतो, तेव्हां उपासक आपल्या उपास्याला विसरून ‘ भलतेंच कांहीं तरी ’ करीत असतो. आज असें खेदजनक वातावरण मोठ्या प्रमाणांत आढळतें. ज्यांनीं दत्तात्रेयाचें खरें स्वरूप ओळखून त्या स्वरूपाच्या ध्यासांतून जीवनसाधना आचरिली, असे प्रातःस्मरणीय पुण्यश्लोकहि दत्तोपासनेच्या क्षेत्रांत कमी नाहींत, हें आपण पाहिलें आहेच.

मराठी संस्कृतीचें भरण-पोषण करणाऱ्या आणि आपल्या अनुभूतीच्या प्रकाश-दीप्तीनें चिरंतनाचा वेध घेणाऱ्या त्या सर्व ज्ञाताज्ञात दत्तोपासकांना विनम्र वन्दना करून हें दत्तोपासनेचें समालोचन मी श्रीदत्त-प्रभूच्या चरणीं समर्पण करीत आहें आणि ही अल्पपूजा समर्पित करतांना अशी प्रार्थना करीत आहें कीं, श्रीदत्त-प्रभूनें श्रीनरसिंह सरस्वतींसारख्या महापुरुषाच्या रूपानें पुनः अवतरावें व भक्तीच्या नांवानें नांदणाऱ्या अंधश्रद्धेचें व सकामतेचें तिमिर दूर करावें.

* * *

# श्रीदत्तात्रेयाची आरती

त्रिगुणात्मक त्रैमूर्ती दत्त हा जाणा ।
त्रिगुणी अवतार त्रैलोक्यराणा ।
नेति नेति शब्दें न ये अनुमाना ।
सुरवर मुनिजन योगी समाधि न ये ध्याना ॥ १ ॥

जय देव जय देव जय श्रीगुरुदत्ता ।
आरति ओवाळीतां हरली भवचिंता ॥ ध्रु० ॥

सबाह्य-अभ्यंतरीं तूं एक दत्त ।
अभाग्यासी कैंची कळेल ही मात ॥
पराही परतली तेथें कैंचा हेत ।
जन्ममरणाचा पुरलासे अंत ॥ २ ॥

दत्त येऊनीयां उभा ठाकला ।
सद्भावें साष्टांगें प्रणिपात केला ॥
प्रसन्न होऊनी आशीर्वाद दिधला ।
जन्ममरणाचा फेरा चुकविला ॥ ३ ॥

दत्त दत्त ऐसें लागलें ध्यान ।
हरपलें मन झालें उन्मन ॥
मीतूंपणाची झाली बोळवण ।
एका जनार्दनीं श्रीदत्तध्यान ॥ ४ ॥

—श्रीसंत एकनाथ

* * *

## दत्तोपासनेच्या क्षेत्रांतील कांहीं सत्पुरुषांचे काळ

| | |
|---|---|
| गोरखनाथ | सुमारें शके ९७५–१०७५ |
| चांगदेव राऊळ | सुमारें शके १०७२–११४२ |
| चक्रधर | सुमारें शके १०७५–११९६ |
| श्रीपाद श्रीवल्लभ | सुमारें शके १२४५–१२७५ |
| श्रीनरसिंह सरस्वती | सुमारें शके १३००–१३८० |
| सरस्वती गंगाधर | पंधरावें शतक |
| जनार्दनस्वामी | शके १४२६–१४९७ |
| एकनाथ | शके १४५५–१५२१ |
| दासोपन्त | शके १४७३–१५३७ |
| मुक्तेश्वर | सतरावें शतक |
| निरंजन रघुनाथ | शके १७०४–१७७७ |
| नारायणमहाराज जालवणकर | शके १७२९–१७८९ |
| श्रीमाणिक प्रभु | शके १७३९–१७८७ |
| अक्कलकोटचे स्वामी | समाधि : शके १८०० |
| श्रीवासुदेवानंद सरस्वती | शके १७७६–१८३६ |
| पंतमहाराज बाळेकुंद्रीकर | शके १७७७–१८२७ |
| विष्णुदास | शके १७६६–१८३९ |
| रामानंद बीडकर | शके १७६०–१८३४ |
| दीक्षित स्वामी | शके १७८८–१८४९ |

* * *

# संदर्भ - साहित्य


१. पुराणें : आनंदाश्रम संस्कृत ग्रंथावलि, पुणें.

२. ईशाद्यष्टोत्तरशतोपनिषदः : निर्णयसागर प्रेस, मुंबई.

३. परशुरामकल्पसूत्रम् : गायकवाड ओरिएंटल सेरीज्, बडोदें.

४. नित्योत्सवः : गायकवाड ओरिएंटल सेरीज्, बडोदें.

५. सिद्धसिद्धान्तपद्धतिः : सं. डॉ. कल्याणी मलिक, प्र. ओरिएंटल बुक हाउस, पुणें.

६. अवधूतगीता : निर्णयसागर प्रेस, मुंबई.

७. शंकराचार्यविरचितप्रकरणसंग्रहः : सं. हरि रघुनाथ भागवत.

८. लीळाचरित्र : सं. ह. ना. नेने.

९. चक्रधरोक्त सूत्रपाठ : स. ह. ना. नेने.

१०. उद्धवगीता : सं. डॉ. वि. भि. कोलते.

११. स्थानपोथी : सं. डॉ. वि. भि. कोलते.

१२. श्रीज्ञानेश्वरमहाराजांची गाथा : सं. तात्या नेमिनाथ पांगळ.

१३. गुरुचरित्र : सं. रा. कृ. कामत, प्र. के. भि. ढवळे, मुंबई.

१४. अमृतानंदकृत योगराजटिळक : सं. अ. का. प्रियोळकर; प्र. मराठी संशोधन मंडळ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई.

१५. अमृतरायकृत कवितासंग्रह : सं. वामन दाजी ओक.

१६. श्रीएकनाथमहाराजांजी गाथा : सं. किंजवडेकरशास्त्री, प्र. चित्रशाळा प्रेस, मुंबई.

१७. एकनाथी भागवत : सं. विष्णुबुवा जोग.

१८. दासोपंतांचीं पदें : सं. का. वा. लेले, वाई.

१९. दासोपंतांची पासोडी : सं. न. शे. पोहनेरकर; प्र. मराठवाडा साहित्य परिषद, हैद्राबाद.

२०. हरिवरदा, चतुर्थ खंड : सं. रा. चिं. ढेरे, प्र. दयार्णव रघुनाथ कोपर्डेकर, पुणें.

२१. मुक्तेश्वरकृत महाभारत : आदिपर्व ( खंड १–२–३ ) : सं. अ. का. प्रियोळकर, प्र. मराठी संशोधन मंडळ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई.

२२. निरंजन रघुनाथांचे ग्रंथ : सं. य. व्यं. कोल्हटकर.
२३. दासबोध : सं. ल. रा. पांगारकर; प्र. के. भि. ढवळे, मुंबई.
२४. तुकाराममहाराजांची गाथा : सं. पु. मं. लाड, प्र. मुंबई सरकार, मुंबई.
२५. रामविजय : श्रीधरस्वामी नाझरेकर.
२६. प्रियलीलामहोत्सव : श्रीगुलाबरायमहाराज.
२७. स्वानुभव-दिनकर : दिनकरस्वामी तिसगांवकर; प्र. सत्कार्योत्तेजक सभा, धुळें.
२८. सप्तसागर आणि स्फुट कविता : नारायणमहाराज जालवणकर.
२९. दत्तप्रबोध : अनन्तसुत विठ्ठल.
३०. श्रीगुरुलीलामृत : वामन रावजी वैद्य, प्र. के. भि. ढवळे, मुंबई.
३१. श्रीवासुदेवानंद सरस्वती ग्रंथमाला : प्र. वा. द. गुळवणी, पुणें.
३२. श्रीदत्तप्रेमलहरी : पंतमहाराज बाळेकुंद्रीकर; प्र. न. रा. कुलकर्णी ( बाळेकुंद्रीकर ), बेळगांव.
३३. विष्णुदासांची कविता : सं. नरहरशास्त्री खरशीकर.
३४. श्रीमाणिकप्रभु-संस्थान पद्यमाला : सं. अप्पासाहेब देशपांडे, माणिक-नगर.
३५. वैदिक संस्कृतीचा विकास : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, प्राज्ञ पाठ-शाळा, वाई.
३६. वैदिक देवतांचें अभिनव दर्शन : प्रा. रा. ना. दांडेकर, कौशिक व्याख्यानमाला, पुणें.
३७. श्रीशंकराचार्य व त्यांचा संप्रदाय : म. रा. बोडस.
३८. चक्रधर-चरित्र : डॉ. वि. भि. कोलते.
३९. महानुभावीय मराठी वाङ्मय : डॉ. य. खु. देशपांडे.
४०. संशोधन-लेखसंग्रह, भा. १ ला : ह. ना. नेने; प्र. विदर्भ साहित्य संघ, नागपूर.
४१. महाराष्ट्र-सारस्वत (चतुर्थावृत्ति) : वि. ल. भावे; सं. डॉ. शं. गो. तुळपुळे; प्र. लेखन-वाचन भांडार, पुणें.
४२. मराठी वाङ्मयाचा इतिहास, खं. २ रा. : ल. रा. पांगारकर.
४३. श्रीधर : चरित्र आणि काव्यविवेचन : प्रा. चिं. नी. जोशी.

४४. मऱ्हाठी संस्कृति : शं. बा. जोशी; प्र. आन्तरभारती प्रकाशन, पुणें.
४५. सूफी संप्रदाय : सेतु माधवराव पगडी; प्र. बलवंत पुस्तक भांडार, मुंबई.
४६. मूर्तिविज्ञान : ग. ह. खरे.
४७. तुकाराममहाराजांचे संत-सांगाती : वा. सी. बेंद्रे; प्र. मौज प्रकाशन, मुंबई.
४८. संस्कृतीचीं प्रतीकें : पं. महादेवशास्त्री जोशी.
४९. तीर्थरूप महाराष्ट्र, भा. १–२ : पं. महादेवशास्त्री जोशी.
५०. दत्त-भार्गव-संवाद : बा. भा. जोशी.
५१. महाराष्ट्रीय ज्ञानकोश : सं. डॉ. श्री. व्यं. केतकर.
५२. भारतवर्षीय चरित्र-कोश : सं. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव.
५३. दत्तभक्तिरहस्य : डॉ. स. कृ. फडके, पणवेल.
५४. संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुति : प्रा. गं. बा. सरदार, प्र. महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणें.
५५. महाराष्ट्र-महोदयाचा पूर्वरंग : ना. कृ. गद्रे.
५६. महाराष्ट्र-धर्म : भा. वा. भट, प्र. सत्कार्योत्तेजक सभा, धुळें.
५७. पांच संप्रदाय : पं. रा. मोकाशी; प्र. प्रसाद प्रकाशन, पुणें.
५८. षड्दर्शन समन्वय आणि पुरुषार्थमीमांसा : आहिताग्नि शं. रा. राजवाडे.
५९. विजयनगर-स्मारक ग्रंथ : सं. करमरकर-ओतूरकर.
६०. रामदासी संशोधन (खं. १-२) : सं. शं. श्री. देव, प्र. सत्कार्योत्तेजक सभा, धुळें.
६१. महाराष्ट्र-कवि-चरित्र, भा. ६ वा : ज. र. आजगांवकर.
६२. एकनाथ : वाङ्मय आणि कार्य : प्रा. न. र. फाटक; प्र. मौज प्रकाशन, मुंबई.
६३. परिचय : सं. ल. का. देशपांडे.
६४. म. म. दत्तो वामन पोतदार गौरव ग्रंथ : सं. डॉ. सुरेन्द्रनाथ सेन.
६५. श्रीगुरुदेवचरित्र : द. धुं. कवीश्वर; प्र. वा. द. गुळवणी, पुणें.
६६. श्रीनारायण महाराज जालवणकर यांचें संक्षिप्त चरित्र : मं. रा. टाकी.
६७. श्रीमाणिकप्रभु चरित्र : ग. र. कुलकर्णी; प्र. श्री. अप्पासाहेब देशपांडे, माणिकनगर.
६८. अक्कलकोटनिवासी स्वामीमहाराज यांचें चरित्र : ग. ब. मुळेकर.

६९. रामानंद बीडकर महाराज यांचें चरित्र : ल. ग. बापट.
७०. हिंदी साहित्यका आलोचनात्मक इतिहास : डॉ. रामकुमार वर्मा.
७१. उत्तरी भारतकी संतपरंपरा : परशुराम चतुर्वेदी.
७२. गोरखबानी : सं. डॉ. पीतांबरदत्त बडथ्वाल.
७३. मराठी संतोंका सामाजिक कार्य : डॉ. वि. भि. कोलते, प्र. हिंदी ग्रंथरत्नाकर, मुंबई.
७४. Philosophy of Upanishads : Dieson.
७५. Shaivism, Vaishnavism and Minor Religious Sects : Dr. R. G. Bhandarkar.
७६. Mohenjodaro : Prof. Mariwala.
७७. Dattatreya : The Way and the Goal : J. C. Wadiyar; Allen and Unwin, London.
७८. A Hand Book of South Indian Images : T. N. Shrinivasan.
७९. Govt. Collections of Mss. (B. O. R. I.) : Vol. IX, Part I.
८०. Inscriptions of the Madras Presidency : Ed. by V. Rangacharya.
८१. A History of South India : K. A. Nilakanta Sastri.
८२. भा. इ. सं. मं. त्रैमासिकाचे अंक व वार्षिक इतिवृत्तें.
८३. गंगानाथ मठ हस्तलिखित संग्रह ( पुणें ).
८४. सनातन मठ हस्तलिखित संग्रह ( मुंगी ).
८५. दत्तोपासनाविषयक विविध स्तोत्रादि संग्रह आणि नियतकालिकांतील अनेक विषयसंबद्ध स्फुट लेख.

* * *